With the Best Respects of the author

श्री

# परमार्थपर व्याख्यानमाला

अथवा

# वेदांतशास्त्राचीं मूलतत्वें.

भाग १ ला.

## साधनें.



लेखक व प्रकाशक:

नागेश विश्वनाथ पै,

सोलापूर.



हा ग्रंथ

मुंबईत

"कर्नाटक" छापखान्यांत छापिला.

१९१०.

किंमत १ रुपया.

सद्गुणमंडित व श्रेष्ठ भक्त

वैकुंठवासी

**परमपूज्य**

**तीर्थरूप मातोश्री गंगाबाई**

यांच्या चरणकमळीं

हा भाग

पुत्रभक्तिपूर्वक

अत्यादरानें व कृतज्ञतेनें

अर्पण केला असे.

# प्रस्तावना.

वेदांतशास्त्राकडे आतां बऱ्याच विचारवान लोकांचें लक्ष लागलेलें दिसतें. आधुनिक विद्वानांलाही वेदांतशास्त्राचें खरें मर्म जाणण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली आहे. ही गोष्ट अत्यंत समाधानकारक आहे. ज्यांना संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान आहे त्यांना योगवासिष्ठासारखे अनेक पुरातन व प्रासादिक ग्रंथ वाचून आपली जिज्ञासा तृप्त करितां येते. पण ज्यांना संस्कृत भाषा अवगत नाहीं, व अनेक ग्रंथ वाचण्यास, व त्यांतील प्रतिपादित विषय समजून घेण्यास सवडही नाहीं, असेही जिज्ञासू बरेच आहेत, त्यांना वेदांताचीं प्रमेयें व रहस्यें यथाशक्ति समजवून देण्याकरितां हा प्रयत्न आहे. या ग्रंथमालिकेचे सवडी-प्रमाणें, व लोकाश्रयानुसार बरेच भाग होतील. विषय आति विस्तृत व गहन असल्यामुळें त्यांचें योग्य विवेचन एका लहान पुस्तकांत होणें शक्य नाहीं.

ही ग्रंथमालिका नवीन पद्धतीवर तयार केली आहे. तिचा पहिला भाग सध्यां प्रसिद्ध होऊन गुणग्राही वाचकांपुढें मांडण्यांत येत आहे. या भागांत परमार्थसिद्धीकरतां अत्यंत उपयुक्त मानलेल्या अनेक साधनांचा विचार विस्तृत प्रमाणावर यथाशक्ति करण्यांत आला आहे.

दुसरा भाग "सद्गुण" या विषयावर असून तो लिहून तयार आहे. तो सवडीनुसार प्रसिद्ध करण्याची लेखकाची इच्छा आहे. या भागांत साधुपुरुषांचे अंगीं असलेल्या अनेक सद्गुणांचें विस्तृत विवेचन केलें आहे. वरील दोनीही भाग मिळून The Ethics of the Vedanta (वेदांतांतील सदाचार) या विषयाचें प्रतिपादन होईल.

पुढें कर्मयोग, भक्तियोग, ध्यानयोग (राजयोग), व ज्ञानयोग असे भाग लिहून तयार करण्याचा लेखकाचा उद्देश आहे. तो ईश्वरीकृपेवांचून सिद्धीस जाणें शक्य नाहीं. सध्यां तयार झालेला हा पहिला भाग सुज्ञ वाचकांस पसंत पडून त्याला योग्य आश्रय मिळाल्यास, पुढील भाग लिहून छापविण्याचे कामीं लेखकास प्रोत्साहन होईल.

या भागांतील सहा व्याख्यानें एका लहान संस्थेपुढें देण्यांत आलीं होतीं. तीं श्रोतेजनांस पसंत पडल्यामुळें, त्यांत प्रतिपादित विषयांचें विस्तृत विवेचन पुस्तकरूपानें प्रसिद्ध करून आर्यबांधवांपुढें ठेवण्याचें धाडस ग्रंथकर्ता करीत आहे. तरी गुणग्राही वाचक या लहान पुस्तकांतील अनेक दोषांकडे लक्ष न देतां, अशा कामास उत्तेजन द्यावें, ह्मणून आपला उदार आश्रय देतील अशी आशा आहे.

**ना. वि. पै.**



## अनुक्रमणिका.



श्री

# परमार्थपर व्याख्यानमाला.

१

## नित्यानित्यविवेक.

या संसारचक्रांत बद्ध झालेल्या जीवांस आपआपल्या बऱ्यावाईट कर्मानुसार लक्षचौऱ्यांशीं योनींच्या मालिकेंत फिरत रहावें लागतें, व त्या योनींत अनेक सुखदुःखपरंपरा भोगाव्या लागतात. सुख तर सर्वांस पाहिजेच. त्याचा कंटाळा बहुतेकांस येत नाहीं. पण दुःखास मात्र सर्व प्राणी त्रासतात. सदोदित दुःखच भोगावें लागलें तर जीवाचाही कंटाळा येतो, व तें दुःख असहनीय झालें तर हा जन्म नको मी केव्हां यांतून सुटेन असें वाटूं लागतें.

फार तर काय कित्येक अल्प विचारी मनुष्य आत्मघात करून एका जन्माचा अंत करतात. पण या संसारचक्रांतून सुटण्याचा हा मार्ग नव्हे. आत्मघात केल्यामुळें त्या गरीब प्राण्याची सर्वथैव हानी होते. कारण जन्मपरंपरेंतून त्याची सुटका तर होत नाहींच. त्याला दुसरा जन्म तर अवश्य येतोच. पण त्या जन्मींही दुःख भोगण्यास तो बिचारा आत्महत्येचें पाप बरोबर घेऊन जातो.

येथें ही शंका येण्यासारखी आहे कीं, आपणास तर या एका जन्माचेंच ज्ञान आहे. दुसऱ्या कोणत्याही जन्माबद्दल आपणास कांहीं एक माहीत नाहीं. मागील कोणत्याही जन्माची आपणास बिलकूल आठवण नाहीं. असें असोन जन्मपरंपरा मानण्यास काय आधार आहे ?

या शंकेसंबंधानें पुढें कर्मयोगांत सविस्तर विचार करावयाचा आहे. सध्यां इतकेंच सांगावयाचें आहे कीं, आपण पृथ्वीवरील प्राण्यांच्या स्थितीसंबंधानें विचार केला तर असें दिसतें कीं कांहीं प्राणी जन्मापासून सुखी, निरोगी, बलवान, धनवान, व ऐश्वर्यसंपन्न असतात; व दुसरे जन्मापासून दुःखी, रोगी, निर्बल, दरिद्री व ऐश्वर्य-विहीन असतात. हा फरक कां? तो प्राण्यांच्या या जन्मांतील वर्तणुकीवर अवलंबून आहे असें ह्मणावें, तर तसाही अनुभव नाहीं. सदाचरणी पुरुषही केव्हां केव्हां निकृष्ट स्थितींतच राहून दुःखें भोगतात, व उलटपक्षीं पापाचरण करणाऱ्यांस शासन न होतां त्यांची भरभराट होते, असें कां असावें? हें सर्व ईश्वर इच्छेवरच अवलंबून आहे असें मानावें, तर ईश्वराकडे नैर्घृण्य व पक्षपातीपणाचा आरोप येईल. पण ईश्वर तर न्यायी व दयाळू आहे. यासाठींच प्राण्यांस पूर्वजन्म होता, व त्या जन्मीं केलेल्या शुभाशुभ कर्मांचें फल ते या जन्मीं भोगतात असेंच मानावें लागतें.

आतां पुढील जन्म मानण्यासही कारण या जन्मांतच दृष्टोत्पत्तीस येतें. प्राण्यांनीं या जन्मीं केलेल्या सर्व शुभाशुभ कर्मांचें फल त्यांस या जन्मींच मिळतें असा अनुभव नाहीं. कांहीं प्राणी शुभकर्म करीत असतांही दुःखच भोगतात, व दुसरे अनेक पापकर्में करीत असतांही, त्यांस केलेल्या कर्माबद्दल या जन्मीं शासन बिलकूल मिळत नाहीं. या विचारसरणीवरूनच हिंदू लोकांनीं जन्मपरंपरा मानिली आहे. असो.

प्राण्यांची प्रवृत्ति पापाकडेच जास्त असल्यामुळें त्यांस वारंवार दुःख भोगणेंच भाग पडतें. अनेक दुःखपरंपरा भोगून अखेर कंटाळून या दुःखपरंपरेपासून आपली सुटका कशी तरी व्हावी असें त्या प्राण्यास वाटूं लागतें. पुण्यकर्म केलें तर सुख मिळतेंच, पण तें सुख अविनाशी

नसतें. केलेल्या सुकृताच्या ज्यास्त कमी प्रमाणानें कांहीं वेळ सुख भोगून प्राणी परत पूर्वस्थितीस येतो.

यासाठीं दुःख भोगावयास नको, तर या संसारचक्रांतून व या दुःखमूलक जन्मपरंपरेच्या मालकेंतून आपली सुटका प्राण्यानें करून घेतली पाहिजे. या संसारचक्रांत राहून अबाधित सुख मिळण्याची आशा व्यर्थ आहे. या संसारांत असलेल्या प्राण्यांस बद्ध असें ह्मणतात. व ज्यानें या संसारचक्रांतून आपली सुटका करून घेतली त्यासच मुक्त असें ह्मणतात.

ज्या प्राण्यास पूर्वपुण्यानें व ईश्वरकृपनें या संसाराचा वीट येऊन येथून आपली सुटका करून घेण्याची प्रबल इच्छा झाली त्यानें काय करावें, सर्व पुरुषार्थांत श्रेष्ठ असा जो मोक्ष तो त्याला कसा प्राप्त होईल, या प्रश्नाचें उत्तर एकच आहे.

**ज्ञानादेव तु कैवल्यं येन मुच्येत बंधनात्।**

भावार्थः—ज्या कैवल्यानें प्राणी बंधनापासून सुटतो, तें कैवल्य, ज्ञानापासूनच प्राप्त होतें.

ज्ञान दोन प्रकारचें आहे. एक परोक्ष ह्मणजे अप्रत्यक्ष, व दुसरें अपरोक्ष, ह्मणजे प्रत्यक्ष. शास्त्राच्या अध्ययनानें व गुरुमुखानें उपदेश घेऊन जें ज्ञान मिळतें तें परोक्ष होय. जें स्वतःच्या अनुभवानेंच उत्पन्न होतें तें अपरोक्ष. अपरोक्ष ज्ञानानेंच मोक्ष मिळतो.

इतकेंच जर असेल तर मुक्ति मिळणें कांहीं कठीण नाहीं, असें कदाचित वाटेल. कारण मनुष्यास तर काय पण सर्व प्राणिमात्रांलाही थोडें-बहुत ज्ञान असतेंच, व या जगांतील अनेक वस्तूंचें प्रत्यक्ष ज्ञान सर्व प्राणिमात्रांस होतेंच. मग हे बिचारे प्राणि मुक्त कां होत नाहींत?

याचें उत्तर असें आहे कीं, हें मोक्षदायक ज्ञान या क्षणभंगुर जगताचें किंवा त्यांतील पदार्थांचें नव्हे. जगताच्या ज्ञानानें प्राण्यास मोक्ष मिळत नाहीं. प्राण्यास जर मोक्ष पाहिजे तर त्यानें, ज्या सद्वस्तुरूप अधिष्ठानापासून या जगताची उत्पत्ति झालेली भासते, ज्या सद्वस्तूच्या आधारामुळें हें जग राहतें, व ज्या सद्वस्तूंत हें पुनः लीन होतें, त्या सद्वस्तूचें ह्मणजे ब्रह्माचें ज्ञान संपादन केलें पाहिजे. व तेंही परोक्ष होऊन उपयोग नाहीं, तर तें स्वानुभवाचें ह्मणजे साक्षात्काराचें अपरोक्ष ज्ञान झालें पाहिजे. तरच प्राण्यास मुक्ति मिळते व तो या दुःखमूलक जन्मपरंपरेंतून सुटतो.

पंचदशींत योगानंदांत ह्मटलें आहेः—

**तमेव विद्वानत्येति मृत्युं पंथा न चेतरः ।**
**ज्ञात्वा देवं पाशहानिः क्षीणैः क्लेशैर्न जन्मभाक् ॥**

भावार्थः—त्या ब्रह्मासच जाणणारा मृत्यूपासून सुटतो. याला दुसरा मार्गच नाहीं. परमात्म्यास जाणल्यामुळें सर्व पाशांचा नाश होतो, व क्लेश क्षीण झाल्यामुळें तो प्राणी पुनः जन्मास येत नाहीं.

हें मोक्षदायक ज्ञान आपणास मिळावें अशी इच्छा होणें साहजिक आहे. पण ही इच्छाही करण्याचा अधिकार सर्वांसच नसतो.

विवेकचूडामणींत श्री शंकराचार्य ह्मणतातः—

**विवेकिनो विरक्तस्य शमादिगुणशालिनः ।**
**मुमुक्षोरेव हि ब्रह्मजिज्ञासा योग्यता मता ॥**

भावार्थः—जो पुरुष विवेकी, विरक्त व शमादि गुणसंपन्न आहे, व ज्याला मोक्ष मिळविण्याची खरी उत्कंठा झाली आहे, तोच ब्रह्मज्ञान आपणास मिळावें अशी इच्छा करण्यास योग्य आहे, असें मानलें आहे.

पण असें कां असावें? दैवयोगानें ब्रह्मज्ञान प्राप्त होवो अगर न होवो पण तें मिळविण्याची नुसती इच्छाही सर्वांनीं कां करूं नये? मोक्ष हा सर्व पुरुषार्थांत श्रेष्ठ आहे. यास्तव मोक्षप्राप्ती करून देणारें जें ज्ञान, तें आपणास मिळावें अशी इच्छा सर्वत्रांनीं करावी. इच्छा करण्यास काय हरकत आहे? याचें उत्तर असें आहे कीं, इच्छित फल मिळणें जर अशक्य आहे, तर नुसती इच्छा करून काय उपयोग?

आचार्य ह्मणतात:—

**अधिकारिणमाशास्ते फलसिद्धिर्विशेषतः ।**

भावार्थः—अधिकाऱ्यालाच विशेषेंकरून फलसिद्धि प्राप्त होते. ह्मणूनच वर सांगितलेल्या चार गोष्टींची मुमुक्षूला आवश्यकता आहे. यांना साधनचतुष्टय असेंही ह्मणतात. यांचा अभ्यास केला ह्मणजे ज्ञान संपादन करण्याची योग्यता अंगीं येते. ह्मणून ज्यांना ब्रह्मज्ञानाची चाड आहे त्यांनीं या चार साधनांचा अभ्यास अगोदर केला पाहिजे.

आचार्य ह्मणतात:—

**साधनान्यत्र चत्वारि कथितानि मनीषिभिः ।**
**येषु सत्स्वेवसन्निष्ठा यदभावे न सिद्ध्यति ॥**

भावार्थः—ज्ञानी पुरुषांनीं येथें चार साधनें सांगितलीं आहेत. तीं असलीं तरच सद्वस्तूवर निष्ठा बसते, तीं नसलीं तर बसत नाहीं.

मुमुक्षूंनीं हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं, नुसत्या शाब्दिक ज्ञानानें त्यांचा कार्यभाग साधणार नाहीं. मोक्षास ब्रह्मसाक्षात्काराची आवश्यकता आहे. पण सद्वस्तूवर पूर्ण निष्ठा बसल्याशिवाय तिचा साक्षात्कार कसा व्हावा? ह्मणून या चारही साधनांचा विचार आधीं केला पाहिजे.

आतां हीं साधनें कोणतीं, याचें दिग्दर्शन झालेंच आहे. पण याबद्दल विशेष स्पष्टीकरण होणें इष्ट आहे.

आचार्य ह्मणतातः—

**आदौ नित्यानित्यवस्तुविवेकः परिगण्यते ।**
**इहामुत्रफलभोगविरागस्तदनंतरं ॥**
**शमादिषट्कसंपत्तिर्मुमुक्षुत्वमिति स्फुटं ।**

भावार्थः—प्रथम नित्य वस्तु कोणती व अनित्य कोणती याजबद्दल विवेक हें साधन मानिलें आहे. दुसरें साधन, या भूलोकीं व परलोकीं सर्व फलांविषयीं व भोगांविषयीं विरक्ति असणें हें होय; तिसरें शमदमादि षट्संपत्ति, व चौथें मुमुक्षुत्व हें उघड आहे.

अशीं हीं चार साधनें आहेत. त्यांपैकीं पहिलें साधन नित्यानित्यविवेक. याजविषयींच या व्याख्यानांत विचार कर्तव्य आहे. अर्थातच नित्यानित्यविवेक ह्मणजे काय हें प्रथम समजून घेतलें पाहिजे.

आचार्य ह्मणतातः—

**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्येत्येवं रूपो विनिश्चयः ।**
**सोयं नित्यानित्यवस्तुविवेकः समुदाहृतः ॥**

भावार्थः—ब्रह्म हें सत्य (अविनाशी), व हें सर्व जग मिथ्या (नाशिवंत आहे) असा निश्चय होणें हेंच नित्यानित्यविवेकाचें उत्कृष्ट उदाहरण आहे.

नित्य वस्तु कोणती, व अनित्य वस्तु कोणती हें समजलें ह्मणजे नित्यानित्यविवेक झाला. पण असें समजून फायदा कोणता ? व प्रथमतः नित्य वस्तु सत्य कां व अनित्य वस्तु मिथ्या कां मानतात याचा उलगडा झाला पाहिजे.

आपण स्वप्नांत असतां ज्या वस्तु आपणास दिसतात, व जे अनुभव आपणास येतात, ते सर्व खरेच आहेत असा त्यावेळीं आपला निश्चय होतो. पण हा निश्चय फार वेळ टिकत नाहीं. जागें झाल्याबरोबर त्या सर्व वस्तु दिसत नाहींशा होतात व स्वप्नांत जें जें दिसलें तो उगीच भास होता, वास्तविक रितीनें पाहतां खरोखर आपणांपुढें स्वप्नांतील पदार्थांपैकीं कोणताही पदार्थ नव्हता, अशी आपली खात्री होते. ह्मणून स्वप्नांतील पदार्थ व अनुभव सर्व खोटे असें आपण मानतों.

आतां जागृतींत दिसणाऱ्या वस्तु स्वप्नांतील वस्तूंप्रमाणें नाहींशा होत नाहींत, त्या ज्यास्त वेळ टिकतात, व पुनःपुनः त्या सर्व इंद्रियांस गोचर होतात. त्याचप्रमाणें जागृतींतील अनुभवही जास्त वेळ कायम रहातात. ह्मणून स्वप्नांतील वस्तु व अनुभव खोटे, व जागृतींतील खरे, असा आपला निश्चय होतो.

पण नीट व सूक्ष्म दृष्टीनें विचार केला, तर हें जग व या जगांतील वस्तु हीं अविनाशी नाहींत. त्या कमी जास्त प्रमाणानें टिकतात, पण अखेर त्या सर्वांस नाश आहेच. तो नाश होण्यास हजारों, लाखों, वर्षें लागोत, पण अखेर या सर्व वस्तु नाहींशा होणारच.

वासिष्ठ ह्मणतातः—

> यदिदं दृश्यते सर्वं जगत्स्थावरजंगमम् ।
> तत्सुषुप्ताविव स्वप्नः कल्पांते प्रविनश्यति ॥

भावार्थः—हें जें सर्व स्थावर आणि जंगम जग दिसतें, तें, सुषुप्तीमध्यें जसा स्वप्नाचा लय होतो, तसें कल्पान्तीं नाश पावणार.

जगताचा नाश झाल्यावर तें खरोखर होतें, व त्यांतील वस्तूही खरोखरच होत्या असें मानण्यास काय आधार राहील ?

पण काय हो, जगाचा नाश झाल्यावर तें खरें किंवा खोटें याचा विचार करण्यास तरी कोण राहील? जगाबरोबर सर्व प्राण्यांचाही नाश होणारच. नाहीं. शरीराचा नाश झाला तरी आत्मा हा कायम राहाणार. त्याला जन्म व नाश दोन्हीही नाहींत.

भगवद्गीतेंत श्रीकृष्ण ह्मणतात:—

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥**

भावार्थ:—हा आत्मा कधींही जन्म पावत नाहीं, व त्याला मरणही नाहीं, हा उत्पन्न झाला नाहीं व पुढें उत्पन्न होणार नाहीं. हा जन्मरहित नित्य, शाश्वत, व जुना आहे. शरीर मारलें तरी हा मरत नाहीं.

हा आत्मा सृष्टी उत्पन्न होण्याच्या पूर्वी होता, सृष्टिकालींही विकाररहित आहे, व जगाचा अंत झाला तरी हा कायम राहील. तीन्ही कालीं अबाधित रहाणाऱ्या आत्म्याशीं जर या नाशिवंत, व क्षणोक्षणीं विकार पावणाऱ्या जगाची तुलना केली तर आत्मा हा सत्य, व जग हें मिथ्या असाच निश्चय होईल. जशीं आकाशांत अनेक वेळ अभ्रें येऊन नाहींशीं झालीं तरी आकाशाला कोणताही धक्का पोहोंचत नाहीं, त्याचप्रमाणें हें जग अनेक वेळां उत्पन्न होऊन नाहींसें झालें तरी आत्मा जशाचा तसा कायम राहतो. ह्मणून अबाधित सत्यत्व आत्म्याचे ठाईंच आहे. हाच नित्यानित्य-विवेक.

आचार्य अपरोक्षानुभूतींत ह्मणतात:—

**नित्यमात्मस्वरूपं हि दृश्यं तद्विपरीतगं ।**
**एवं यो निश्चयः सम्यग्विवेको वस्तुनः स वै ॥**

भावार्थः—आत्मस्वरूप नित्य आहे व हें दृश्य ( जग ) याच्या उलट ह्मणजे अनित्य आहे, असा जो निश्चय तोच वस्तूविषयीं उत्तम विवेक होय.

हा विवेक मुमुक्षूच्या मनावर पूर्णपणें ठसला ह्मणजे तो या क्षणभंगुर अतएव तुच्छ जगावर व त्यांतील वस्तूंवर लुब्ध न होतां आत्मप्राप्तीविषयीं यत्न करील, या उद्देशानें, तूं आधीं नित्यानित्यविवेक करीत जा, असा उपदेश मुमुक्षूस केला आहे.

श्रीशंकराचार्यांच्या मताप्रमाणेंच इतर थोरथोर साधूंचेंही मत आहे. पण प्रत्येक मुमुक्षूनें परमार्थांत स्वतः सूक्ष्म विचार केला पाहिजे. साधुपुरुष सांगतात तशीच खरी वस्तुस्थिति आहे, अशी त्यानें आपली खात्री करून घेतली पाहिजे. विचार केल्याशिवाय उगीच विश्वासानें दुसरे सांगतील तें कबूल करावें, असा परमार्थांत मुळींच आग्रह नाहीं. विश्वास तर असावा. पण विश्वासाबरोबर विचाराचीही आवश्यकता आहे.

वसिष्ठ ह्मणतातः—

**युक्तियुक्तमुपादेयं वचनं बालकादपि ।**
**अन्यत्तृणमिव त्याज्यमप्युक्तं पद्मयोनिना ॥**

भावार्थः—युक्तीनें खरें ठरणारें वचन एखाद्या बालकापासूनही ग्रहण करावें. तसें नसलेलें ( युक्तिशून्य ) वचन जरी साक्षात् ब्रह्मदेवानें सांगितलें तरी तें तृणासारखें टाकून द्यावें.

सारांश मुमुक्षूनें स्वतः विचार करावा. दुसऱ्यावर सर्वथैव अवलंबून राहूं नये. युक्तीनें, विचारानें, व स्वानुभवानें, जें अखेर खरें ठरेल, त्याचाच स्वीकार करावा. अशी वसिष्ठ मुनिसारख्या

महापुरुषाची त्याला सूचना आहे ह्मणून आतां नित्य कोणतें व अनित्य कोणतें याजबद्दल आपण सविस्तर विचार केला पाहिजे.

या जगांतील कांहीं पदार्थ तरी अत्यंत नाशिवंत आहेत याजबद्दल संशय घेण्यास जागा नाहीं. कारण हें सर्वांचे अनुभवावरून निर्विवाद ठरतें. फुलें सर्वांस अत्यंत आवडतात. तीं किती मनोहर दिसतात! त्यांचा सुगंध तरी किती मोहक असतो! त्यांच्या नाजुकपणाची तर जितकी तारिफ करावी तितकी थोडीच. परंतु थोड्याच वेळानें तीं फुलें साफ कोमेजून जातात व त्यांचें रूप, त्यांचें मार्दव व सुवास हीं सर्व नाहींशीं होतात. त्याचप्रमाणें फळें तरी किती रुचकर व शोभायमान असतात, पण अल्पकालानें तीं कुजून कंटाळवाणी व खाण्यास अयोग्य आणि अपकारक अशीं बनतात.

कांचेचे पदार्थ किती तरी सुबक, चकचकीत, व शोभायमान दिसतात. पण त्यांस जरा जास्त धक्का लागला कीं, तत्क्षणींच त्यांचे फुटून तुकडे होतात. हें सर्वांच्या अनुभवांत आहे. पण याचप्रमाणें आपणास दिसणारे हे सर्व पदार्थ कमी किंवा जास्त मानानें नाशिवंत आहेत. केव्हांना केव्हां तरी त्यांचा नाश होतोच अशी आपली खात्री सूक्ष्मदृष्टीनें बराच वेळ विचार केल्याशिवाय होणार नाहीं.

सर्व प्राण्यांची आयुष्यमर्यादा सारखी नाहीं. कांहीं प्राणी एक दिवस जगतात. कांहीं शंभर वर्षांपेक्षांही जास्त वेळ वांचतात. पण जन्मलेले सर्व प्राणी एकदां कधीं तरी मरणार, हें तत्व अबाधित आहे, व याजबद्दल संशय कोणासही वाटत नाहीं. नवल इतकेंच कीं, आपले आयुष्याचा कधीं तरी अंत होणार हें मनुष्य नेहमीं ध्यानांत ठेवीत नाहीं. असो.

मनुष्यांनीं अविश्रांत श्रम करून बांधलेलीं घरें, वाडे, देवालयें

क्रीडालयें, विद्यालयें वगैरे इमारती आगेंमागें जीर्ण होऊन पडतात. ह्मणून हीं नाशिवंत आहेत असें मनुष्य जाणतो. पण त्यांच्या मानानें स्थिरस्थाई दिसणाऱ्या डोंगरांचाही हवेच्या योगानें व पर्जन्य वृष्टीनें हळूहळू नाश होतो हें समजण्यास जरा कठीण वाटतें. पण आधुनिक शास्त्रवेत्त्यांनीं जे शोध लावले आहेत, त्यांवरून ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते. याप्रमाणें विचार करीत गेलें तर या दृश्य जगांत एक तरी पदार्थ अविनाशी असा मिळेल काय?

जगांतील वस्तूंसंबंधानें दुसरी एक ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट अशी आहे कीं, त्या अस्तित्वांत असतां त्यांचें एक कायम रूप रहात नाहीं. त्यांच्या रूपांत जास्त कमी प्रमाणानें बदल नेहेमीं चालू आहे. मात्र कांहीं वस्तूंच्या रूपांतील फेरफार उघड उघड नजरेस येतो, व कांहींच्या रूपांतील फेरफार सूक्ष्मरीतीनें होत असल्यामुळें तो लक्षांत येत नाहीं.

आकाशांतील अभ्रांचीं रूपें प्रतिक्षणीं बदलतात. पाणी थिजून झालेलें बर्फ, गारा वगैरे पदार्थ पहातां पहातां वितळून जातात, व त्यांचें पुनः पाणी होतें. समुद्राचें रूप, भरती ओट व लाटा यांच्या योगानें क्षणोक्षणीं बदलत असतें.

मनुष्यांचें शरीर बाळपणीं लहान व नाजुक, तरुणपणीं मोठें व सशक्त, व वृद्धपणीं क्षीण व दुर्बल असें होतें, हें सर्वत्रांस माहीत आहेच. त्याचप्रमाणें बीजापासून लहान कोवळें झाड उगवून, तें हळूहळू मोठें व मजबूत होऊन, पुढें त्यास अनेक शाखा फुटून अखेर त्यास फुलें व फळें येतात. याप्रमाणें त्याचें रूपांतर उत्पत्ती-पासून कसकसें होत जातें तें सांगावयास नको. हीं रूपांतरें उघड-पणें सर्वांच्या नजरेस येतात.

पण दिव्याची जोत व नदीचें पात्र हीं बराच वेळपर्यंत तशींच्या तशींच दिसतात, म्हणून त्यांत फरक होत नाहीं, असें समजूं नये. त्यांची एकरूपता हा निवळ भ्रम आहे. कारण नदीचें पाणी क्षणोक्षणीं बदलतें. पात्राच्या कोणत्याही भागांत असलेलें पाणी वाहून जातें, व त्याच्या जागीं दुसरें पाणी येतें, असा क्रम सतत चालू असतो. जुनें व नवें पाणी यांतील सूक्ष्म भेद जाणण्याची शक्ति आपल्या डोळ्यांत नाहीं, म्हणून पात्र जसेंच्या तसेंच आहे, असें आपणास भासतें. त्याचप्रमाणें दिव्याच्या जोतींत तेलापासून बनलेल्या वायूचे नवे परमाणू एकसारखे शिरतात, व जुने परमाणू रूपांतर पावून निघून जातात. तरी ती एकच जोत आहे. व तिजमध्यें कांहींच फेरफार झाला नाहीं, असें आपणास भासतें.

सूक्ष्मदृष्टीनें विचार केला, तर जगांतील सर्व पदार्थांत याचप्रमाणें कमी जास्त प्रमाणानें रूपांतर चालू आहे, अशी आपली खात्री होईल. आतां कित्येक ठिकाणीं हें रूपांतर उघड भासतें, व कित्येक ठिकाणीं तें अति सूक्ष्म असल्यामुळें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं, पण तें चालू आहे हें मात्र निर्विवाद आहे.

कायम दिसणाऱ्या डोंगरांच्या शिळांची उष्णतेच्या योगानें व हवेच्या रासायनिक व्यापारानें, व चलनानें हळूहळू माती होते. ही माती पर्जन्याच्या पाण्यानें वाहून जाऊन, ती नदीच्या पाण्याबरोबर नीच प्रदेशांत येऊन तेथें सांठत जाते. हा फेरफार इतक्या सूक्ष्म रीतीनें चालतो कीं, तो दृष्टोत्पत्तीस येण्यास हजारों किंवा लाखों वर्षें लागतात. पण तो चालू आहे याबद्दल शंका घेण्यास जागा नाहीं. फार तर काय आपल्या अल्प आयुष्याच्या मानानें चिरस्थाई वाटणाऱ्या अशा या भूगोलावरील सर्व प्रदेशांत फेरबदल पूर्वींपासून चालू

आहे. व त्याचें रूपांतर पुष्कळ काळानें दृग्गोचरही होतें. भूकंपाच्या शक्तीनें जो प्रदेश पाण्याखालीं बुडलेला असतो तो उचलला जाऊन त्याचा डोंगर बनतो; व उलट पक्षीं उंच प्रदेशांतील शिळांची वगैरे माती होऊन ती धुऊन जाऊन ते प्रदेश सखल होतात, व ते अतिनीच झाले ह्मणजे पाण्याखालींही बुडतात. याप्रमाणें पृथ्वीवरील प्रदेशांचें रूप कोट्यवधी वर्षांनीं अगदीं बदलून जातें. हें सर्व आधुनिक शास्त्रज्ञांच्या शोधावरून निर्विवाद सिद्ध होतें. मतलब येवढाच कीं, जगांतील कोणत्याही दृश्य वस्तूचें रूप कायम रहात नाहीं.

ह्मणून क्षणोक्षणीं बदलणाऱ्या व अखेर नाश पावणाऱ्या जगताची त्रिकालीं कायम राहाणाऱ्या व सर्वदां विकाररहित सद्वस्तूशीं तुलना केली, तर ब्रह्म सत्य व जगत् मिथ्या अशी मुमुक्षूची खात्री होईल. व अशी खात्री झाली ह्मणजे मुमुक्षूस नित्यानित्याविवेक चांगला समजला असें ह्मणण्यास हरकत नाहीं. असा मुमुक्षू मिथ्यावस्तूंवरील आसक्ति सोडून सत्य असणाऱ्या ब्रह्माच्या प्राप्तीकरतांच यत्न करील, हें सांगावयास नको.

यावर विषयलुब्ध नर अशी शंका घेईल कीं, तुह्मी जगन्मिथ्या व ब्रह्मसत्य असें ह्मणतां, पण आमचा तसा अनुभव बिलकुल नाहीं. सद्वस्तु आह्मास दिसत नाहीं. वास्तविक रीतीनें ह्मणाल तर ती आहे किंवा नाहीं, याबद्दलही आह्मास कांहींच निश्चय करतां येत नाहीं. पण या जगांतील अनेक वस्तू आह्माला रमणीय दिसतात त्या मिळाल्या तर त्यांच्या उपभोगानें आह्माला आनंद होतो. त्या न मिळाल्या तर दुःख होतें. मग त्या प्राप्त करून घेण्याचा यत्न आह्मी कां सोडून द्यावा व या तुमच्या न दिसणाऱ्या सद्वस्तूच्या अन्वेषणानें आह्मास काय उपयोग होईल? या शंकेच्या समाधानाकडे आपण आतां वळलें पाहिजे.

सृष्टींतील सर्व प्राणिमात्र सुखासाठीं यत्न करीत आहेत. आपणास सुख मिळावें अशी सर्वांची इच्छा असते, व तें सुखही क्षणिक नसावें, तें चिरकाल रहावें, असेंच सर्व इच्छितात. पशुपक्ष्यादिकांसही सुख हवें पण त्यांस तारतम्य ज्ञान नसल्यामुळें त्यांना विचार करणें शक्य नाहीं. पण मनुष्यास विचारशक्ति आहे, ह्मणून त्यानें तिचा उपयोग अवश्य करावा. त्यानें आपणास प्रथम असा प्रश्न करावा कीं, या सृष्टींतील कोणत्याही पदार्थाच्या प्राप्तीनें मला नित्य असें सुख मिळेल काय ?

हा प्रश्न फार महत्वाचा असल्यामुळें येथें अतिसूक्ष्म विचार केला पाहिजे. कोणत्याही वस्तूच्या उपभोगापासून चिरकाल सुख होण्यास तीन गोष्टींची आवश्यकता असते. ( १ ) त्या वस्तू चिरकाल कायम राहिल्या पाहिजेत. ( २ ) त्या वस्तूंवरील भोगणाराची आसक्ति कायम राहिली पाहिजे. ( ३ ) त्या वस्तूंचा उपभोग घेणारा कायम राहिला पाहिजे. या तीन्ही अटींचा आपण क्रमानें विचार करूं.

( १ ) इंद्रियांना सुख देणाऱ्या विषयांपैकीं ज्यांस नाश नाहीं असा एक तरी मिळेल काय ? जगांतील आनंददायक वस्तु नाशिवंत आहेत, हें सर्वत्रांस कबूल करावें लागेल. अन्नपानादिकांचा तर उपभोग घेतांनाच नाश होतो; त्याचप्रमाणें अत्तर वगैरे सुगंधिक द्रव्यें अंगास अथवा वस्त्रास लावलीं कीं लौकर नाहींशीं होतात; उत्तम फुलें तोडलीं कीं तीं लगेच कोमेजून जातात. बरें तीं झाडावर राहूं दिलीं, तरी त्यांची शोभा फार वेळ टिकत नाहीं. याचप्रमाणें इतर विषयांचीही स्थिति आहे.

भर्तृहरी ह्मणतात:—

**भोगामेघवितानमध्यविलसत्सौदामिनीचंचलाः।**

भावार्थः—मेघांच्या छतांमध्यें चमकणारी जी वीज तिच्याप्रमाणें विषयांचे उपभोग क्षणभंगूर आहेत.

स्त्री, पुत्र, बंधू, सोयरे व इष्टमित्र यांच्या सहवासानें मनुष्यास सुख होतें ही गोष्ट खरी. पण तें चिरकाल टिकत नाहीं, आणि अखेर त्यांचा वियोग होऊन अनेकावर दुःख भोगण्याचा मात्र प्रसंग येतो. याचप्रमाणें सूक्ष्मदृष्टीनें पाहतां जगांतील सर्व पदार्थ नाशिवंत असल्यामुळें त्यांच्या प्राप्तीनें चिरकाल सुख मिळण्याचा भरंवसा नाहीं. असें असूनही मूर्ख लोक या विषयावर लुब्ध होऊन आपणास विषयसुख प्राप्त झालें तर धन्य मानतात, व तें चिरकाल राहील अशी आशा करतात. पण हा निव्वळ भ्रम आहे.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**मा विनश्यत्वयं भोगो वर्धतामुत्तरोत्तरं।**
**मा विघ्नाः प्रतिबध्नंतु धन्योस्म्यस्मादिति भ्रमः॥**

भावार्थः—हा विषयभोग नाश पावूं नये, हा उत्तरोत्तर वाढत जावा. विघ्नें याच्या आड येऊं नयेत. मी त्यामुळें धन्य आहें. हा सर्व निव्वळ भ्रम आहे.

प्राणी विषयांत सुख मानितात हें खरें, पण ते जर विवेकदृष्टीनें नीट पहातील, तर अत्यंत प्रिय अशा अनेक वस्तूंपासून त्यांना प्रसंगवशात् किती दुःख भोगावें लागतें, हें कळूं लागेल. पहा, आपणास पुत्र व्हावा अशी सर्वत्रांस इच्छा आहेच व पुत्र झाला तर सर्वांस अत्यानंद होतो यांत संशय नाहीं. त्या पुत्रावर जीवापलीकडे प्रेम बसतें, व त्याचें बाळपणींचें कौतुक पाहून परमाल्हाद

होतो. असो. या अत्यंत प्रिय वस्तूविषयीं जगाकडे पाहून करुणार्द्र अंतःकरणानें साधुपुरुष काय ह्मणतात तें पहाः—

**पुत्रः स्यादिति दुःखितः सति सुते तस्यामये दुःखितः ।**
**तद्दुःखादिकमार्जने तदनये तन्मूर्खतादुःखितः ।**
**जातश्चेत्सुगुणोथतन्मृतिभयं तस्मिन्मृते दुःखितः ।**
**पुत्रव्याजमुपागतो रिपुरयं मा कस्यचिज्जायतां ॥**

भावार्थः—मला पुत्र व्हावा पण तो होत नाहीं ह्मणून दुःखित. पुत्र झाल्यावर त्याला रोग झाला तर दुःखित. पुत्राला दुःख झालें तर तें नाहींसें करण्याकरितां कष्टी. त्यानें दुराचरण केलें तर त्यामुळें, तो मूर्ख निघाला तर त्यामुळें अत्यंत खेदयुक्त. बरें दैववशात् तो सद्गुणी निपजला तर तो मरेल काय ह्मणून भय वाळगतो. तो मेला तर अर्थात अति दुःखित. ह्मणून हा पुत्ररूपानें येणारा शत्रू कोणासही नसावा.

हें साधुपुरुषांचें वचन सांसारिकांस रुचेल काय ? ज्यांस पुत्र झाला नाहीं, त्यांचें या वचनानें समाधान होईल काय ? नाहीं. हें उघड आहे. पण यासंबंधानें साधुपुरुषांकडे काय दोष येतो ? ते सांगतात तशीच वस्तुस्थिति आहे, हें जगाच्या व्यवहाराकडे पाहिलें ह्मणजे सहज दिसून येईल. असो. विषयी पुरुषांची स्थिती पाहिली तर ते विषयांवर लुब्ध असतातच, पण सत्पुरुष या मोहांतून कसे सुटतात ? कारण हीं सर्व सुखें क्षणभंगुर आहेत अशी त्यांची खात्री असते. आणि ह्मणूनच ते या जगावर लुब्ध होत नाहींत.

पंचदशींत ह्मटलें आहेः—

**स्वप्नेंद्रजालसदृशमचिंत्यरचनात्मकं ।**
**दृष्टनष्टं जगत्पश्यन्कथं तत्रानुरज्यति ॥**

भावार्थः—स्वप्न व इंद्रजाल याप्रमाणें असणारें, ज्याची रचना अतर्क्य आहे असें, व पाहतां पाहतां ज्याचा नाश होतो अशा क्षणभंगुर जगताकडे पाहून तो त्यावर कसा आसक्त होईल ?

जगताच्या नाशाला वास्तविकपणें कोट्यवधी वर्षें लागतात. पण त्यांतील उपभोग क्षणभंगुर आहेत, याजबद्दल मात्र विवाद नाहीं; आत्म्याबरोबर जर जगाची तुलना केली तर तेंही विचारदृष्ट्या क्षणभंगुरच ठरतें. ह्मणून या नाशिवंत जगतापासून कायमचें सुख कसें मिळेल ?

(२) बरें हें असूंद्या. कोणत्याही वस्तूपासून चिरकाल सुख व्हावयाचें तर त्या वस्तूवरील आपली आसक्ति कायम राहिली पाहिजे. पण तशी ती राहते काय ? सर्व मनुष्यप्राण्याचा अनुभव याच्या उलट आहे. त्यांना नित्य नवें नवें सुख पाहिजे.

पंचदशींत आत्मानंदांत ह्मटलें आहे:—

**एकं त्यक्त्वान्यदादत्ते सुखं वैषयिकं सदा ।**

भावार्थः–प्राणी एका प्रकारचें विषयसुख टाकून दुसऱ्या तऱ्हेचें विषयसुख नेहमीं घेत असतो.

हें प्रथमतः चमत्कारिक दिसतें पण अनुभवानें हें सिद्ध होतें. मनुष्यास अनेक प्रकारचें सुख पाहिजे हें तर खरेंच. पण आज जी वस्तु पाहिजे, जिच्या उपभोगानें आज सुख खरोखर होतें, तीच वस्तू उद्यां त्याचप्रमाणें इष्ट राहील अशी खात्री कधींही नसते.

एकाच तऱ्हेच्या फलांचें अथवा अन्य रुचकर पदार्थांचें वारंवार सेवन केलें, तर अखेर त्यावर मनुष्याचें मन विटतें, व तो पदार्थ खाववेनासा होतो, हा अनुभव सर्वत्रांस आहे. एकाच तऱ्हेच्या उत्तम सुवासाचाही अखेर कंटाळा येतो. रोज रोज तेंच गाणें ऐकिलें,

किंवा तोच उत्तम देखावा पाहिला, तर हळू हळू त्यांतील चमत्कार व अखेर त्यांपासून होणारें सुख नाहींसें होतें, आणि त्याविषयीं औदासिन्य उत्पन्न होतें. नित्य नव्या नव्या वस्तू उपभोगास पाहिजेत असें सर्व विषयी पुरुषांस वाटतें. सारांश जगांतील सर्व वस्तूंसंबंधाचें सुखसापेक्ष असल्यामुळें, जिच्या प्राप्तीनें कायमचें सुख मिळेल अशी जगतांत एकही वस्तू नाहीं. थांबा, इतके उताविळ होऊं नका. या जगतांत एक अशी चमत्कारिक वस्तू आहे किं, तिच्यासंबंधानें वरील तऱ्हेचा अनुभव येत नसतो. नित्य नवे नवे उपभोग मिळवून देण्याची शक्ति तिच्या अंगीं असल्यामुळें तिजवर मन कधींच कंटाळत नाहीं. तिजवर सर्व मनुष्य कमी जास्त प्रमाणानें आसक्त असतात. तिच्याविषयीं उदासीन असणारा पुरुष विरळा. ती वस्तू या जगांतील सर्व सुखोपभोग मिळण्याचें साधन असल्यामुळें ती सर्वांस अति प्रिय आहे. ही वस्तू धन होय हें सांगावयास नको. या धनासंबंधानें आपलें काय ह्मणणें आहे? धनवान पुरुषास सर्व तऱ्हेच्या सुखोपभोगाच्या वस्तू विकत घेतां येतात. व शिवाय जेथें जाईल तेथें त्यास मान मिळतो. सर्व लोक त्याच्या आर्जवांत रहातात. त्याचा कोणी कंटाळा करीत नाहींत. यासाठीं धन सर्वांस पाहिजे हें सांगावयास नको. व त्याप्रमाणें लौकिकदृष्ट्या उपदेशही होत असतो.

पंहा:—

> **धनमर्जयकाकुत्स्थ धनमूलमिदं जगत् ।**
> **अंतरं नैवपश्यामि निर्धनस्य मृतस्य च ॥**

भावार्थ:—हे ककुत्स्थाच्या वंशांतील पुरुषा, तूं धन मिळीव. कारण हें जग धनावर अवलंबून आहे. मला तर निर्धन पुरुषांत आणि मृतशवांत कांहीं फरक दिसत नाहीं.

हा उपदेश केवळ रघुवंशांतील राजांकरतांच नव्हे, तर सर्व जगतांतील मनुष्यमात्रांकरतां आहे. कारण सर्वांस पैशाची जरूर आहे, व निर्धन पुरुषास फार कष्ट सोसावे लागतात.

भर्तृहरी ह्मणतात:-

**धनेभ्यः परो बांधवोनास्ति लोके ।**
**धनान्यर्जयध्वं धनान्यर्जयध्वं ॥**

भावार्थ:-धनापेक्षां मोठा सोयरा या जगांत कोणीही नाहीं. ह्मणून धन मेळवा हो धन मेळवा.

यावर कोणी शंका घेतील कीं, धनापेक्षां दुसऱ्या चांगल्या व स्पृहणीय गोष्टी या जगतांत नाहींत काय ? विद्या तर सर्वांत श्रेष्ठ आहे. विद्वानास सर्वत्र मान मिळतो. राजापेक्षांही विद्वान श्रेष्ठ आहे. कारण चाणक्य ह्मणतात:—

**विद्वत्वं च नृपत्वं च नैव तुल्यं कदा च न ।**
**स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ॥**

भावार्थ:-विद्वत्व आणि नृपत्व हीं कधींही एकसारखीं होणार नाहींत. कारण राजाला आपल्याच देशांत मान मिळतो पण विद्वान सर्वत्र पूज्य असतो.

हें कांहीं अंशीं खरें आहे. पण सर्वत्र ज्यांस मान मिळतो असे फारच थोडे विद्वान असतात. बहुतेक बिचाऱ्या विद्वानांवर लक्ष्मीची अवकृपा असते, व तिच्या वडील बहिणीची पूर्ण दृष्टी असल्यामुळें त्या बिचाऱ्यांस अनेक कष्ट भोगावे लागतात, व अनेक प्रसंगीं अपमान सोसावा लागतो. लौकिकदृष्टचा तर अनुभव असा दिसतो कीं,

**विद्यावृद्धा वयोवृद्धा ये च वृद्धास्तपोबलैः ।**
**ते सर्वे धनवृद्धानां द्वारि तिष्ठन्ति किंकराः ॥**

भावार्थः—जे विद्येनें वृद्ध झाले, जे वयोवृद्ध, व जे तपोबलानें थोर झाले आहेत, ते सर्व धनानें वृद्धी पावलेल्या मनुष्याच्या दारांत चाकर होऊन उभे रहातात.

यासाठीं सर्व लौकिकदृष्टया पहाणारे पुरुष धनाचीच अपेक्षा करतात. त्यांना धनाशिवाय दुसरें कांहीं न मिळालें तरी चालेल. पण विपुल धन मात्र पाहिजे.

अशा पुरुषांचें काय ह्मणणें असतें तें भर्तृहरी सांगतातः—

**जातिर्यातुरसातलं गुणगणस्तस्या प्यधो गच्छतु ।**
**शीलं शैलतटात्पतत्वभिजनः संदह्यतां वन्हिना ॥**
**शौर्ये वैरिणि वज्रमाशु निपतत्वर्थोस्तु नः केवलं ।**
**येनैकेन विना गुणास्तृणलवप्रायाः समस्ता इमे ॥**

भावार्थः—जाती पाताळास जावो. गुणांचा समुदाय त्याच्याही खालीं जाऊन पडो. सदाचरण डोंगराच्या कड्यावरून खालीं पडो. बंधुसोयऱ्यांचें अग्नीनें भस्म होवो. शौर्य ह्या शत्रूवर वज्राचा पात होवो. आह्माला केवळ धन मात्र मिळो, कारण तें एकटें जर नसलें तर हे सर्व गुण तृणवत् तुच्छ होतात.

असो. धनाचा सर्वत्रांस उपयोग आहे. धनापासून सर्व तऱ्हेचें सुख मिळवितां येतें. धनापासून मान वगैरे मिळतो. ह्मणून धन प्राप्त झालें तर कायमचें सुख कां मिळूं नये ? हा प्रश्न फार महत्वाचा आहे. धनाची मोहकता अनिर्वर्णनीय आहे. सन्मार्गापासून मनुष्यास च्युत करण्यास धन हेंच मुख्यत्वें करून कारण होतें. ह्मणून धनापासून नेहेमीं सुख मिळतें काय, हें अवश्य बारकाईनें पाहिलें पाहिजे.

धनप्राप्तीपासून अनेक फायदे आहेत. धनप्राप्ती झाली तर मनुष्यास अनेक रीतीनें सुखप्राप्ती होते, इकडे सर्वांचें लक्ष सहज जातें, व ह्मणूनच धन हें सुखकर आहे, असा सर्वांचा समज होतो. पण या धनासाठीं किती त्रास सोसावे लागतात, किती चिंता वहावी लागते, किती दुःख भोगणें भाग पडतें, इकडे कोणी लक्ष देत नाहीं.

पद्य:—

**अर्थानामर्जने क्लेशस्तथैव परिपालने ।**
**नाशे दुःखं व्यये दुःखं धिगर्थान् क्लेशकारिणः ॥**

भावार्थ:—पैसा मिळवितांना कष्ट सोसावे लागतात. तो मिळाल्यावर त्याच्या संरक्षणाकरितां कष्ट होतात. पुढें त्याच पैशाचा नाश झाला तर, अथवा तो खर्च करण्याचा प्रसंग आला तर दुःख होतें. ह्मणून क्लेशकारक या द्रव्याला धिक्कार असो.

प्रथम द्रव्य मिळविण्याकरितां किती कष्ट सोसावे लागतात याचा विचार करूं. कष्ट करूनही द्रव्य मिळतेंच याचा भरंवसा तर नाहींच. पण नुसत्या यत्नासाठीं काय काय दुःख भोगावें लागतें तें पाहूं. प्राचीन काळीं बिचाऱ्या विद्वान ब्राह्मणांस धनवान पुरुष किंवा राजे यांजकडे जाऊन याचना केल्याशिवाय धन मिळविण्याचा मार्ग नव्हता. आतां क्वचित् अयाचितही धनलाभ त्यांस होत असे. पण विरळा. सध्यांही या बिचाऱ्यांची अशीच किंवा याहूनही निकृष्ट स्थिती आहे. अशा विद्वान भिक्षुकांपैकीं एक आपला अनुभव अति खेदानें सांगतो.

**जन स्थाने भ्रांतं कनकमृगतृष्णान्धितधिया ।**
**वचो वैदेहीति प्रतिपदमुदश्रुप्रलपितं ॥**

कृता लंकाभर्तुर्वदनपरिपाटीषु घटना ।
मयाप्तं रामत्वं कुशलवसुता नत्वधिगता ॥

भावार्थः—( हा श्लोक द्व्यर्थी आहे. याचे श्लेषानें दोन अर्थ होतात. भिक्षुक ह्मणतो, ) रामानें जें जें केलें तें तें मींही केलें ह्मणून मी रामासारखा झालों. पहा, कनकाचा मृग मिळावा या हेतूनें रामानें जनस्थानांत भ्रमण केलें. तसेंच मींही कनकाच्या मृगतृष्णेनें जनांच्या स्थानीं फिरलों. रामचंद्रानीं ( सीताहरणानंतर ) हे वैदेही! हे वैदेही ! असे उद्गार अश्रु टाकून पदोपदीं काढले. मींही लोकांना देहीं, देही (द्या हो द्या) असें पावलोपावलीं अश्रू टाकून बोललों. श्रीरामानें लंकेचा राजा जो रावण त्याची वदन पंक्ती तोडून टाकिली. मींही कुत्सित पण धनवान यांच्या कपाळास अनेकवार आठ्या येतील असें केलें. याप्रमाणें रामचंद्रासारखा तर मी बनलोंच पण त्यांना अखेर कुशलवांची माता जानकी प्राप्त झाली, पण मला मात्र कुशलवसुता ( यथेच्छ धनप्राप्ती ) झाली नाहीं.

यांत नवल मानण्यासारखें कांहीं नाहीं. कारण कलियुगांतील दाताच फार उदार, मग बिचाऱ्या भिक्षुकांस काय कमी ?

दूरादर्थिनमाकलय्य भजते सद्यो विरूपाक्षतां ।
संगे किं च विरोचनत्वमथसंस्थाने नृसिंहाकृतिं ।
पांडित्योक्तिषु वक्रतुंडरचना दाने त्वपर्णात्मता ।
एकः पंचसुरात्मकः प्रभुरसौ भाग्यैः कलौ लभ्यते ॥

भावार्थः—या कलियुगामध्यें महद्भाग्यानें आपण एकच असून पांच देवांचें साम्य करणारा प्रभू याचकास मिळतो. पहा, लांबून भिक्षुकाला पाहिल्याबरोबर हा डोळे वेडे वांकडे करतो ( व त्यामुळें विरुपाक्ष जो शंकर त्यासारखा होतो ). इतकेंही करून तो भिक्षुक

जर जवळ आलाच तर उघड रीतीनें हा आपली अरुची दाखवितो ( व ह्मणून विरोचन जो अग्नी त्याचें रूप धारण करतो ). यापुढें धैर्य धरून जर तो भिक्षुक खालीं बसलाच तर हा रागानें नृसिंहरूप दाखवितो. यावरही त्या भिक्षुकानें आपलें पांडित्य दाखवायास जर शास्त्रांतील कांहीं ह्मणण्यास प्रारंभ केला, तर हा तोंड वांकडें करतो ( व वक्रतुंड जो गणपती त्याचा अवतार बनतो ). अखेर जर दान देण्याचा प्रसंग आला तर एक पानही देत नाहीं ( व यास्तव अपर्णाजी पार्वती तिज समान होतो ).

वाहवारे दाता ! पण धन्य आहे त्या भिक्षुकांची कीं, अशा दात्या-जवळही अनेक वार याचना करावयास ते चुकत नाहींत.

याचना ही सर्वांत निंद्य मानिली आहे, व याचनेपासून अनेक-वार द्रव्य न मिळतां उगीच अपमान मात्र होतो यांत नवल नाहीं. पण द्रव्य मिळविण्याचे दुसरे अनेक मार्ग आहेत. त्यांत यश कां येऊं नये ? उद्योग केला तर फल मिळण्याची आशा तर असतेच. पण अनेक वार दैव सिद्धीच्या आड येतें, व केलेले सर्व प्रयत्न निष्फळ होतात. एका अति उद्योगी व साहसी मनुष्याचा अनुभव पहा:—

भर्तृहरी ह्मणतात:—

**उत्खातं निधिशंकया क्षितितलं ध्माता गिरेर्धातवः ।**
**निस्तीर्णः सरितां पतिर्नृपतयो यत्नेन संसेविताः ।।**
**मंत्राराधनतत्परेणमनसा नीताः श्मशाने निशाः ।**
**प्राप्तः काणवराटकोऽपि न मया तृष्णेऽधुना मुंच मां ।।**

भावार्थ:—एखादें गुप्त धन मिळेल काय ह्मणून जमीन खणली. डोंगरांतील धातू मिळविण्याकडे बरेंच लक्ष दिलें. समुद्र ओलांडून

गेलों. राजे लोकांची यत्नानें सेवा केली. मंत्रसिद्धि व्हावी ह्मणून स्मशानांत रात्री काढल्या. पण इतकें करून एक फुटकी कवडीही मिळाली नाहीं. आतां हे तृष्णे, मला सोड.

असो. पैसा मिळविण्यास सर्वांसच त्रास पडत नाहींत. कांहीं भाग्यवान पुरुषांना तो सहज मिळतो. तरी पण पैसा मिळाल्यावर तो नाहींसा होईल ह्मणून काळजी असतेच, व ती वास्तवीकही आहे. द्रव्यवान पुरुषास अनेक बाजूंनीं भीती असते. त्याच्या द्रव्याचा अनेक तऱ्हेनें नाश होण्याचा संभव असतो. शिवाय अशा मनुष्यांच्या भोंवतीं धनाच्या आशेनें लोभीं लोक घिरट्या घालीत असतात, व त्यांना लुटण्याचा प्रयत्न एकसारखा चालू ठेवितात.

**यथामिषं जले मत्स्यैर्भक्ष्यते श्वापदैर्भुवि ।**
**आकाशे पक्षिभिश्चैव तथा सर्वत्र वित्तवान् ॥**

भावार्थः—ज्या प्रमाणें मांसाच्या तुकड्यास पाण्यांत मासे खातात, जमीनीवर हिंस्त्र पशू खातात, व आकाशांत पक्षी खातात, त्याप्रमाणें धनवान् पुरुषाला सर्वत्र लुटतात.

ऐश्वर्यवान् पुरुषांस परक्या लोकांपासूनच भय असतें असें समजूं नये.

आचार्य ह्मणतातः—

**पुत्रादपि धनभाजां भीतिः । सर्वत्रैषा विहिता रीतिः ॥**

भावार्थः—धनवान् पुरुषांस आपल्या पुत्रापासूनही भीति असते असा प्रकार सर्वत्र आहे.

हीं आचार्यांची उक्ति प्रथमतः जरा आश्चर्यकारक दिसते. पण इतिहासांत औरंगझेबासारख्या पुत्रानें आपले पित्यास पदच्युत करून

आपण गादीवर बसल्याचीं उदाहरणें सांपडतात. ह्मणून धनवानास आपल्या पुत्रापासूनही भय असतें, असेंच सिद्ध होतें. व जर, प्रत्यक्ष पुत्राचा विश्वास करवत नाहीं, तर कोणाचा करावा ? असो.

धन मिळविण्याकरितां कष्ट सोसावे लागतात, व तें मिळाल्यावरही तें राखण्याकरतां अविश्रांत श्रम पडतात. इतकें असूनही तें जर चिरकाल रहातें, तर बरें असतें. पण तसाही प्रकार नाहीं. थोडें धन खर्चामुळें नाहींसें होतें, व धन खर्चल्यामुळें दुःख होतें. बरें तें धन विपुलसें असलें, व खर्चून संपण्यासारखेंही नसलें, तरी त्याला कोणच्या बाजूनें धोका बसेल तें सांगतां येण्यासारखें नाहीं. पण इतकें खरें कीं, धनवानास निर्धास्त बसवत नाहीं.

**लक्ष्म्या परिपूर्णोहं न भयं मेऽस्तीति मोहनिद्रैषा ।**
**परिपूर्णस्यैवेंदोर्भवति भयं सिंहिकासूनोः ॥**

भावार्थः—मी लक्ष्मीनें परिपूर्ण आहे, मला कांहीं एक भय नाहीं, ही मोहाची निद्रा आहे. कारण पूर्णचंद्रासच राहूचें भय असतें.

लक्ष्मी तर बोलून चालून चंचल आहे, हें सर्वांस माहीत आहे. आज श्रीमंती आहे ह्मणून उद्यां ती राहील अशी खात्री नसते. गरीब श्रीमंत होतात व श्रीमंतांस गरिबी येते अशी घडामोड जगतांत नेहेमीं चालू आहे.

योगवासिष्ठांत जनक ह्मणतोः—

**अद्य ये मूर्ध्नि महतां ते दिनैर्निपतंत्यधः ।**
**हंत चित्तमहत्तायाः केयं विश्वस्तता तव ॥**

भावार्थः—आज जे मोठमोठाल्या लोकांच्या मस्तकावर आहेत ते कांहीं दिवसांनीं खालीं पडतात. ह्मणून हे मना, तुला या मोठेपणाविषयीं काय भरंवसा वाटतो ?

आतां कित्येक पुरुष इतके दैववान असतात कीं, त्यांस एकसारखें ऐश्वर्य भोगावयास सांपडतें. त्यांच्या शत्रूंचा त्यांजवर कांहीं इलाज चालत नाहीं. त्यांच्या धनाचा लेशही कमी होत नाहीं, व त्यांचा मोठेपणा अबाधित राहतो. अशा भाग्यवान पुरुषांत सार्वभौम शककर्ते राजांची तुलना कोणीही करूं शकणार नाहीं. पण विक्रमासारखे शककर्ते महान् पुरुष आतां कोठें आहेत ? त्यांच्या त्या मोठ्या ऐश्वर्याची काय वाट झाली ?

भर्तृहरी ह्मणतातः—

**सा रम्या नगरी महान्सनृपतिः सामंतचक्रं हि तत् ।**
**पार्श्वे तस्य च सा विदग्धपरिषत्ताश्चंद्रबिंबाननाः ॥**
**उन्मत्तः स च राजपुत्रनिवहस्ते बंदिनस्ताः कथाः ।**
**सर्वं यस्यवशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ॥**

भावार्थः—ती सुंदर नगरी, तो मोठा राजा, तो मांडलीक राजांचा व प्रधान वगैरे मंडळीचा समुदाय, ती बाजूकडे बसलेली विद्वानांची सभा, त्या चंद्रासारख्या सुंदर स्त्रिया, उन्मत्त राजपुत्रांचा तो मेळा, ते बंदिजन, व त्यांच्या त्या कथा, हें सर्व ज्याच्या योगानें ( नाहींसें होऊन ) फक्त स्मरण करण्याजोगें झालें, त्या कालास नमस्कार असो.

सारांश जर चक्रवर्ती राजांच्या ऐश्वर्याची ही स्थिती, तर क्षुल्लक ऐश्वर्यास भुलून राहण्यांत काय मतलब ? ह्मणून हें धन जितकें रमणीय व मोहक दिसतें, तितकें तें विचारदृष्ट्या सुखावह नाहीं. शिवाय धनवान् पुरुष सुखी असतात असा तरी कोठें नियम आहे ? संपत्ती असूनही जर एकुलता एक पुत्र दुर्दैवानें मेला तर त्या

संपत्तीचा त्या बिचारे आपास काय उपयोग? तो तिजवर विरक्त होऊन हाय हाय करीत बसतो.

या सर्व विचारांवरून धनाच्या अंगींही कायमचें सुख देण्याची शक्ति नाहीं असेंच निर्विवाद ठरतें. आतां आपण तिसऱ्या अटीचा विचार केला पाहिजे.

(३) दृश्यपदार्थांचा उपभोग देहावांचून व इंद्रियांवांचून घेतां येत नाहीं. सर्व ऐहिक उपभोग या देहाकरतां असतात. हा देह तरी कायम रहातो काय?

**निखिलं जगदेव नश्वरं पुनरस्मिन्नितरां कलेवरं।**
**अथ तस्य कृते कियानयं क्रियते हंत जनैः परिश्रमः॥**

भावार्थः—सर्व जगत् तर नाशिवंत आहेच. पण त्यांतही हा देह फारच नाशिवंत आहे. असें असूनही याजकरतां लोक काय परिश्रम करताहेत तें पहा!

या भूलोकास मृत्युलोक ह्मणतात. त्यांतील प्राणी मृत्युमुखीं बळी पडत असल्यामुळें ते नाशिवंत आहेत, याजबद्दल वाद नाहीं. पण महान् महान् देवादिकही मृत्यूच्या तडाख्यांतून सुटले, असें मात्र समजूं नये. त्यांचें आयुष्य मानवी प्राण्यापेक्षां फार मोठें हें निर्विवाद आहे, तरी त्यांच्या आयुष्यासही अखेर अंत होतो. ह्मणून तेही चिरकाल रहाणारे नव्हत.

ब्रह्मदेवाचें आयुष्य आपणास जवळ जवळ असंख्यच वाटणार. पण त्यालाही मर्यादा आहे. पहा—

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**सहस्रयुगपर्यंतं अहर्यद्ब्रह्मणोविदुः।**
**रात्रिं युगसहस्रांतां ते होरात्रविदो जनाः॥**

भावार्थः—सहस्रयुगपर्यंत ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो, व आणखी सहस्रयुगें गेलीं ह्मणजे एक रात्र संपते, हें ( योगबलानें ) जे जाणतात ते अहोरात्र जाणणारे पुरुष ह्मणावे.

हजारों वर्षे लोटल्यावर एक युग होतें, व अशीं हजार युगें गेलीं ह्मणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो, व दुसरीं हजार युगें गेलीं ह्मणजे एक रात्र होते. हें ब्रह्मदेवाचें दिवसमान झालें. याप्रमाणें मोठे दिवस तीनशें साठ गेले ह्मणजे ब्रह्मदेवाचें एक वर्ष होतें. व अशीं शंभर वर्षें ब्रह्मदेवाचें आयुष्य आहे. पण याही आयुष्याचा अखेर अंत होतोच. ह्मणून ब्रह्मदेवाचा देहही नाशिवंतच ठरतो.

ब्रह्मदेवाहूनही जास्त आयुष्याचे देव विष्णू व शंकर हे आहेतच. पण त्यांचाही अंत व्हावयाचा. मग आपल्या या अल्प आयुष्याचा काय भरंवसा ?

योगवासिष्ठांत जनक ह्मणतो:—

**कोटयो ब्रह्मणो याता गतासर्गपरंपरा ।**
**प्रयाता पांसुवद्भूपाः का धृतिर्मम जीविते ॥**
**येषां निमेषणोन्मेषौ जगतां प्रलयोदयौ ।**
**तादृशाः पुरुषा नष्टा मादृशां गणैनव का ॥**

भावार्थः—ब्रह्मदेवाच्या कोटीच्याकोटी गेल्या, सृष्टींची परंपरा नाहींशी झाली, राजे तर धुळीप्रमाणें गेले, मग माझ्या जीविताची शाश्वती काय ?

ज्यांचे डोळे लवून बंद झाले कीं जगताचा प्रलय होतो, व डोळे लगेच फिरून उघडले कीं जग उत्पन्न होतें, असे पुरुषही नष्ट झाले, मग मजसारख्यांची गणना काय ?

ज्यांचे पापणी हालविण्याच्या वेळांत जग उत्पन्न होऊन त्याचा कल्पांत होतो. असे पुरुषांचें आयुष्य किती मोठें ! पण त्यालाही अंत आहे. मग विचाऱ्या मानवी प्राण्याच्या आयुष्याची काय कथा ?

असें हें नाशिवंत शरीर एकदां पडलें कीं त्यासाठीं जन्मवर जी खटपट केली तिचा काय उपयोग ? शरीरसुखासाठीं जीं साधनें मिळविलीं त्यांचा देहास अंत झाल्यावर कोण उपभोग घेणार ! तीं असून नसून सारखींच ना !

**चेतोहरा युवतयः सुहृदोऽनुकूलाः ।**
**सद्बांधवाः प्रणयगर्भगिराश्च भृत्याः ॥**
**मातंगमत्तनिवहास्तरलास्तुरंगाः ।**
**संमीलने नयनयोर्नहि किंचिदस्ति ॥**

भावार्थः—मनमोहक स्त्रिया, अनुकूल असे मित्र, चांगले सोयरे, नम्रतेनें बोलणारे नौकर, मत्त हत्तींचे समुदाय, व चपल घोडे, हें सर्व एकदां डोळे झांकले कीं नसल्याप्रमाणें होतें ( ह्मणजे असून निरुपयोगी होतें ).

मरणापर्यंतही वाट पहावयास नको. वृद्धापकाळ अनेक मनुष्यांस येतो, तेव्हां त्यांचे शरीराची काय दशा होते, हें सर्वांस माहित आहेच.

ज्ञानेश्वर महाराज ह्मणतातः—

**निर्दैवाचे व्यवसाय । तैसे ठाकती हातपाय । अमंत्री राजाची परि आहे । बळा यया ॥ पद्मदळेसीं इसाळे । भांडताति हे डोळे । ते होती पडवळें । पिकलीं जैसीं ॥ भोंवइचीं पडळें । वोमथती शिनसाळें । उरकुहिजेल जळें । आसुवाचेनि ॥ जैसें बाभुळीचें खोड । गिरबडूनि जाती सरड । तैसें पिचडि तोंड । सरकटिजेल ॥ वाचेसि अपवाड । कानीं अनुघड । पिंडगरुवा माकड । होईल हा ॥**

अशी स्थिती झाल्यावर विषयसुखाचा उपभोग कसा घेतां येईल ! सारांश विषयांच्या सेवनानें नित्यसुख मिळणार नाहीं, हें निर्विवाद सिद्ध होतें.

तर मग शाश्वत सुख कसें मिळेल, व तें कोणास मिळावयाचें, हा प्रश्न सहज उत्पन्न होतो. त्याचा विचार अवश्य कर्तव्य आहे.

मनुष्यप्राण्याचा देह नाशिवंत आहे याबद्दल मतभेद असणें शक्य नाहीं. व या देहासंबंधाचें जितकें सुख तितकें सर्व नाशिवंत आहे, असें ह्मणण्यास कांहीं एक हरकत नाहीं. पण मनुष्य प्राणी हा केवल देहमय नाहीं. तो मी देह असें ह्मणत नाहीं. तो माझा देह, माझीं इंद्रियें माझें मन असें ह्मणतो. ह्मणून असें ह्मणणारा जो कोणी आहे, तो मनातीत, देहातीत, इंद्रियातीत असला पाहिजे. हा कोण ?

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनः षष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥**

भावार्थः—माझाच सनातन अंश जीवलोकांत जीव होऊन प्रकृतींत असलेलीं मन व पांच इंद्रियें यांचें आकर्षण करतो.

याला जिवात्मा असें ह्मणतात. हा अविनाशी व अमर आहे.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥**
**अच्छेद्योयमदाह्योयं अक्लेद्यो शोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोयं सनातनः ॥**

भावार्थः—याला शस्त्रें तोडूं शकत नाहींत, अग्नी जाळूं शकत नाहीं, उदक भिजवीत नाहीं, व वायू शोषूं शकत नाहीं. हा तोडला

जात नाहीं, जळत नाहीं, भिजविला जात नाहीं, व याचें शोषण होत नाहीं. हा नित्य, सर्वव्यापी, अचल, स्थिर, व सनातन असा आहे.

याचें वास्तव्य स्थान कोणतें असें विचारलें तर त्यांचें उत्तर श्रीकृष्ण देतातः—

**देही नित्य मवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ॥**

भावार्थः—हा नित्य व अमर आत्मा सर्व प्राण्यांच्या देहांत असतो.

याला प्रमाण काय? आह्मास हा आत्मा कधींच दिसत नाहीं. मग तो आहे असें आह्मी कां मानावें? प्रत्यक्ष प्रमाण असल्याशिवाय आह्मी हें खरें मानणार नाहीं.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितं ।**
**यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥**

भावार्थः— ( शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ) यत्न करणारे योगी याला आपले अंतःकरणांत पहातात. पण विषयी व विवेकहीन पुरुषांनीं यत्न केला तरी तो त्यांस दिसत नाहीं.

ह्मणून ज्यांना या आत्म्यास पहाण्याची इच्छा आहे त्यांनीं शास्त्रोक्त-रीत्या योगाभ्यास केला पाहिजे. पण काय हो, शरीर तर नाश पावतें, मग शरीराचा नाश झाल्यावर याची काय वाट?

श्रीकृष्ण ह्मणतातः-

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृण्हाति नरोपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानिसंयाति नवानि देही ॥**

भावार्थः—ज्याप्रमाणें जीर्ण वस्त्रें टाकून मनुष्य दुसरीं नेसतो, त्याचप्रमाणें जुनीं शरीरें टाकून आत्मा नव्या शरीरांत जातो.

शास्त्रांतील प्रसिद्ध जे त्वंपद त्याचा हा जीवात्मा वाच्य आहे. प्रत्येक प्राण्याच्या अंतःकरणांत राहून 'अहं' ह्मणजे मी ह्मणणारा हाच.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहे:—

**आलंबनतया भाति योस्मत्प्रत्ययशब्दयोः ।**
**अंतःकरणसंभिन्नबोधः सत्वंपदाभिदः ॥**

भावार्थः—जो अंतःकरणोपाधिक आत्मा अहंप्रत्यय व अहं शब्द यांजवर अवलंबन केलेला असा भासतो, तो त्वंपदार्थ असें जाणावें.

देह नाशिवंत व जड आहे. पण हा जीवात्मा अमर व ज्ञानवान् असोन सुख दुःख हाच भोगतो. याला नाशिवंत वस्तूचा लाभ झाला तरी कायमचें सुख प्राप्त होणार नाहीं. याला आपल्यासारखें अविनाशी तत्व मिळेल तेव्हांच याला खरा चिरकाल टिकणारा आनंद होईल. असें अविनाशी व उच्च तत्व या जगतांत आहे काय ?

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतात:—

**अव्यक्ताव्द्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे ।**
**रात्र्यागमे विलीयंते तत्रै वा व्यक्तसंज्ञके ॥**
**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥**

भावार्थः—ब्रह्मदेवाचा दिवस झाला कीं अव्यक्तापासून सर्व व्यक्ति उत्पन्न होतात, व रात्र झाली कीं त्याच अव्यक्तनामक तत्वांत पुनः लीन होतात. हे पार्था, हा भूतांचा समुदाय पुनःपुनः उत्पन्न होऊन रात्रीं नाश पावतो, व पुनः दिवस उगवतांच उत्पन्न होतो.

पण या अव्यक्तापेक्षां (प्रकृतीपेक्षां) ही एक अति उच्च तत्व आहे.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**परस्तस्मात्तु भावोन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥**
**अव्यक्तोऽक्षरइत्युक्तस्तमाहुः परमां गतिं ।**
**यं गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥**
**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यांतस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततं ।**

भावार्थः—या अव्यक्ताहूनही श्रेष्ठ असें दुसरें सनातन अव्यक्त तत्व आहे. तें या सर्व भूतांचा नाश झाला तरी नष्ट होत नाहीं. या उच्च अव्यक्ताला अक्षर ( अविनाशी ) असें ह्मणतात. त्यालाच श्रेष्ठ गति असें ह्मणतात. हें माझें अत्युच्च स्थान. हें एकदां प्राप्त झालें ह्मणजे मनुष्य संसारांत पुनः परत येत नाहीं. हे अर्जुना, तो उत्तम पुरुष अनन्यभक्तीनें मात्र प्राप्त होतो. हीं सर्व भूतें त्याच्या आंत आहेत. हें विश्व त्यानेंच उत्पन्न केलें.

या सृष्टी उत्पन्न करणाऱ्या तत्त्वासच परमात्मा अथवा ईश्वर असें ह्मणतात. हा सर्वज्ञ असून सर्व शक्तिमान् आहे. या विश्वाची सर्व व्यवस्था लावणारा हाच. या जड विश्वाचा चेतन आत्मा हा. यालाच तत्पद अशी संज्ञा आहे. हा सच्चिदानंदरूपी आहे.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**मायोपाधिर्जगद्योनिः सर्वज्ञत्वादिलक्षणः ।**
**पारोक्ष्यशबलः सत्याद्यात्मकस्तत्पदाभिधः ॥**

भावार्थः—मायोपाधि व या जगताचें कारण असलेला, सर्वज्ञवादि लक्षणांनीं युक्त, सत्यज्ञान, आनंदरूपी, व परोक्ष असलेला असा जो, तो तत्पदवाच्य असें समजावें.

त्वंपदवाच्य जीवास, तत्पदवाच्य परमेश्वराची प्राप्ति झाल्याशिवाय खरें सुख होणार नाहीं. हेंच सनत्कुमारांनीं शरण आलेल्या नारदास सांगितलें.

पंचदशींत योगानंदांत ह्मटलें आहेः—

**यो भूमा स सुखं नाल्पे सुखं त्रेधा विभेदिनी ।**
**सनत्कुमारः प्राहैवं नारदायातिदुःखिने ॥**

भावार्थः—जो भूमा नामक ( अनंत ) परमेश्वर तो सुख होय. अल्प व तीन प्रकारें भेदयुक्त द्वैतांत सुख नाहीं, असें अति दुःख करणाऱ्या नारदास सनत्कुमारानें सांगितलें.

पण जीवास परमात्म्याची प्राप्ति कशी व्हावी ? द्वैतदृष्ट्या परमेश्वर पूज्य, जीव पूजक; परमेश्वर सेव्य, जीव सेवक; परमेश्वर देव व जीव त्याचा भक्त असें ठरतें. या दृष्टीनें परमेश्वरप्राप्तीस उपाय अनन्यभक्तीवांचून दुसरा नाहीं, आणि हेंच तत्व श्रीकृष्णांनीं अर्जुनास सुचविलें आहे.

अद्वैतदृष्ट्या याच्या पलीकडे आपणास गेलें पाहिजे. या दृष्टीनें पाहिलें तर जीव व परमेश्वर वस्तुतः एकच आहेत. पण आपण भिन्न आहों हा जो जीवाला भ्रम झाला आहे, त्यायोगानें त्याला दुःख भोगावें लागतें. या भ्रमाचा निरास होऊन जीवास तत्वज्ञानप्राप्ति झाली कीं, परमात्मा व आपण एकच आहों, अशी त्याची खात्री होऊन त्यास परमानंद होतो, व तो कृतकृत्य होतो.

पण कायहो, हें निव्वळ वेड तर नव्हे ? परमात्मा सर्वज्ञ, जीव अल्पज्ञ, परमात्मा सर्वशक्तिमान्, जीव अल्पशक्तीचा, परमात्मा दिसत नाहीं, जीवास स्वतःचें प्रत्यक्ष ज्ञान असतें, परमात्मा आनंद-

रूप, जीव दुःखी, असा ढळढळीत भेद असून ते एक कसे होतील? याचें उत्तर असें आहे कीं, हा भेद केवळ उपाधींच्या भिन्नतेमुळें आहे. वस्तुतः दोहींचें अधिष्ठान एकच परब्रह्म असल्यामुळें ते अभिन्न आहेत. पहा—

पंचदशींत तत्वविवेकांत ह्मटलें आहेः—

**सोयमित्यादिवाक्येषु विरोधात्तदिदं तयोः।**
**त्यागेन भागयोरेक आश्रयो लक्ष्यते यथा॥**
**मायाविद्ये विहायैवमुपाधी परजीवयोः।**
**अखंडं सच्चिदानंदं परं ब्रह्मैव लक्ष्यते॥**

भावार्थः—तो हा ( देवदत्त ) इत्यादि वाक्यांत विरोधामुळें तो व हा या दोनीही भागांचा त्याग करून आश्रयभूत एकच पुरुष लक्षिलाजातो. त्याप्रमाणेंच परमात्मा व जीव यांच्या माया व अविद्या ह्या दोन उपाधी टाकून दिल्या कीं, एक अखंड सच्चिदानंदरूप परब्रह्म लक्षिलें जातें.

'काल आपणास भेटला तो हा देवदत्त पहा' या वाक्यांत तो व हा हीं पदें विरुद्ध अर्थवाचक आहेत, ह्मणून तो देवदत्त व हा देवदत्त हे निराळे मानले पाहिजेत काय? अर्थात नाहीं. देवदत्त एकच आहे. त्यालाच काल पाहिलें व आज पाहतों आहों, ह्मणून तो देवदत्त व हा देवदत्त भिन्न नाहींत.

हाच न्याय जीव आणि ईश्वर यांजकडे लावावयाचा. जीव व ईश्वर यांजमध्यें जरी अतिशय भेद दिसतो तरी तो उपाधींच्या योगानेंच आहे. या दोहींचें अधिष्ठान एकच परब्रह्म असल्यामुळें ते वस्तुतः भिन्न नाहींत. मायेच्या उपाधींच्या योगानें ब्रह्म ईश्वर होतें. व तेंच ब्रह्म

अविद्येच्या उपाधींत पडलें कीं, जीव होऊन संसारांत सांपडतें. पण ब्रह्म एक व अखंड असल्यामुळें वास्तविकरीतीनें पाहिलें तर जीव व ईश्वर अभिन्नच आहेत.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**प्रत्यग्बोधो य आभाति सोऽद्वयानंदलक्षणः ।**
**अद्वयानंदरूपश्च प्रत्यग्बोधैकलक्षणः ॥**
**इत्थमन्योन्यतादात्म्यप्रतिपत्तिर्यदा भवेत् ।**
**अब्रह्मत्वं त्वमर्थस्य व्यावर्तेत तदैव हि ॥**
**तदर्थस्य च पारोक्ष्यं—**

भावार्थः—जो सर्व जीवांच्या आंत भासणारा आत्मा तो अद्वयानंदरूपी परमात्मा आहे, व अद्वयानंदरूप परमात्मा तोच जीवांच्या अंतर्यामीं भासणारा आत्मा आहे. याप्रमाणें या दोहींचें तादात्म्य आहे, असें ज्ञान जेव्हां होतें तेव्हां जीव हा ब्रह्म नाहीं, व ईश्वर परोक्ष आहे, हा भ्रम नाहींसा होतो.

**—यद्येवं किं ततः—**

भावार्थः—बरें असें झालें तर लाभ काय ?

**—शृणु ।**

**पूर्णानंदैकरूपेण प्रत्यग्बोधोऽवतिष्ठते ॥**

भावार्थः—ऐक. त्यानंतर जीवात्मा पूर्ण आनंदरूपानें राहातो.

खरें अविनाशी सुख मिळविण्याचा, या संसारचक्रांतून सुटण्याचा, व कृतार्थ होण्याचा मार्ग हा. मात्र हें ज्ञान अपरोक्ष झालें पाहिजे. नुसत्या शाब्दिक ज्ञानानें मनुष्य कृतार्थ होत नाहीं. पण एकदां खरें अपरोक्ष तत्वज्ञान झालें कीं, मनुष्य मुक्त झाला. त्याला पुनर्जन्म

किंवा दुःख कधींहीं होणार नाहीं. या संसारचक्रांतून त्यानें आपली सुटका करून घेतली.

नित्यानित्यविवेक ह्मणजे काय व त्यापासून लाभ काय याचें येथवर विवेचन झालें. आतां तो कसा व केव्हां करावा हें समजलें पाहिजे.

नित्यानित्यविवेकाची आवश्यकता परमार्थांतच आहे, संसारांत नाहीं असें समजूं नये. नित्यानित्यविवेकाची सुरवात संसारांतच झाली पाहिजे. संसारांत उत्तमाधम लोक आहेतच. विचारहीन पुरुषांची प्रवृत्ति तात्कालिक सुखाकडेच असते. ते पुढें काय होईल याचा विचार करीत नाहींत. आहे तों दिवाळी, नाहीं तेव्हां शिमगा, या न्यायाचें त्यांचें वर्तन असतें. अशा मानवी प्राण्यापेक्षां दूरवर विचार करून विपत्कालाकरितां भक्ष्य पदार्थांचा संग्रह करून ठेवणारे मुंग्या व मधमाशासारखे कीटक ज्यास्त विवेकी नाहींत काय !

यासाठीं मनुष्यानें संसारांतही नित्यानित्यविवेक केला पाहिजे. थोड्या व क्षणिक सुखासाठीं पुढील नित्य सुख घालवूं नये. उद्यां आपली व आपले कुटुंबाची स्थिति काय होईल इकडे लक्ष ठेऊन आचरण करावें. धनाचा योग्य व्यय व संग्रह करणारास संसारांत विशेष अडचण पडत नाहीं.

त्याचप्रमाणें क्षणभंगुर तात्कालिक सुखाच्या लालचीनें कुमार्गांत पाऊल टाकूं नये. तूर्त त्रास पडला तरी सन्मार्गाकडेच वळावें, यांतच मनुष्याचें कल्याण आहे. ही विचारसरणी बहुधा सर्वांस समजण्यासारखी व पसंत पडण्यासारखी आहे. सुज्ञपुरुषांचें संसारांतील आचरण या विचारसरणीस अनुसरूनच असतें.

पण ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या हा पारमार्थिक विवेक मात्र समजावयास कठिण असल्यामुळें तो कसा करावा हें पाहिलें पाहिजे. मुमुक्षूंनीं प्रथम हें तत्व ध्यानांत ठेवावें कीं, जगतास जें मिथ्या ह्मटलें आहे तें फक्त पारमार्थिकदृष्टीनें. व्यवहारदशेंत, व्यवहारासंबंधानें जग सत्यच मानलें पाहिजे. या शिवाय व्यवहार चालावयाचा नाहीं. सर्व आचार्यांनीं, जगताला व्यावहारिक सत्यत्व आहे, हें कबूल केलें आहे. फक्त त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, हें सत्यत्व त्रिकालीं अबाधित रहाणारें नव्हे. ह्मणून पारमार्थिकदृष्ट्या जग मिथ्या असा निश्चय केला जातो, व त्रिकालीं सत्य रहाणारें एक परब्रह्मच आहे, असा सिद्धांत ठरतो.

यासंबंधानें एक गणितांतील उत्तम उदाहरण घेऊं. एक या संख्येपेक्षां दहा ही संख्या मोठी आहे. दहापेक्षां शंभर, शंभरापेक्षां हजार, हजारापेक्षां लाख, व लाखापेक्षां कोटी उत्तरोत्तर प्रमाणानें जास्त आहेत. या संख्यांतील प्रत्येकास कमीजास्त महत्व आहेच, व त्या कमीजास्त महत्वास अनुसरूनच गणितांतील सर्व व्यवहार चालतो. पण या संख्या सर्व परिमित आहेत. ह्मणून अपरिमित संख्येबरोबर यांची तुलना केली, किंवा या सर्व संख्यांस अपरिमित संख्येनें भागलें कीं, उत्तर शून्यच येणार. हा सिद्धांत काल्पनिक नसून, गणितशास्त्रांत यास प्रमाणसिद्ध मानिलें आहे. अपरिमित संख्येशीं तुलना केली कीं परिमित संख्या केवढीही मोठी असली तरी ती शून्यवत् होत. तरी त्या परिमित संख्येचें स्वतःचें महत्व असतेंच, व तें गणितांतील व्यवहारांत मान्य होतेंच. याचप्रमाणें व्यवहारांत जगतांतील वस्तू लहान मोठ्या, क्षणभंगुर, व चिरस्थाई, कमीजास्त महत्वाच्या, उत्तम, मध्यम, व कनिष्ट अशा असतातच. फक्त

पारमार्थिकदृष्टच्या सद्वस्तूबरोबर तुलना केली तरच सर्व जग मिथ्या ठरतें.

मुमुक्षूनें हें प्रथम समजून घ्यावें, व यासंबंधानें आपली खात्री करून घ्यावी. पुढें त्यानें हें सर्व आपले मनावर ठसविण्याकरितां वारंवार विचार करावा. तो असा. या जगतास नेहमीं स्वप्नाचा दृष्टांत देतात. जगांतील व्यवहाराचें व स्वप्नाचें बरेंच साम्य आहे. त्याचप्रमाणें जग उत्पन्न करणाऱ्या मायेचें व स्वप्न उत्पन्न करणाऱ्या निद्राशक्तीचेंही बरेंच साम्य दिसून येईल.

पंचदशींत अद्वैतानंद प्रकरणांत ह्मटलें आहे:—

**निद्राशक्तिर्यथा जीवे दुर्घटस्वप्नकारिणी ।**
**ब्रह्मण्येषा स्थिता माया सृष्टिस्थित्यंतकारिणी ॥**
**शयाने पुरुषे निद्रा स्वप्नं बहुविधं सृजेत् ।**
**ब्रह्मण्येवं निर्विकारे विकारान्कल्पयत्यसौ ॥**

भावार्थः—जशी जीवामध्यें दुर्घट स्वप्न उत्पन्न करणारी निद्राशक्ति आहे, त्याचप्रमाणें या जगाची सृष्टि, स्थिति व नाश करणारी मायाशक्ति ब्रह्मांत आहे.

निजलेल्या पुरुषाचेठाईं जशी निद्राशक्ति अनेक स्वप्नें उत्पन्न करते, त्याचप्रमाणें ही ( माया ) निर्विकारी ब्रह्मांत अनेक विकारांची कल्पना करते.

सूक्ष्मदृष्टीनें पाहिलें तर स्वप्न व लौकिक व्यवहार यांमध्यें बरेंच साम्य दिसून येईल. आपण स्वप्नांत असतांना, तेथील अनुभव व दृश्य पदार्थ सर्व खरे असें वाटत असतें, व त्यापासून हर्ष विषाद भयादिक मनोविकार होतात. ह्मणून स्वप्नसृष्टीस तात्कालिक सत्यत्व

आहे. मनुष्य जागा झाल्याशिवाय स्वप्नांत पाहिलेलें सर्व मिथ्या हें त्यास कळत नाहीं. ह्मणून जागृतावस्थेंत मात्र स्वप्नास मिथ्यत्व आहे.

त्याचप्रमाणें जागृतींत भासणारें हें सर्व जग व त्यांतील पदार्थ यांस व्यावहारिक सत्यत्व आहेच. पण गाढ निद्रेंत स्वप्नसृष्टी, व जागृतींतील हें जगत्, हीं दोनीही दिसत नाहींत. व तुर्यावस्थेंत जग मिथ्या व एक ब्रह्म सत्य याचा प्रत्यक्ष अनुभव येतो. हा अनुभव येण्यापूर्वीं अनुमानानें व विचारानें जगताच्या पारमार्थिक मिथ्यत्वाबद्दल विवेक करतां येतो.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहे:—

**स्वस्वप्नमापरोक्ष्येण दृष्ट्वा पश्यन्स्वजागरं ।**
**चिंतयेदप्रमत्तः सन्नभावनुदिनं मुहुः ॥**
**चिरंतयोः सर्व साम्यमनुसंधाय जागरे ।**
**सत्यत्वबुद्धिं संत्यज्य नानुरज्यति पूर्ववत् ॥**

भावार्थः—आपलें स्वप्न अपरोक्ष रितीनें पाहून, त्याचप्रमाणें जागृतावस्थेंतील अनुभव घेऊन, सावधान मनानें या दोहींबद्दल वारंवार विचार करावा. त्या दोनीही अवस्थेंत असलेलें सर्व प्रकारचें साम्य जाणून त्याचें चिरकाल अनुसंधान केल्यावर, जागृतीबद्दल सत्यत्वबुद्धि टाकून मनुष्य तींत पूर्वींप्रमाणें आसक्त होत नाहीं.

हा एक मार्ग आहे. याचा अभ्यास केला ह्मणजे नित्यानित्यविवेक दृढ होतो. त्याचप्रमाणें मनुष्यानें मनोराज्याचें व लौकिक व्यवहाराचें साम्य पहात जावें.

पंचदशींत अद्वैतानंद प्रकरणांत ह्मटलें आहे:—

**क्षणे क्षणे मनोराज्यं भवत्येवान्यथान्यथा ।**
**गतं गतं पुनर्नास्ति व्यवहारो बहिस्तथा ॥**

न बाल्यं यौवने लभ्यं यौवनं स्थाविरे तथा ।
मृतः पिता पुनर्नास्ति नायात्येव गतं दिनं ॥
मनोराज्याद्विशेषः कः क्षणध्वंसिनि लौकिके ।
अतोस्मिन्भासमानेपि तत्सत्यत्वधियं त्यजेत् ॥

भावार्थः—क्षणोक्षणीं मनोराज्य निरनिराळें होतें. गेलेलें पुनः येत नाहीं. त्याचप्रमाणें बाह्यव्यवहाराचें समजावें. बाल्य यौवनावस्थेंत नसतें. यौवनावस्था वृद्धदशेंत नसते. मेलेला बाप पुनः मिळत नाहीं. गेलेला दिवस परत येत नाहीं. क्षणभंगुर लौकिक व्यवहार हा मनोराज्यापेक्षां कसा श्रेष्ठ होईल? ह्मणून हा भासत असला तरी ( पारमार्थिकदृष्टया ) याच्या सत्यत्वाची बुद्धि टाकावी.

आतां नित्यानित्यविवेक दृढ करण्याची तिसरी विचारसरणी अशी आहे कीं, पिंडांत व ब्रह्मांडांत नित्य कोणतें व अनित्य कोणतें हें नित्य पहात जावें. पिंडांत आत्मा नित्य, व इंद्रियें देहादिक अनात्म वर्ग अनित्य अशी खात्री होईल. कारण यांचा नाश झाला तरी आत्मा कायम राहतो.

पिंडासंबंधीं विचार केल्यावर ब्रह्मांडाचा विचार करावा. यांत हें लक्ष्यांत आणावें कीं, ज्या सूक्ष्म तत्वापासून एकाद्या स्थूल तत्वाची उत्पत्ति होते, त्या सूक्ष्म तत्वापेक्षां तें स्थूल तत्व नाशिवंत असतें. सूक्ष्म तत्व जास्त वेळ टिकतें, स्तूल तत्वाचा नाश झाला तरी सूक्ष्म-तत्व कायम रहातें. याप्रमाणें पहात गेलें तर अखेर अविनाशी असें एक परब्रह्मच ठरतें. येथें विचाराचा शेवट होतो. ब्रह्माहून दुसरें अति सूक्ष्म तत्व कोणतेंही नाहीं, आणि दुसऱ्या सर्वांची उत्पत्ति ब्रह्मापासून होऊन अखेर त्यांचा लयही ब्रह्मांतच होतो. ह्मणून ब्रह्मच सर्वांपेक्षां नित्य असें समजावें.

समर्थ दासबोधांत ह्मणतातः—

पिंडाचें पाहिलें कौतुक। शोधिला आत्मानात्म विवेक। पिंड अनात्मा आत्मा एक। सकळ कर्ता ॥ आत्मानात्मविवेक पिंडीं। सारासार विचार ब्रह्मांडीं। विवरीं विवरीं हे गोडी। घेतली पाहिजे ॥ असार ह्मणजे नाशिवंत ॥ सार ह्मणजे शाश्वत। जयास होईल कल्पांत। तें सार नव्हे ॥ पृथ्वी जळापासोनि झाली। पुढें तेचि जळीं मिळाली। जळाची उत्पत्ति वाढली। तेजापासुनी ॥ तें जळ तेजें शोषिलें। महातेजें आटोनि नेलें। पुढें तेजचि उरलें। सावकाश ॥ तेज झालें वायूपासुनी। वायू झडपी तयालागुनि। तेज जाऊनि दाटणी। वायूचीचि जाहली॥ वायू गगनापासोनि झाला। मागुता तेथेंचि विराला। ऐसा कल्पांत बोलिला। वेदशास्त्रीं॥ गुणमाया मूळमाया। परब्रह्मीं पावती लया। तें परब्रह्म विवराया। विवेक पाहिजे ॥ सर्व उपाधींचा शेवट। तेथें नाहीं दृश्य खटपट। निर्गुण ब्रह्म घनदाट। सकळां ठाईं ॥ उदंड कल्पांत झाला। तरी नाश नाहीं त्याला। माया त्यागें शाश्वताला। ओळखावें ॥

याप्रमाणें नित्यानित्यविवेक करणारानें एक साधनाचा उत्तम अभ्यास केला असें समजावें. साधकानें संसार टाकला पाहिजे असें मुळींच नाहीं. उलट संसारांत राहून उत्तम व न्याय्यरीतीनें संसार चालविला तर परमार्थप्राप्तीस बरीच मदत मिळते. सन्मार्गानें चालणाराची उन्नति झालीच पाहिजे. व त्यानें उत्तम आचरणास जर विवेकाचा व विचाराचा दुजोरा केला, तर लौकरच त्याची दृष्टि ईश्वरकृपेनें तत्वज्ञानाकडे पोहोंचेल, व त्याची निष्ठा परब्रह्मावर बसून तो कृतार्थ होईल. अशा रीतीनें संसार करण्यांत कोणताच अपाय नाहीं.

सोयरोबा ह्मणतात:—

लय हें भगवंतीं जरि लाय । मग हा प्रपंच केला तरि काय ॥ धृ० ॥ जैसी अभ्रींची हे छाया । कीं ते जाण नटाची जाया । अथवा मृगजळवत हे माया । तैसी वाटत ज्याला काया । अवघेंचि मिथ्या दिसलें हाय ॥ मग हा प्रपंच० ॥

देहबुद्धि येतां भ्रांती । हृदयीं न धरी होते वांती । स्वस्थ बैसुनियां एकांतीं । मी कोण आदि अंतीं । हें अखंड पहात जाय ॥ मग हा प्रपंच० ॥

नयनीं नयेचि दृश्याभास । समूळ तुटला आशापाश । समग्र विकासलें आकाश । चंद्रसूर्याविण प्रकाश । चित्त हें महाशून्यीं स्थिर होय ॥ मग हा प्रपंच केला तरि काय ॥ धृ० ॥





# परमार्थपर व्याख्यानमाला

२

## वैराग्य.

परमार्थांत श्रेष्ठ मानलेल्या साधनचतुष्टयापैकीं वैराग्य हें दुसरें साधन आहे. परंतु इतर सर्व साधनांपेक्षां याचेंच महत्व जास्त ठरतें असें साधुपुरुषांनीं मानलें आहे. मोक्षप्राप्तीस वैराग्याची अत्यंत आवश्यकता असल्यामुळें, ज्याच्या अंगीं वैराग्य पूर्णपणें बाणलें नाहीं, त्यानें मोक्षाची आशा करणें व्यर्थ असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्मणून मुमुक्षूंनीं या वैराग्याचें लक्षण काय, तें अवश्य समजून घेतलें पाहिजे.

विवेकचूडामणींत आचार्य ह्मणतात:—

> तद्वैराग्यं जिहासा या दर्शनश्रवणादिभिः ।
> देहादिब्रह्मपर्यंते ह्यनित्ये भोगवस्तुनि ॥

भावार्थ:—आपल्या देहापासून थेट ब्रह्मलोकापर्यंत ज्या उपभोगाच्या अनित्य वस्तू आहेत, त्या सर्वांना पहाणें, ऐकणें वगैरे इंद्रियांच्या क्रियांनीं अगदीं सोडून द्यावयाची जी इच्छा, ती वैराग्य होय.

या जगांत इंद्रियांला सुख देणाऱ्या अनेक वस्तू आहेत. कांहीं नेत्रांला रमणीय दिसतात. कांहीं जिभेला रुचकर असतात. कांहींचा स्पर्श फार सुखकारक होतो. कांहीं पदार्थांला अत्यंत मोहक सुगंध

येतो. व कांहीं ध्वनी कानाला फार मधुर वाटतात. याप्रमाणें पांचही इंद्रियांना संतोष देणारे भिन्न भिन्न पदार्थ या सृष्टींत आहेत. या सुखदायक पदार्थांवर लुब्ध होऊन विषयी पुरुष त्यांच्या प्राप्ती-विषयीं उत्सुक होतात, व ते संपादन करण्यांत आपलें सर्व आयुष्य गमावितात.

परंतु ज्यास मोक्षप्राप्तीची दृढ इच्छा झाली आहे, त्यानें या सर्व विषयांपासून परावृत्त झालें पाहिजे. विषयांवरील आसक्ति त्यानें बिलकुल सोडून दिली पाहिजे. या सर्व वस्तु कितीही मोहक असल्या तरी त्या डोळ्यांनीं पहावयास नकोत, जिभेनें चाखावयास नकोत, त्यांचा स्पर्श नको, सुवास नको, त्यांचा मधुर ध्वनी ऐकावयास नको, अशी मुमुक्षूच्या मनाची स्थिति झाली पाहिजे. यालाच वैराग्य ह्मणतात. ज्यांना मोक्ष पाहिजे त्यांनीं हें वैराग्य प्रथम संपादन केलें पाहिजे.

विवेकचूडामणींत आचार्य ह्मणतात:—

**मोक्षस्य हेतुः प्रथमो निगद्यते वैराग्यमत्यंतमनित्यवस्तुषु ।**

भावार्थ:—नाशिवंत पदार्थांविषयीं अत्यंत वैराग्य हें मोक्षप्राप्तीचें पहिलें साधन सांगितलें आहे.

परमार्थांत सर्व साधनांत वैराग्य हें श्रेष्ठ मानलें आहे, आणि मुमुक्षूंनीं हें वैराग्य सहज संपादन करावें, ह्मणून दयाळू साधू पुरुष त्यांची वारंवार कानउघाडणी करीत आहेत कीं, बाप्पानों, हे विषय नाशिवंत आहेत. यांच्या सेवनानें कायमचें सुख मिळणें शक्य नाहीं ह्मणून तुह्मी यांजवर लुब्ध होऊं नका, आणि आपल्या स्वहितास मुकूं नका.

पण अनेक जन्मापासून या विषयोपभोगांत गुंतलेल्या मानवी प्राण्यांना हा उपदेश रुचत नाहीं. तरी यांत त्या बिचाऱ्यांकडे काय

दोष? विषयांची मोहकताच इतकी बळकट आहे कीं त्यांजविषयीं थोडीशीही अरुची उत्पन्न होणें कठीण, मग अत्यंत वैराग्याची तर गोष्ट एकीकडेच राहूंद्या.

आचार्य ह्मणतातः—

**शब्दादिभिः पंचभिरेव पंच पंचत्वमापुः स्वगुणेन बद्धाः।**
**कुरंगमातंगपतंगमीनभृंगा नरः पंचभिरंचितः किं ॥**

भावार्थः—हरिण, हत्ती, पतंग, मासा, आणि भ्रमर, हे पांचही आपल्या गुणांनीं बद्ध होऊन, शब्दादिक पांच विषयांपैकीं एक एकावर लुब्ध होऊन त्यामुळें मरण पावतात. मग पांचही विषयांवर आसक्त असलेल्या मनुष्याची काय दशा व्हावी?

पहा, व्याधाच्या गाण्यास लुब्ध होऊन बिचारा हरिण असावधपणानें त्याच्या जवळ जातो, व त्याच्या तीक्ष्ण बाणांनीं मरतो. हत्तीही स्पर्शसुखास भुलून बंधन पावतो, अथवा कधीं कधीं प्राणासही मुकतो. त्याचप्रमाणें दिव्याच्या तेजानें वेडा होऊन पतंग ज्योतींत उडी घेतो, व तत्काळ भस्म होऊन जातो.

मासा आमिषाच्या लालचीनें गळ गिळून टाकतो, व कोळ्यानें गळ खेंचला कीं त्यास अडकून, जमीनीवर चरफडून प्राण सोडतो. भ्रमरही कमलांतील सुवासास भुलून त्याजवर ठाम बसून रहातो, व सूर्यास्त झाला कीं तें कमल संकुचित झाल्यामुळें त्यांत गुंतून जावून नाश पावतो.

याप्रमाणें एक एक इंद्रियाच्याच सुखाकरतां हा भयंकर अनर्थ त्या दुर्दैवी प्राण्यांवर गुदरतो. मग पांचही इंद्रियांनीं विषयांवर आसक्त होणाऱ्या मानवी प्राण्यावर दुःखें व अनर्थपरंपरा येऊन

पडतात यांत नवल काय? विषयलुब्ध प्राणी या संसारचक्रांत बद्ध राहून अनेक यातना भोगतो, व त्या भोगूनही त्याची सुटका होत नाहीं. कारण आचार्यांनीं सांगितल्याप्रमाणें

**पुनरपि जननं पुनरपि मरणं। पुनरपि जननीजठरे शयनं ॥**

भावार्थः—पुनः जन्म पुनः मरण व पुनः पुनः मातेच्या उदरांत निजणें ( गर्भवासास येणें ).

ही अनर्थपरंपरा त्या बिचाऱ्याच्या मागें लागलीच आहे. विषयांवर लुब्ध होऊन त्यांच्या प्राप्तीसाठीं पापकर्में करणें, त्या पापकर्मांचें फल भोगण्याकरतां पुनर्जन्म घेणें, त्या जन्मींही अनेक दुःखें भोगून नवीं दुष्कर्में पुनःपुनः करणें, या घोर संसारचक्रांतून त्याची सुटका कशी व्हावी?

सुदैवानें त्याला येथून सुटून जाण्याची जर खरी उत्कंठा झाली, तर त्यानें प्रथमारंभीं मनाचा निग्रह करून विषयावरील आसक्ति सोडून दिली पाहिजे. कारण जोंपर्यंत विषयांचा लोभ सुटत नाहीं तोंपर्यंत प्राणी अधोगतीसच जाणार.

येथें अशी शंका येते कीं, मुक्ति फक्त ज्ञानानेंच मिळते. मग आह्मी ज्ञानप्राप्तीसाठीं अविश्रांत श्रम केले, सर्व शास्त्रें शिकलों, परमार्थाचे ग्रंथ धुंडाळले, त्यांतील रहस्य समजून घेण्याकरतां साधूंस शरण गेलों, सारांश ज्ञान संपादन करण्याचे जेवढे मार्ग आहेत त्या सर्वांचे आलंबन केलें, ह्मणजे झालें. वैराग्याचा या कामीं काय उपयोग? शिवाय पृथ्वींतील सर्व पदार्थ परमेश्वरानें आमच्या उपभोगाकरतां केले असून आह्मी त्यांजविषयीं उदासीन कां व्हावें? उदासीन होणें कांहीं सोपें काम नाहीं.

आचार्य ह्मणतात:—

**विषयाशामहापाशाद्यो विमुक्तः सुदुस्त्यजात् ।**
**स एव कल्प्यते मुक्त्यै नान्यषच्छास्त्रवेद्यपि ॥**

भावार्थ:— सोडण्यास कठीण अशा विषयेच्छारूप महापाशापासून जो मनुष्य मोकळा झाला, त्यालाच मुक्ति मिळते. इतरांला, जरी ते सहा शास्त्रें जाणणारा असले, तरी मुक्ति मिळत नाहीं.

असें प्रतिपादन करणें मूळ सिद्धांताच्या विरुद्ध नाहीं काय ? मुक्ति तर ज्ञानानेंच मिळावयाची, आणि सहा शास्त्रें शिकूनही मुक्ति मिळणार नाहीं हें कसें ? या शंकेचें समाधान असें आहे कीं, मुक्ति शाब्दिक ज्ञानानें मिळत नाहीं. मोक्षदायक ज्ञान स्वानुभवानें संपादन केलें पाहिजे. या ज्ञानास चित्तशुद्धीची आवश्यकता आहे. विषयावर लुब्ध असलेल्या प्राण्यांचीं मनें मलिन असतात. त्यांना ब्रह्मसाक्षात्कार होणें शक्य नाहीं. ह्मणून मुमुक्षूनें विषयांवरील आसक्ति अवश्य सोडून दिली पाहिजे.

वैराग्य खरें अंतःकरणपूर्वक होईल तरच त्याचा उपयोग. उगीच वर वर विषयापासून परावृत्त होऊन फायदा नाहीं. खरा विरक्त पुरुषच मुक्तीचा अधिकारी होतो. इतरांस फलसिद्धि होत नाहीं व त्यांस संसारांत गोते खात रहावें लागतें.

आचार्य ह्मणतात:—

**आपातवैराग्यवतो मुमुक्षून् भवाब्धिपारं प्रतियातुमुद्यतान् ।**
**आशाग्रहो मज्जयतेंतराले निगृह्य कंठे विनिवृत्य वेगात् ॥**

भावार्थ:—ज्यांचें वैराग्य उगीच वरवरचें आहे अशा मुमुक्षूंना, ते संसारसागर तरून जाण्याचा यत्न करीत असतां, आशा ही सुसर त्यांचा गळा वेगानें धरून उलथें पाडते, व मध्येंच बुडविते.

हा भवार्णव तरून जाणें कांहीं सोपें काम नाहीं. या कामास अत्यंत धैर्य व मनोनिग्रह लागतात. शिवाय अनेक विघ्नें आड येऊन मुमुक्षूस वारंवार भ्रमांत घालून त्यांचा यत्न निष्फळ करण्यास कारणीभूत होतात. या कामीं फक्त खऱ्या विरक्त पुरुषांना मात्र कशाचें भय नसतें. ते सुखानें हा भवसागर तरून जातात व मुक्त होतात.

आचार्य ह्मणतात:--

**विषयाशाग्रहो येन सुविरक्त्यासिना हतः ।**
**स गच्छति भवांभोधेः पारं प्रत्यूहवर्जितः ॥**

भावार्थः—ज्यानें या विषयेच्छारूप सुसरीला उत्तम वैराग्यरूप तरवारीनें मारलें, तो निर्विघ्नपणें हा संसारसागर तरून पलीकडे जातो.

ह्मणून मुमुक्षूनें वैराग्यप्राप्ति करून घेतली पाहिजे. वैराग्याशिवाय त्याची परमार्थांत प्रगति कधींही व्हावयाची नाहीं. मोक्षप्राप्तीकरतां वैराग्यासारखें अन्य साधन नाहीं. पण हें पुनः पुनः सांगितल्यानेंच मुमुक्षूचें समाधान व्हावयाचें नाहीं. असें कां असावें, हा प्रश्न त्याच्या मनांत वारंवार येणारच. ह्मणून या प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे.

पहा एखादें व्यावहारिक क्षुल्लक कार्य देखील करावयाचें असलें, तर तें करण्याची खरी इच्छा प्रथम झाली पाहिजे. नाहींतर कार्याकडे प्रवृत्तीच होणार नाहीं. आतां प्रवृत्तीच न झाली, तर कार्य व्हावयाचें नाहीं, हें सांगावयास नको. या दृष्टीनें पाहिलें तर मोक्षासारखें अति उच्च व कष्टसाध्य कार्य साधावयास तीव्र इच्छा नको काय? ही तीव्र इच्छा, जो अजून संसारास विटला नाहीं, ज्याला विषय अजून फार मोहक व आल्हाददायक दिसतात, ज्याचें मन स्त्रीपुत्रादिकांच्या मायापाशांत अजून गुंतलें आहे,

त्याला कशी व्हावी ? या संसारचक्रांतच रहाणें ज्याला आवडतें त्यानें त्यांतून सुटण्याविषयीं यत्न तरी कां करावा ? ह्मणून प्रथम तीव्र वैराग्य झालें पाहिजे. तरच मनुष्य मोक्षसाधनाकडे वळेल, व अखेर अतिशय खटपट करून मोक्ष मिळवील. आत्मसाक्षात्कारास वैराग्याची किती आवश्यकता आहे हें योगवासिष्ठांतील एका श्लोकावरून कळेल.

मांडव्य मुनी ह्मणतातः—

**यावत्सर्वं न संत्यक्तं तावदात्मा न लभ्यते ।**
**सर्ववस्तुपरित्यागे शेष आत्मेति कथ्यते ॥**

भावार्थः—जोंपर्यंत सर्व दृश्य पदार्थांचा त्याग केला नाहीं तोंपर्यंत आत्मप्राप्ती होत नाहीं. सर्व वस्तूंचा त्याग केला कीं आत्माच उरतो असें ह्मणतात.

असें असलें तर विचाऱ्या गृहस्थांनीं मोक्षसाधनाच्या खटपटींतच पडणें मूर्खपणा होईल. कारण कुटुंबसंरक्षणाकरतां त्यांना हरएक वस्तूची आवश्यकता आहे. सर्व वस्तूंचा त्याग करून त्यांचें कसें चालेल ? व हा त्याग केला नाहीं तर त्यांना आत्मप्राप्ति कशी व्हावी ?

याचें उत्तर असें आहे कीं, वैराग्य ही मानसिक स्थिती आहे. ती फक्त बाह्य कृतीवर अवलंबून नाहीं. ज्याच्या मनानें विषयांवरील आसक्ति सोडून दिली, तो खरा विरक्त असें समजावें. ज्याचें मन स्वतःच्या ताब्यांत आलें त्याचा कार्यभाग साधला.

वसिष्ठ ह्मणतातः—

**त्यजन्नभिमतं वस्तु यस्तिष्ठति निरामयः ।**
**जितमेवमनंतेन बाह्यं प्रसरमुज्झता ॥**

भावार्थः—अत्यंत आवडती जी वस्तू असेल तिचा त्याग करून-ही जो खेदरहित असतो, त्यानें बाहेरचा पसारा सोडून मन जिंकलें.

वस्तूचा प्रत्यक्ष त्याग केला पाहिजे असें नाहीं. त्याग करूनही खेदरहित असण्याची शक्ति अंगीं आली कीं बस्. वास्तविकरीतीनें पाहतां जर संपत्ति उपलब्ध आहे तर उगीच जिवास कष्ट देणें मूर्खपणाचें लक्षण आहे. संपत्तीचा वाजवी रीतीनें उपभोग घेणें गर्हणीय नाहीं. जें प्राप्त आहे त्याचा सद्धर्मानें उपभोग घेण्यास कांहींच हरकत नाहीं. पण जें उपलब्ध नाहीं त्याकरतां मात्र अधाशीपणानें अपेक्षा करूं नये.

योगवासिष्ठांत वसिष्ठ ह्मणतातः—

**अनागतानां भोगानामवांछनमकृत्रिमं ।**
**आगतानां च संभोग इति पंडितलक्षणं ॥**

भावार्थः—जे भोग प्राप्त नाहींत त्यांकरितां स्वभावतःच इच्छा नसणें, व जे प्राप्त आहेत त्यांचा उपभोग घेणें हेंच पंडितांचें लक्षण आहे.

परंतु यासंबंधानें एक मोठी अट आहे ती अशी कीं, हें धन किंवा उपभोगाचे पदार्थ सद्धर्मानें व न्यायानें प्राप्त झाले पाहिजेत. तच त्यांच्या वाजवी सेवनानें दोष लागत नाहीं. अन्यायानें जर भोग मेळविले तर तो पुरुष अर्थात अधोगतीस जाईल यांत संशय नाहीं.

असो. पण न्यायरीत्याही भोग भोगिले तर त्या भोगावरील आसक्ति ाढणार नाहीं काय? शहाण्या मनुष्यानें मित उपभोग घेतले तर तो ातक्यांतच संतुष्ट होऊन त्यांवर आसक्त होत नाहीं. मूर्ख मनुष्य त्र अति सेवनानें विषयांध होऊन बद्ध होतो.

वसिष्ठ ह्मणतातः—

**यैरेव जायते रागो मूर्खस्याधिकतां गतैः ।**
**तैरेव भोगैः प्राज्ञस्य विराग उपजायते ॥**

भावार्थः—ज्या भोगांच्या, अति सेवनामुळें, मूर्खाला आसक्ति उत्पन्न होते, त्याच भोगांनीं शहाण्या पुरुषास वैराग्य प्राप्त होतें.

मोक्षसाधनास वैराग्याची आवश्यकता असल्यामुळें वैराग्य तर पाहिजेच, पण तेंही मनापासून खरें, व तीव्र वैराग्य उत्पन्न झालें पाहिजे. तरच परमार्थांत प्रगति होत जाईल. नुसतें तोंडानें वैराग्याची वडवड करणारे पुष्कळ लोक असतात. पण त्यांचें मन खरोखर विरक्त झालेलें नसतें. मनापासून तर त्यांना विषय आवडतच असतात. पण वरवर मात्र ते वैराग्याच्या गोष्टी सांगतात.

भर्तृहरी ह्मणतातः—

**बीभत्सा विषया जुगुप्सिततमो कायो वयो गत्वरं ।**
**प्रायो बंधुभिरध्वनीव पथिकैर्योगो वियोगावहः ।**
**हातव्योऽयमसार एष विरसः संसार इत्यादिकं ।**
**सर्वेषामपि वाचि चेतसि पुनः कस्यापि पुण्यात्मनः ॥**

भावार्थः—विषय कंटाळवाणे आहेत, आपलें शरीर तर अगदीं घाणेरडें आहे, तारुण्य लौकर नाहींसें होतें, सोयरेधायऱ्यांची संगत, रस्त्यांत येणाऱ्या जाणाऱ्या लोकांच्या संगतीप्रमाणें, थोडा वेळच टिकते, व अखेर त्यांचा वियोग होतो, असार व निरस असा हा संसार टाकून दिला पाहिजे; असे उद्गार सर्वांच्या वाचेवर असतात. पण असे विचार एखाद्याच पुण्यशील महात्म्याच्या मनांत खरोखर विकास पावतात.

हे नुसते वैराग्याच्या बाता मारणारे मूर्ख लोक होत. पण वैराग्याचा बाह्यडौल मिरवून लोकांस फसविणारे, व आपल्या नादीं लावणारे लोक याहीपेक्षां नीच मानिले पाहिजेत. त्यांच्याकडे शाब्दिक ज्ञान असतें, पण त्याचा उपयोग मुमुक्षूंस तिळमात्र व्हावयाचा नाहीं.

एकनाथस्वामी ह्मणतातः—

**अंतरीं शुद्ध नाहीं भाव । वरी मिरवी वैराग्यवाव ॥**
**जळो जळो त्याचें ज्ञान । काय नटाचें भाषण॥**
**टिळा टोपी दावी सोंग । बकध्यानी मिरवी रंग ॥**
**शरण एका जनार्दनीं । त्याचा मंत्र न घ्यावा कानीं ॥**

खोट्या वैराग्याचा मुमुक्षूस कांहीं फायदा नाहीं हें निर्विवाद सिद्ध होतें. पण वैराग्य जरीं खरें उत्पन्न झालें तरी तें क्षणिक होतां कामा नये. मनुष्यास स्मशानयात्रेस जाण्याचा प्रसंग आला ह्मणजे तेथील देखावा पाहून त्याचें मन उद्विग्न होतें. सर्व प्राण्यांस अंतीं मरण हें ठेवलेलेंच आहे, ही गोष्ट त्याचे ध्यानांत येऊन तो घाबरून जातो. हा संसार सर्व व्यर्थ आहे, आपण आपल्या जन्माचें कांहीं तरी सार्थक करून घेतलें पाहिजे, अशी त्याची तात्कालिक बुद्धि होते. हीच जर त्याची मानसिक स्थिति कायम राहिली तर त्याची परमार्थाकडे खरी प्रवृत्ति होईल. पण तसा प्रकार सामान्यतः होत नाहीं.

घरीं परत आल्यावर तो मनुष्य हें सर्व विसरून जातो. पुत्रकलत्रादिकांच्या मोहांत, व विषयोपभोगांत हळू हळू पडून त्याची विरक्ति कमी होत जाते. व अखेर तो पूर्ववत् संसारांत गढून जातो. या क्षणिक वैराग्यास स्मशानवैराग्य असें ह्मणतात.

कधीं कधीं प्रपंचांत मनुष्यास अनेक दुःखें सोसावीं लागतात. द्रव्यादिकांचा नाश होतो, स्त्रीपुत्रादिक मरण पावतात, अथवा देहास

असह्य रोग जडून अत्यंत पीडा होते. याचप्रमाणें इतर अनेक संकटें येऊन त्या बिचाऱ्यास जेर करतात. अशा अनर्थ परंपरेनें कंटाळून अखेर त्या प्राण्यास हा जन्म नको व हा संसारही नको, असें वाटूं लागतें. परंतु हेंही वैराग्य खरें टिकणारें नव्हे. तें क्षणिक व मंद वैराग्यच होय, असें ह्मटलें तर चालेल.

**पुत्रदारगृहादीनां नाशे तात्कालिकी मतिः ।**
**धिक् संसार इतीदृक्स्याद्विरक्तेर्मंदता हि सा ॥**

भावार्थः—स्त्री, पुत्र व गृहादिक यांचा नाश झाला तर, तितक्या वेळापुरती, या संसारास धिक्कार असो, अशी जी बुद्धि होते ती वैराग्याची मंदता होय.

कारण, गेलेली संपत्ति पुनः दैववशात् हातीं आली, द्वितीय संबंध झाला, दुसरीं मुलें झालीं, कीं मनुष्य पूर्वींचें दुःख साफ विसरून जातो, व पुनः संसारांत सुख मानूं लागतो. हळू हळू तो पुनः संसारांतील उपभोगांत गर्क होऊन, त्यांतच आपणास कृतकृत्य मानतो. सारांश संसाराचा मोह सुटणें फार कठीण आहे. मग अशा सांसारिकांस मोक्ष-प्राप्तीची खरी इच्छा कशी व्हावी ? असो.

आतां अंतःकरणपूर्वक तीव्र वैराग्य कशास ह्मणावें तें पाहिलें पाहिजे.

**अस्मिन्जन्मनि मा भूवन्पुत्रदारादयो मम ।**
**इति या सुस्थिरा बुद्धिः सा वैराग्यस्य तीव्रता ॥**

भावार्थः—या जन्मांत मला स्त्रीपुत्रादिक कधींही नसावेत, अशी जी अत्यंत दृढ निश्चयाची बुद्धि, तिला वैराग्याची तीव्रता ह्मणावें.

येथें मुमुक्षूंनीं हा विचार अवश्य केला पाहिजे, कीं गृहस्थास स्त्री-पुत्रादिक असतां, त्यांचा नाश व्हावा, अशी घोर व अमानुष इच्छा त्यानें करावी, असें साधु पुरुषांचें ह्मणणें नाहीं.

ज्यास सुदैवानें स्त्रीपुत्रादिक आहेत, अशा गृहस्थानें त्यांचें यथाशक्ति पालनपोषण केलेंच पाहिजे. तें न केलें तर त्याला दोष लागेल. कर्तव्यकर्माविषयीं उदासीनता गर्हणीय आहे.

ज्यास मोक्ष मिळविण्याची खरी इच्छा झाली आहे अशा गृहस्थानें फक्त आपली स्त्रीपुत्रादिकांवरील आसक्ति काढून टाकली पाहिजे. त्यांचें यथोचित लालनपालन कर्तव्यताबुद्धीनें केलेंच पाहिजे, पण त्यांच्या सुखाकरितां अनुचित रीतीनें मात्र धनादिक संपादन करूं नये, व त्यांच्या फार मोहांतही पडूं नये.

आतां ज्यास दैववशात् स्त्रीपुत्रादिक नाहींतच, त्यानें तीं मला कधीं प्राप्त होतील असा ध्यास धरूं नये. अशा पुरुषास वैराग्य उत्पन्न होऊन, मला स्त्रीपुत्रादिक या जन्मांत नकोत, असें त्यानें ह्मटलें तरी त्यांत हरकत नाहीं. कारण तो उपाधिरहित राहिला तर त्याला परमार्थाविषयीं यत्न करणें सोपें जाईल. परंतु गृहस्थास परमार्थ कधींच साधावयाचा नाहीं असें मात्र समजूं नये. सर्व सांसारिकांस अत्यंत प्रिय अशा पुत्रकलत्रादिकांवरून त्यानें आपली आसक्ति कमी केली, व अंतःकरणपूर्वक दृढ निश्चयानें त्यानें मोक्षप्राप्तीसाठीं यत्न केला, तर त्याची परमार्थांत प्रगति व्हावयास हरकत नाहीं. असो.

येथवर आपण ऐहिक सुखाविषयींच विचार केला आहे. व ऐहिक सुखासंबंधीं वैराग्याची आवश्यकता मुमुक्षूस आहे असें ठरविलें. पण वैराग्याची मजल याहीपलीकडे गेली पाहिजे. ऐहिक सुखें वास्तवीकरीतीनें पाहातां दुःखमूलक आहेत, व तीं अत्यंत नाशिवंत आहेत असा सार्वजनिक अनुभव आहे, असें ह्मणण्यास फारशी हरकत नाहीं. ह्मणून ऐहिक भोगांस तुच्छ मानून, अनेक पुण्य कर्में

करून परलोकीं सुख मिळविण्याचा यत्न करणारे पुष्कळ विचारी लोक मिळतील. पण ज्यास मोक्ष मिळविण्याची खरी इच्छा झाली आहे त्यानें पारलौकिक सुखाचाही अव्हेर केला पाहिजे. कारण पुण्य सरलें कीं, त्या प्राण्यास पुनः या मृत्युलोकीं जन्म घ्यावा लागतो व या लोकींच्या दुःखपरंपरेंत तो पुनः सांपडतो.

खऱ्या मुमुक्षूनें मला पुनर्जन्म नसावा अशीच इच्छा केली पाहिजे. कारण जोंपर्यंत मनुष्य या जन्मपरंपरेंतून सुटला नाहीं, तोंपर्यंत त्याचें काय होईल, त्याला किती दुःख भोगावें लागेल, त्याला अधोगती अवचित केव्हां प्राप्त होईल, याबद्दल कांहींच निश्चय करतां यावयाचा नाहीं. ह्मणून त्यानें मला पुनर्जन्म नको अशीच दृढ इच्छा केली पाहिजे. हीच वैराग्याची अति तीव्र स्थिति.

**पुनरावृत्तिसहितो लोको मे माऽस्तु कश्चन ।**
**इति तीव्र तरत्वं स्यात्————— ॥**

भावार्थः—ज्या लोकांस गेलें असतां पुनरपि जन्म घ्यावा लागतो असा कोणताही लोक मला नको, ही वैराग्याची अति तीव्रता होय.

पण स्वर्गादि लोकांविषयीं विरक्त असावें, हें शहाणपणाचें काम ह्मणतां येत नाहीं. ऐहिक सुखें नाशिवंत व परिणामीं दुःखमय आहेत, असें जरी कदाचित् कबूल केलें, तरी पारलौकिक सुखासंबंधानें असें ह्मणतां येत नाहीं. स्वर्गांतील सुख किती तरी श्रेष्ठ! त्याचें वर्णन मनुष्यानें काय करावें. त्या सुखाबद्दल खरी कल्पना या भूलोकीं करतां येणार नाहीं.

ज्ञानेश्वर ह्मणतातः—

**जेथ अमरत्व हें सिंहासन। ऐरावता ऐसें वाहन। राजधानी भुवन। अमरावती॥ जेथ महासिद्धींचीं भांडारें। अमृताचीं**

**कोठारें। जिये गावीं खिल्लारें। कामधेनूंचीं॥ जेथ वोळगे देव पायिका। चिंतामणिचिया भूमिका। विनोदवन वाटिका। सुरतरूंचिया॥ गंधर्व गात गाणीं। जेथ रंभे ऐसिया नाचणी। उर्वशी मुख्य विलासिनी। अंतौरिया॥**

स्वर्गांत अशा तऱ्हेचे उत्तम भोग भोगावयास मिळतात, व तेथील उच्चस्थान प्राप्त झालेल्या जीवांस दुःख भोगावें लागत नाहीं. मग या स्वर्गसुखाला तुच्छ कां मानावें? अशा उत्तम सुखाचा अभिलाष केला तर काय अपराध? हें सुख जर सोडून दिलें तर यापेक्षां जास्त सुख कोठें मिळेल? असे विचार बहुतेकांच्या मनांत येणार. व याच विचारसरणीस अनुसरून श्रद्धावंत राजे, आणि विद्वान श्रोत्रिय यज्ञयागादि कर्में करतात, व पुण्याच्या बळावर स्वर्गास जाऊन तेथें यथेच्छ सुखोपभोग घेतात.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतात:—

**त्रैविद्यामां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान्॥**

भावार्थ:—तीन वेद शिकलेले, सोमरस पिणारे, व पापें जाऊन शुद्ध झालेले पुरुष यज्ञयागादिक करून माझी सेवा करितात, व स्वर्गप्राप्तीसाठीं प्रार्थना करतात. त्या पुरुषांस उत्तम स्वर्गलोक प्राप्त होतो, व ते त्या लोकीं देवांचे उत्तम भोग भोगतात.

झालें; तर हाच मार्ग सर्वांत श्रेष्ठ. सर्वांनीं या उत्तम लोकीं उच्च गति मिळावी ह्मणून अविश्रांत श्रम करावे, व पुण्य जोडावें. या भूलोकीं अनेक दुःखें भोगावीं लागलीं तरी चिंता नाहीं. अनेक कष्ट सोसावे लागले तरी सोसावे, पण स्वर्गप्राप्ति करून घ्यावी. कारण

तेथील सुख जर एकदां प्राण्यास भोगावयास सांपडलें तर सर्व दुःखा-बद्दल व कष्टाबद्दल त्याला उत्तम मोबदला मिळाला असें होईल. या भूलोकांतील दुःखमय संसारांतून तो प्राणी सुटून शेवट गोड झाला असें खात्रीनें समजावें. पण थांबा. इतके उतावीळ होऊं नका. संसारांतून सुटून जाण्याचा हा मार्ग नव्हे.

श्रीकृष्ण ह्मणतात:—

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥**

भावार्थ:—विशाल स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्य सरलें ह्मणजे त्यांना मृत्युलोकीं पुनः जन्म घ्यावा लागतो. याप्रमाणें वेदत्रयीच्या धर्माला अनुसरून, फलांची इच्छा मनांत धरून कर्मैं करणारे लोकांना वर जा खालीं ये अशा येरझारा कराव्या लागतात.

पण असें जरी आहे तरी, स्वर्गसुख अति उत्तम असल्यामुळें, त्याचा क्षय होत असला तरी तें स्पृहणीयच मानलें पाहिजे. तें प्राप्त करून घेण्यास वारंवार मनुष्यजन्मास यावें लागलें तरी हरकत नाहीं. या लोकीं पुण्यकर्मैं करावीं व स्वर्गास जाऊन त्यांचें फल यथेच्छ भोगावें. असें केलें तर त्यांत काय बिघडतें? आह्मी पुण्यकर्मैंच करीत राहिलों तर दोन्ही लोकीं आमचें कल्याणच होत जाईल. आह्माला कोठेंही दुःख भोगावें लागणार नाहीं. मग हाच मार्ग कल्याणकारक नव्हे काय?

यास असें उत्तर आहे कीं, बाबानों मनुष्याच्या हातून पुण्यच होत जाईल याचा काय भरंवसा? मी मी ह्मणणारे मुनी विषयांच्या मोहकतेस वश होऊन पापकर्मैं करण्यास चुकले नाहींत. साधु पुरु-

घांसही, माझे हातून अनुचित कर्म कधींच होणार नाहीं, असा अभिमान करतां येत नाहीं. मग इतर बिचाऱ्या सांसारिकांची काय कथा? षड्रिपूंच्या तडाक्यांत सांपडून प्राण्याची केव्हां दुर्दशा होईल, तें कोणासही सांगतां येणार नाहीं. असें असतां मला स्वर्गच अवश्य मिळेल, अशी मनांत उमेद बाळगणें रास्त होणार नाहीं. वरें स्वर्ग जरी प्राप्त झाला तरी पुण्यभोग संपल्यावर पुनः मनुष्यजन्मच मिळेल अशी खात्री नसते. कारण स्वस्वकर्मानुसार प्राण्यांस नीच योनींतही जन्म घ्यावा लागतो.

**इष्टापूर्तं मन्यमानावरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयंते प्रमूढाः ।**
**नाकस्य पृष्ठे ते सुकृतेनानुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशंति ॥**

भावार्थः—इष्टापूर्त हेंच श्रेष्ठ असें मानून यापेक्षां कल्याणकारक दुसरें कांहीं नाहीं असें ते अति मूढ पुरुष समजतात. ते स्वर्गांत आपल्या पुण्यानें प्राप्त झालेले सर्व सुखोपभोग घेऊन, अखेर या लोकास परत येतात किंवा याहीपेक्षां कनिष्ठ लोकास जातात.

ते बिचारे प्राणी पुनः या लोकीं परत आले कीं, सर्व दुःखपरंपरा पुन्हा त्यांचे मागें लागलीच. सारांश स्वर्गसुखाचा अभिलाष करून त्यासाठीं अविश्रांत श्रम करणें हा या संसारचक्रांतून सुटून जाण्याचा मार्ग नव्हे. स्वर्गसुखास लुब्ध झालेले प्राणी बद्धच आहेत असें निःसंशय समजावें.

यासाठीं ज्याला मोक्षाची अपेक्षा आहे त्यानें स्वर्गसुखही तुच्छ मानलें पाहिजे. स्वर्गसुखानें पुनर्जन्म चुकत नाहीं आणि जन्म हेंच दुःखाचें घर असल्यामुळें स्वर्गसुखाकरितां मुमुक्षूनें यत्न करूं नये. उलट त्या सुखासंबंधानें अत्यंत विरक्ति धरावी. आतां स्वर्गापे-

क्षांही श्रेष्ठ असे लोक आहेत. पण तेथील सुखही अविनाशी नाहीं, व तेथूनही मुमुक्षूस या संसारचक्रांतून सुटून जातां येत नाहीं. ह्मणून या साधनचतुष्टयांपैकीं दुसऱ्या साधनास "इहामुत्रफलभोगविराग" ( इहलोकींचीं व परलोकांतील सर्व फळें व भोग याजविषयीं विरक्ति ) असें ह्मटलें आहे. असो. याप्रमाणें सर्वच सुखें तुच्छ करीत गेलें तर या वैराग्याची मजल अखेर कोठपर्यंत जावयाची ?

वसिष्ठ ह्मणतातः—

**ब्रह्मलोकतृणीकारो वैराग्यस्यावधिर्मतः ।**

भावार्थः—ब्रह्मलोकाला तृणवत् मानणें ही वैराग्याची सीमा झाली. पण असें कां असावें. ब्रह्मलोकांतील अति श्रेष्ठ व पवित्र सुखाचा तृणाप्रमाणें अव्हेर कां करावा, व जर सर्वच सुखें त्याज्य आहेत तर या पलीकडेही कां जाऊं नये ?

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**

भावार्थः—बा अर्जुना, ब्रह्मलोकापर्यंत जेवढे लोक आहेत त्यांपासून जीवांची परावृत्ति होते.

ब्रह्मलोकापर्यंत गेलेले जीव मुक्त झाले, असें समजूं नये. त्यांना पुनर्जन्म पुण्य सरलें ह्मणजे घेतलाच पाहिजे. यासाठीं ते या संसारचक्रांत घिरट्या घालीत रहाणार. मग या जन्मपरंपरेंतून जीवांनीं कसें सुटावें ? त्यांना शाश्वत विश्रांतीचें स्थान कोठें मिळेल ?

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥**
**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतं ।**
**नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥**

भावार्थः—हे कुंतीपुत्रा, माझी प्राप्ति झाली ह्मणजे मात्र पुनर्जन्म नाहीं.

जे महात्मे मजजवळ येऊन पोहोंचले, ते अतिशय धन्य व कृतकृत्य होतात. त्यांना दुःखमूलक व अशाश्वत असा जन्म पुनः घेणें भाग पडत नाहीं.

ह्मणून ज्यांना मोक्षप्राप्तीची खरी व दृढ इच्छा झाली असेल त्यांनीं इहपरलौकिक सुखास न भुलतां परमेश्वरप्राप्तीसाठीं यत्न केला पाहिजे. त्यांचें वैराग्य तीव्र व कायमचें टिकणारें असेल, तरच त्यांना इष्ट सिद्धि प्राप्त होईल. एरवीं त्यांना या भवसागरांत गटंगळ्या खात राहावें लागणार. येथून त्यांची सुटका होणें शक्य नाहीं.

वैराग्य क्षणिक नसावें हें ध्यानांत आलें. त्याची मजल कोठपर्यंत गेली पाहिजे हेंही समजलें. आतां त्याचें खरें स्वरूप काय तें पाहिलें पाहिजे.

वैराग्ययुक्त मनुष्यांस विषयांची अभिरुची नसावी हें उघड आहे. त्यांनीं कोणत्याही विषयावर आसक्त होतां कामा नये हें वाजवी आहे. पण वैराग्याचें खरें मर्म कोणतें? विरक्त पुरुषांनीं विषयांचा द्वेष केला पाहिजे काय? या प्रश्नाचा विचार केला पाहिजे.

विषय अनेक प्रकारचे आहेत. कांहीं विषय शास्त्रांनीं व सुज्ञ गृहस्थांनीं निंद्य मानले आहेत. अशा विषयांच्या सेवनानें पाप लागतें ह्मणून अर्थातच ते त्याज्य आहेत. त्यांचा कंटाळा येणें गर्हणीय नाहीं. पण जे विषय निषिद्ध नाहींत त्यांच्यासंबंधानें मुमुक्षूच्या मनाची स्थिति कशी असली पाहिजे याबद्दल सूक्ष्म विचार केला पाहिजे.

सर्व विषयांचा तिरस्कार जर मुमुक्षूनें केला, व सर्व पदार्थांविषयीं त्याची द्वेषबुद्धि जर झाली, तर त्याची शरीरयात्रा तरी कशी चालेल?

त्याला या जगांत जर कांहीं काळ रहावयाचें आहे, तर हवा, पाणि, अन्न वगैरे अनेक पदार्थांचें त्यानें अवश्य सेवन केलें पाहिजे व असें केलें तरच त्याचा देह जिवंत राहील.

ह्मणून शरीरपोषणादि अवश्य कर्मांकरितां सर्व प्राण्यांस अनेक विषयांची जरूरी आहे, व त्या विषयांचा द्वेष करून कोणताही कार्यभाग साधतां येणार नाहीं.

जे विषय निषिद्ध नाहींत त्यांजवरील आसक्ति मुमुक्षूनें सोडली ह्मणजे त्रम्. याच्या पलीकडे जाऊन त्या विषयांचा द्वेष करणें वाजवी होणार नाहीं. व या द्वेषाचा प्रपंचांत किंवा परमार्थांत कोठेंच उपयोग होणार नाहीं. उदाहरणार्थ अन्नच घ्या. निषिद्ध अन्नाचें सेवन केलें, तर मनुष्य दोषास पात्र होतो, व त्याच्या सात्विक वृत्तीस त्या अन्नानें मलिनता येऊन त्याची परमार्थांत अवनती होते. त्याचप्रमाणें शुद्ध अन्नाचेंही अधाशीपणानें आति सेवन केलें तर रोगादिक अपाय होतात. पण शरीरयात्रेपुरतें अन्नाचें सेवन करणें साधुसंतांसही सुटलें नाहीं. ते जरूरीपुरतें अन्न भक्षण करतातच. फक्त त्यांनीं सर्व रुचकर पदार्थांवरील आपली आसक्ति सोडून दिलेली असते. अन्नाच्या रुचीकडे ते लक्ष देत नाहींत, व रुचकर पदार्थ आपल्यास पाहिजेत अशी त्यांची इच्छाही नसते.

पण ते अन्नाचा कंटाळा करीत नाहींत, व असें करणें रास्त आहे असें त्यांचें मतही नाहीं. ज्याला अन्नाची अरुची होऊन भक्ष्यपदार्थांविषयीं द्वेष उत्पन्न झाला आहे त्याला साधु ह्मणणें तर एकीकडेच राहिलें. पण बाबा, तूं वैद्याकडे लौकर जा व उत्तम क्षुधाजनक औषध घे हाच उपदेश त्याला योग्य होईल.

सारांश, वैराग्याचें खरें मर्म उदासीन स्थितींत आहे. कोणत्याही पदार्थाविषयीं राग ह्मणजे प्रीतीही नसावी, व द्वेषही नसावा. वास्तविकरीतीनें पाहातां ज्याप्रमाणें इष्ट वस्तूंवरील आसक्ति मुमुक्षूनें सोडली पाहिजे, त्याचप्रमाणें अनिष्ट व उपद्रवी पदार्थांविषयीं द्वेषही टाकिला पाहिजे. राग व द्वेष हे दोनीही मुमुक्षूचे शत्रू आहेत. या दोहोंचाही नाश झाल्याशिवाय परमार्थांत हितकर अशी मनाची समता प्राप्त होणार नाहीं. मुमुक्षूनें ही मनाची समता प्राप्त करून घेण्याकरितां अवश्य यत्न केला पाहिजे.

गीतेंत श्रीकृष्ण ह्मणतातः—

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौव्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौह्यस्य परिपंथिनौ ॥**

भावार्थः—प्रत्येक इंद्रियाचे ठायीं विषयांसाठीं प्रीती आणि द्वेष हीं ठेविलीं आहेत. या दोहींलाही वश होऊं नये. कारण ते मुमुक्षूचे शत्रू आहेत.

या जगामध्यें ज्याप्रमाणें इष्ट वस्तूंच्या लालचीनें मनुष्य पाप करण्यास प्रवृत्त होतो, त्याचप्रमाणें द्वेषास पात्र झालेल्या शत्रूंच्या नाशाकरितांही अनुचित कर्मं करण्यास, तो मागें पुढें पहात नाहीं. ह्मणून ज्यांना परमार्थांत आपली प्रगति करून घ्यावयाची आहे त्यांनीं राग व द्वेष हे दोनीही सोडून शांतवृत्ति स्वीकारली पाहिजे. तरच ते पापापासून परावृत्त होतील. अशा शांत स्थितींत असलेल्या साधूंचें वर्णन भर्तृहरींनीं उत्तम रीतीनें केलें आहे, व साधूंनीं कोणत्या स्थितींत रहावयाची इच्छा करावी हें सुचविलें आहे.

**अहौ वा हारे वा बलवति रिपौ वा सुहृदि वा ।**
**मणौ वा लोष्ठे वा कुसुमशयने वा दृशदि वा ॥**

तृणे वा स्त्रैणे वा मम समदृशो यांतु दिवसाः ।
क्वचित्पुण्येऽरण्ये शिवशिवशिवेति प्रलपतः ॥

भावार्थः—सर्पावर किंवा हारावर, एखाद्या बलाढ्य शत्रूवर किंवा मित्रावर, रत्नावर किंवा मातीचे ढेंकुळावर, पुष्पशय्येवर किंवा दगडावर, तृणावर किंवा स्त्रियांच्या समुदायावर समदृष्टी ठेऊन कोणत्या तरी पवित्र अरण्यांत शिव शिव असा जप करण्यांत माझे दिवस जावोत.

साधु पुरुषांस जशी सुखदायक वस्तूवर आसक्ति नाहीं, तसा घातक व भयप्रद वस्तूवर द्वेषही नाहीं. गुणातीत मनुष्याच्या स्थितीचेंही वर्णन श्रीकृष्णांनीं गीतेंत याच तऱ्हेचें केलें आहे.

श्रीकृष्ण ह्मणतात:—

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।
तुल्यप्रियाप्रियोधीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥
मानापमानयोस्तुल्यस्तुल्योमित्रारिपक्षयोः ।
सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥

भावार्थः—जो मनुष्य सुख किंवा दुःख हीं सारखीं मानतो; जो स्वस्थ स्थितींत असतो; ज्याला मातीचें ढेंकूळ, दगड, किंवा सोनें हीं सारखींच दिसतात; ज्याला प्रिय किंवा अप्रिय दोनीही सारखे; जो आपली स्तुति किंवा निंदा यांना तुल्यच समजतो; ज्याला मान किंवा अपमान एकसारखेच वाटतात; ज्याला शत्रू व मित्र समान; व जो फलाची अपेक्षा करून कोणतेंहीं काम करीत नाहीं; त्याला गुणातीत असें ह्मणतात.

पण असें झाल्यावर फायदा काय ? अशा स्थितींत असलेला मनुष्य व्यवहारांत तर निरुपयोगी ठरेलच; याबद्दल कोणत्याही

व्यवहारपटु मनुष्यास तरी संशय येणार नाहीं. ज्यानें राग व द्वेष सोडले अशा दुधखुळे मनुष्यापासून या जगांत कोणतें महत्कार्य होणार ? त्याचे शत्रू त्याला तुच्छ मानतील, व त्याचे मित्रही त्याला कंटाळून त्याजपासून दूर रहातील. मग अशी स्थिति प्राप्त करून घेण्यांत मतलब काय ? याचें उत्तर श्रीकृष्ण गीतेंत देतातः—

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥**
**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥**

भावार्थः—जो राग व द्वेष या दोन्हीपासून मुक्त अशा इंद्रियांनीं विषयांचें सेवन करतो, व जो इंद्रियांस व मनास आपल्या स्वाधीन ठेवतो त्याला चित्ताची प्रसन्नता प्राप्त होते. चित्त प्रसन्न झालें कीं सर्व दुःखें नाहींशीं होऊन त्या पुरुषाची बुद्धि लौकर स्थिर होते.

बुद्धि स्थिर झाली ह्मणजे योगप्राप्ति होण्यास विलंब लागत नाहीं. योगसाधनानें खरें मोक्षदायक ज्ञान मिळून तो पुरुष कृतकृत्य होतो. राग व द्वेष सोडून दिल्यापासून परमार्थांत याप्रमाणें इष्टसिद्धिरूपी अत्यंत लाभ होतो.

पण संसारांत देखील गुणातीत मनुष्य निरुपयोगी असतो असें समजूं नये. कारण त्यानें जरी मनाच्या शुद्धीकरतां राग व द्वेष हे दोनीही सोडून दिले तरी कर्तव्यताबुद्धीनें स्त्रीपुत्रादिकांचें पालन व त्यांस पीडा करणारापासून त्यांचें संरक्षण करण्यास तो तयार असतोच. जनकासारख्या सिद्ध पुरुषांनीं राज्यकारभार उत्तम प्रकारें चालविल्याबद्दल पुराणांत वर्णन आहे. विद्वज्जनांस योग्य आश्रय देणें, अनाथांचें पालन करणें, दुष्टांस यथोचित शासन करणें, इत्यादि

राजधर्मापासून ते परावृत्त होत नसत. मात्र जें काय करावयाचें तें विकारवश न होतां, फक्त न्यायबुद्धीनें, आणि निःपक्षपातानें ते करीत असत. ह्मणून संसारांतही ही मनाची अत्युच्च स्थिति अभिनंदनीयच आहे.

आतां ही अति प्रशंसनीय विरक्त स्थिति मनुष्यास कशी येते, व तिच्या प्राप्तीसाठीं कोणकोणते उपाय केले पाहिजेत याचा विचार कर्तव्य आहे.

कित्येकांस हें वैराग्य एकामागें एक अशीं अनेक दुःसह दुःखें भोगल्यामुळें एकदम प्राप्त होतें असें भासतें. पण हा पूर्व जन्मीं केलेल्या सुकृताचा, व ईश्वरकृपेचाच परिणाम असें समजावें. या एकदम झालेल्या वैराग्याचीं पुराणांत अनेक उदाहरणें आहेत.

वेश्येचा निंद्य धंदा करणाऱ्या पिंगलेस एका रात्रीच्या आशाभंगानें एकाएकीं कसें तीव्र वैराग्य प्राप्त झालें, व तिनें तदनंतर भगवंताची भक्ति करून आपल्या जन्माचें कसें सार्थक करून घेतलें हें भागवताच्या एकादशस्कंधांत मुमुक्षूंनीं वाचावें. त्याचप्रमाणें एका कवडीचुंबक पण धनवान ब्राह्मणास त्याच्या सर्व वित्ताच्या नाशामुळें कसा अनुताप झाला, व त्यानें लगेच संन्यासवृत्ति घेऊन परमार्थाचें साधन कसें केलें, हें त्याच स्कंधांतील भिक्षुगीतेंत पहावें. असो. प्रस्तुत प्रसंगींही उदाहरणार्थ एक कथा दिली आहे, तिचा मुमुक्षूंनीं तत्त्वदृष्ट्या विचार करावा.

एका गरीब पण सदाचारयुक्त ब्राह्मणानें आपलें दारिद्र्य जावें ह्मणून अनेक यत्न केले. तो सात्त्विक व धर्मशील असल्यामुळें त्यानें तऱ्हेचीं व्रतें यथासांग केलीं. त्याचप्रमाणें अनेक देवतांचें आराधनही केलें. पण मुख्यत्वेंकरून लक्ष्मीदेवीनें प्रसन्न व्हावें ह्मणून बरेच दिवस कडक उपोषणें वगैरे करून देवीची सेवा चालविली. पण देवी

कृपादृष्टीनें त्या बिचाऱ्या सेवकाकडे पाहीना. असो. याप्रमाणें हताश होऊन व आपल्या दुःखद स्थितीस अगदीं कंटाळून त्या ब्राह्मणानें संन्यास घेतला, व सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत चालता झाला.

तो विश्रांतीसाठीं एका झाडाखालीं बसला असतां लक्ष्मीदेवी एकाएकीं प्रगट होऊन त्याच्यापुढें उभी राहिली, व वर माग असें मोठ्या उत्सुकतेनें ह्मणाली.

ब्राह्मणानें चकित होऊन उत्तर दिलें कीं "माते, मीं निस्पृह होऊन सर्व संसाराचा त्याग केला आहे. आतां मला तुझ्या वराचें काय प्रयोजन? तुला वरच द्यावयाचा होता तर मी संसारांत असतां तुझी निःसीम सेवा करीत होतों, तेव्हां कां आली नाहींस?"

लक्ष्मीनें उत्तर दिलें " बाबा, मीं काय करूं; तुला या जन्मीं कांहींच मिळूंनये असा योग असल्यामुळें, माझा उपाय चालेना. एरवीं मला तुझी फार दया येत होती. व तुजवर कृपा करावी अशी इच्छाही होती. पण तें सर्व व्यर्थ झालें." ब्राह्मणानें प्रश्न केला "माते, असें जर होतें तर आतां याच जन्मीं तूं वर द्यावयास कशी आलीस?" लक्ष्मी ह्मणाली " शास्त्रदृष्टचा तुझा पुनर्जन्म झाला आहे. ह्मणून आतां वर माग."

ब्राह्मण शांतपणानें ह्मणाला " माते, मी आतां संन्यास घेतला आहे, व मला ईश्वरकृपेनें अंतःकरणांत खरें वैराग्यही उत्पन्न झालें आहे. मला आतां कांहीं नको—"

**मातर्लक्ष्मि भजस्व कंचिदपरं मत्कांक्षिणी मा स्म भूः।**
**भोगेभ्यः स्पृहयालुवस्तव वशाः का निस्पृहाणामसि ॥**
**सद्यः स्यूतपलाशपत्रपुटिकापात्रे पवित्रीकृते।**
**भिक्षासक्तुभिरेव संप्रति वयं वृत्तिं समीहामहे ॥**

भावार्थः—हे माते लक्ष्मी, तूं दुसऱ्या कोणावर कृपा कर, मजवर अनुग्रह करण्याची इच्छा तूं धरूं नको. जे मनुष्य भोगावर आसक्त असतील तेच तुला वश होतील. मजसारख्या निस्पृहांना तुजकडे काय करावयाचें आहे ? आह्मास आतां फक्त नवीन तोडलेल्या पलाशपर्णांची पत्रावळ शुद्ध करून तिजवर भिक्षान्न जेऊन या शरीराची कशी तरी वृत्ति चालवावी, इतकीच अपेक्षा उरली आहे.

ब्राह्मणाचें असें उत्तर ऐकून लक्ष्मीस चमत्कार वाटला. व वर द्यावा तर अशाच सत्पात्रीं द्यावा, असें मनांत आणून ती त्या ब्राह्मणास ह्मणालीः—अरे माझ्या अनुग्रहाविषयीं आज लाखों प्राणी जिवाची पर्वा न बाळगितां एकसारखे अविश्रांत श्रम करीत आहेत. ती मी तुला प्रसन्न झाल्यावर तूं धन कां मागत नाहींस ? धन प्राप्त झालें कीं प्राण्यास सर्व इच्छा पुरवितां येतात.

ब्राह्मण ह्मणतोः—

**प्राप्ताः श्रियः सकलकामदुघास्ततः किं ।**

भावार्थः—कामधेनूप्रमाणें सर्व मनोरथ पुरविणारी संपत्ति मिळाली तरी काय करावयाचें आहे ?

लक्ष्मी ह्मणतेः—अरे ब्राह्मणा, तुला स्वतःला जरी संपत्तीची जरूर नसली तरी तुझ्या गरीब सोयऱ्याधायऱ्यांस व इष्टमित्रांस सुखी कर. ते जें तुजवर प्रेम करतात त्याचा मोबदला त्यांना कांहीं तरी मिळावा.

ब्राह्मण ह्मणतोः—

**संतर्पिताः प्रणयिनो विभवैस्ततः किं ।**

भावार्थः—जे मजवर प्रेम करतात त्यांना ऐश्वर्यानें तृप्त केलें तर त्यांत काय थोरवी ?

लक्ष्मी ह्मणतेः—बरें तर. तुझे अनेक शत्रू असतील, त्यांनीं तुझ्या

दारिद्यावस्थेंत तुला पीडा केली असेल; तुझा वारंवार अपमान केला असेल. त्या दुष्टांवर तरी सूड उगवून घे. ह्मणजे तुझ्या मनास समाधान होईल.

ब्राह्मण ह्मणतो:–

**न्यस्तं पदं शिरसि विद्विषतां ततः किं ।**

भावार्थ:—शत्रूंच्या मस्तकावर पाय ठेवला तर त्यांत काय मोठा पुरुषार्थ केला ?

लक्ष्मी ह्मणते:—बाबा, मी देवी आहें. तुला, जें मागशील, तें मी देऊं शकेन. तुला संपत्तीची वगैरे अपेक्षा नसेल तर राहिलें, पण तूं जास्त आयुष्य तरी कां मागत नाहींस ?

ब्राह्मण ह्मणतो:—

**कल्पं स्थितं तनुभृतां तनुभिस्ततः किं ॥**

भावार्थ:—मनुष्याचें शरीर एक कल्पपर्यंत तसेंच राहिलें तर त्यांत काय लाभ ? माते, मला कांहींच नको.

ब्राह्मणाचीं उत्तरें ऐकून व त्याचें दृढ वैराग्य पाहून देवीस फार कौतुक वाटलें, व त्याला वर देण्याची तिची इच्छा वाढत गेली. ह्मणून पुनः एकदां प्रयत्न करावा या इच्छेनें तिनें बोलण्यास सुरवात केली.

लक्ष्मी ह्मणते:—हे ब्राह्मणा, तुला ऐहिक उपभोगांविषयीं खरेंच व अत्यंत तीव्र वैराग्य उत्पन्न झालें आहे हें पाहून मला फार आनंद वाटतो. तुझ्या मनाची स्थिति तुझ्या सध्याच्या आश्रमास शोभेल अशीच आहे. तुला संन्यास घेतल्यामुळें द्रव्यादिकांची गरज नाहीं, आणि शास्त्रदृष्टीनेंही ते तुला प्रस्तुत स्थितींत त्याज्य आहेत. तुला या आश्रमीं ऐहिकभोगांपासून परावृत्त झालें पाहिजे. ह्मणून तुझें सर्व ऐहिकसुखासंबंधी वैराग्य उचित आहे. पण तूं स्वर्गादिलोकांत

उत्तम गति कां मागत नाहींस? स्वर्गादि लोकीं जाऊन सुख भोगण्यास तुला कोणती हरकत आहे? तेथील भोगांपुढें या लोकांतील सर्वोत्कृष्ट भोगही तुच्छ आहेत. ह्मणून तूं तसा वर माग, ह्मणजे तुझ्या सर्व श्रमांचें सार्थक होईल, व माझी तूं निःसीम सेवा केलीस तिचें फल तुला मिळालें असें होईल.

ब्राह्मण ह्मणतोः—माते, मला कशाचीच अपेक्षा नाहीं.

**इतो न किंचित्परतो न किंचित् ।**
**यतो यतो यामि ततो न किंचित् ।**
**विचार्य पश्यामि जगन्न किंचित् ।**

भावार्थः—मला या लोकांतून कांहीं घ्यावयाचें नाहीं, व परलोकांतीलही कशाचीही अपेक्षा नाहीं. मी जिकडे जिकडे फिरत जातों, तिकडून कांहीं मिळावें असें मला बिलकुल वाटत नाहीं. कारण विचार करून पाहिलें तर हें जग कांहींच नाहीं अशी माझी खात्री झाली आहे.

लक्ष्मी ह्मणतेः—तर बाबा, तुला सर्वांत श्रेष्ठ तरी काय वाटतें?

ब्राह्मण ह्मणतोः—

**स्वात्मावबोधादधिकं न किंचित् ॥**

भावार्थः—आत्मज्ञानाशिवाय अधिक मौल्यवान असें कांहींच नाहीं.

हें एकून देवी फार प्रसन्न झाली, व "तथास्तु. तेंच तुला लवकर प्राप्त होईल" असें सांगून अंतर्धान पावली.

असो. याप्रमाणें अति तीव्र व खरें वैराग्य कांहीं भाग्यवान प्राण्यांस एकाएकीं प्राप्त होतें. पण अशीं उदाहरणें अर्थातच फार विरळा. विषयांची मोहकता किती असते याचा अनुभव सर्वांस असतोच. विषयांचा लोभ सुटणें कांहीं सोपें काम नाहीं. त्यांच्या

वरून मन कितीही परावृत्त केलें, तरी तें पुनःपुनः तेथें धांव घेतें, व त्यांच्या मोहांत गुंतून रहातें.

ह्मणून वैराग्यप्राप्तीसाठीं मुमुक्षूनें बराच वेळ नेटानें व दक्षतेनें यत्न केला पाहिजे. अनेक वेळ हार खावूनही पुनःपुनः उत्साहभंग होऊं न देतां इष्टसिद्धीसाठीं झटलें पाहिजे. तेव्हांच हें उत्तम साधन हातीं येतें. या कामीं मुमुक्षूनें वारंवार विचार करून मनास बोध केला पाहिजे. त्याचप्रमाणें मनोनिग्रहासाठीं हळूहळू पण वाढत्या प्रमाणानें अभ्यास केला पाहिजे. शिवाय ईश्वरभक्ति, गुरुसेवा इत्यादि सर्वसंमत उपायांची योजना केली पाहिजे. तरच त्याला यश येतें, व पूर्ण वैराग्य अंगीं बाणतें.

ह्मणून वैराग्यप्राप्तीकरतां मुमुक्षूंस उपयुक्त अशा कांहीं सूचना येथें केल्या आहेत.

( १ ) नित्यानित्यविवेकः—या जगांतील वस्तू नाशिवंत आहेत त्यांचा थोड्याबहुत कालानें नाश झालाच पाहिजे, मग त्यांजवर लोभ ठेऊन काय उपयोग, हें मुमुक्षूनें कधींही विसरतां कामा नये. इष्ट वस्तूंचा वियोग झाला ह्मणजे सुखाची गोष्ट एकीकडेच राहून उलट खेद करण्याचा प्रसंग येतो ह्मणून या नाशिवंत पदार्थावरील आसक्ति कां सोडूं नये ?

भर्तृहरी ह्मणतातः—

**अवश्यं यातारश्चिरतरमुषित्वापि विषयाः ।**
**वियोगे को भेदस्त्यजति न जना यत्स्वयमिमान् ।**
**व्रजन्तः स्वातंत्र्यात्परमपरितापाय मनसः ।**
**स्वयं त्यक्ता ह्येते शमसुखमनंतं विदधति ॥**

भावार्थः—विषयांचा उपभोग फार वेळ जरी घ्यावयास मिळाला तरी अखेर विषयांचे पदार्थ केव्हांना केव्हां तरी जावयाचेच.

मग लोकांनीं आपणच होऊन जर यांस सोडून दिलें तर वियोगांत काय फरक होईल? इतकें मात्र खरें कीं जर ते विषय स्वातंत्र्यानें आपणास सोडून चालते झाले, तर आपले मनास अत्यंत खेद होतो. पण आपणच जर त्या विषयांस खुषीनें सोडून दिलें, तर आपणांस शांतीपासून होणारे उत्तम व अपार सुखाचा लाभ होईल.

आतां हा त्याग विषयांचाच प्रत्यक्ष केला पाहिजे असें नाहीं. विषयांवरील आसक्ति सोडली ह्मणजे बस्. विषयांच्या मोहांत जे सांपडलेले असतात, त्यांना विषयांचा नाश झाला तर अतिशय दुःख होतें. इतकेंच नव्हे तर विषय प्रत्यक्ष उपलब्ध असतांही त्यांचे मनांत अनेक तऱ्हेची काळजी व भय असतेंच.

भर्तृहरी ह्मणतातः—

**भोगे रोगभयं कुले च्युतिभयं वित्ते नृपालाद्भयम्।**
**माने दैन्यभयं बले रिपुभयं रूपे जराया भयम्।**
**शास्त्रे वादिभयं गुणे खलभयं काये कृतांताद्भयम्।**
**सर्वं वस्तु भयान्वितं भुवि नृणां वैराग्यमेवाभयम्।**

भावार्थः—भोग भोगीत असतां रोगाचें भय, सत्कुलांत जन्म झाला तर उत्कुल होण्याचें भय, पैसा असला तर राजदंडाचें भय, बल असलें तर शत्रूपासून भय, मान मिळाला तर दैन्य येण्याचें भय, सुंदर रूप असलें तर ह्यातारपणाचें भय, शास्त्र पढलें तर वाद करणारांचें भय, गुण अंगीं असले तर दुर्जनांचें भय, शरीराला मृत्यूचें भय, याप्रमाणें जगांतील सर्व वस्तूंसंबंधानें भय आहेच; फक्त वैराग्याला मात्र कशाचें भय नाहीं.

विषयांच्या मोहांत सांपडलेल्या मनुष्यांना याप्रमाणें विषय असोत नसोत खरें सुख नाहींच. पण ज्यांनीं विषयाचें खरें स्वरूप

जाणून त्यांवरून आपली आसक्ति काढून टाकिली, त्यांना विषयांचा नाश झाला तरी त्याबद्दल खंती नाहीं, कारण जें अनित्य तें टिकणार नाहीं. तें जावयाचेंच. मग त्याजबद्दल शोक कशाला?

पण जर न्यायोपार्जित धनादि विषय असले तर त्यांचा न्यायानें भोग घ्यावयास कांहीं हरकत नाहीं.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहे:—

**परिज्ञायोपभुक्तो हि भोगो भवति तुष्टये ।**
**विज्ञाय सेवितश्चोरो मैत्रीमेति न चोरतां ॥**

भावार्थ:—भोगाचें खरें स्वरूप जाणून त्यास भोगलें तर तो तुष्टिदायक होतो. ज्याप्रमाणें चोरास ओळखून जर त्याची संगत केली तर तो चोर उपद्रव देत नाहीं, सालसपणानें वागतो.

यासाठीं मुमुक्षूंनीं सर्वदा नित्यानित्यविवेक करून विषयांचा नश्वरपणा जाणून वैराग्याचें अवलंबन करावें, ह्मणजे त्यांची परमार्थांत प्रगति होत जाईल यांत संशय नाहीं. नित्यानित्यविवेक व वैराग्य यांचा परस्परांशीं निकट संबंध आहे. एकापासून एक वाढतें. आणि त्याचप्रमाणें एकावांचून दुसरें निष्फळ व निरुपयोगी ठरतें. पहा. नुसत्या विवेकानें जगांतील सर्व सुखें व भोग अनित्य आहेत इतकें समजेल. पण जर हें समजूनही विषयांवरील आसक्ति कमी झाली नाहीं तर काय उपयोग? सारांश वैराग्यावांचून विवेक निष्फळ होय. उलटपक्षीं नित्यानित्य न पाहतां सर्वत्रच वैराग्ययुक्त दृष्टि ठेवीत गेलें तर श्रेष्ठ, नित्य व उच्च अशा परमात्मतत्वाविषयींही अनास्था होईल, आणि मुमुक्षूचें अनहित होईल. ह्मणून मुमुक्षूनें विवेक व वैराग्य या दोनीही साधनांचें अवलंबन केलें तरच मुमुक्षूची परमार्थांत उत्तम प्रगति होईल.

आतां हें कबूल केलें पाहिजे कीं, एखादी वस्तू अनित्य आहे असें पक्कें समजलें तरी त्या वस्तूविषयीं वैराग्य उत्पन्न होतेंच असें नाहीं. वास्तविक रीतीनें पाहातां तसें व्हावयास पाहिजे. पण मायेचा मोहच असा अनिवार आहे कीं, शहाणे मनुष्याचीही बुद्धी विवेकहीन होते. ज्या वस्तू उघड उघड अत्यंत नाशिवंत आहेत, अशा वस्तूंवर अनिवार आसक्ति असते, व त्या हरप्रयत्नानें भोगावयास मिळाव्या यासाठीं विषयी पुरुष किती तरी काळजी घेतात.

उन्हाळ्यांत बर्फ वगैरे शीत पदार्थ सुखदायक असतात. ह्मणून ते जरी नाशिवंत असले तरी मोठ्या कष्टानें ते मिळवून हौशी लोक त्यांचें सेवन करतात.

त्याचप्रमाणें उष्ण भोजन रुचकर असतें ह्मणून भोजनाचे पदार्थ उष्ण ठेवण्यास किती प्रयत्न चाललेला असतो, व ते उष्ण असतांच त्यांचें सेवन करण्यास लोक किती उत्सुक असतात. लौकर नाश पावणाऱ्या फळा व फुलांविषयीं किती काळजी घेऊन त्यांचा संग्रह केला जातो. सारांश कांहीं अनित्य वस्तूंवरील आसक्ति कमी न होतां ती उलटी वाढत जाते. यासाठीं केवळ नित्यानित्यविकेकानें मुमुक्षूचें काम भागत नाहीं. ह्मणून मोक्ष मिळवूं इच्छिणाऱ्या साधकांनीं दुसरा एक विचार केला पाहिजे. त्याला सारासारविचार असें ह्मणतात.

( २ ) सारासारविचारः—ह्या जगांतील सर्व वस्तूंबद्दल नीट विचार केला तर त्या नाशिवंत आहेत इतकेंच नव्हे तर त्या असारही आहेत. तत्वदृष्ट्या त्या कांहींच महत्वाच्या नाहींत, कारण शहाण्या मनुष्यास कायमचें सुख देण्याची शक्ति त्यांच्या अंगीं मुळींच नाहीं. कोणत्याही विषयापासून खरें समाधान मिळण्याची आशा करणें

व्यर्थ होय. इतकेंच नव्हे तर त्यांजवर आसक्ति बसली ह्मणजे परिणामीं दुःख ठेवलेलें आहेच, व शिवाय त्या बिचाऱ्या प्राण्यास त्या विषयांच्या मोहानें संसारचक्रांत बद्ध राहून जन्म परंपरेंत भ्रमण करावें लागतें. ह्मणून साधकानें सारासारविचार करून एक परमात्मतत्त्वावर निष्ठा ठेवून इतर सर्व जगताविषयीं दृढ वैराग्य चित्तांत धरावें ह्मणजे त्याचें कल्याण होईल.

( ३ ) दोषदृष्टिः—विषयी पुरुष त्यांच्या इष्ट विषयांच्या गुणाकडेच दृष्टि ठेऊन त्यांजवर आसक्त होतात. पण ते जर त्या विषयांच्या अनेक दोषांकडे लक्ष देतील तर त्यांचा मोह कमी होत जाईल. कारण गुणच जर लक्षांत आणिले, आणि त्या गुणांचेंच चिंतन केलें, तर त्या विषयावरील लोभ वाढत जाणार. पण जर त्या विषयाचे दोष शोधून पाहिले, व त्या दोषाविषयींच वारंवार विचार करीत गेलें तर त्या विषयासंबंधानें अरुचि उत्पन्न होऊन तो विषय नकोसा होईल. सारांश दोषदृष्टीनें विषयांकडे पहाणें हें वैराग्यप्राप्तीचें एक उत्तम साधन आहे.

विषयांची अनित्यता, असारता, व दुःखमयता हे त्यांचेठाईं सर्वसाधारण दोष आहेत. याशिवाय प्रत्येक विषयाचे भिन्नभिन्न स्वाभाविक दोष असतातच. त्या दोषांकडे विचारवंत पुरुष नजर पोहोंचवितो, ह्मणजे हे विषय वरवरच रमणीय दिसतात, वस्तुतः ते कंटाळवाणे व नीरस आहेत, अशी त्याची खात्री होते.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**आपातरमणीयेषु भोगेष्वेवं विचारवान् ।**
**नानुरज्यति किं त्वेतान्दोषदृष्ट्या जिहासति ॥**

भावार्थः—याप्रमाणें विचारवान पुरुष वरवर रमणीय दिसणाऱ्या विषयांवर लुब्ध होत नाहीं, व त्यांस दोषदृष्टीनें टाकून देण्याची इच्छा करतो.

( ४ ) ज्ञानः—परंतु या वरील तीन साधनांस सहाय्य करून मुमुक्षूस तीव्र वैराग्य उत्पन्न करणारें खऱ्या तत्वज्ञानासारखें दुसरें कोणतेंही साधन नाहीं. हें ज्ञान प्रथमतः अपरोक्षच झालें पाहिजे अशी अट नाहीं, व अपरोक्षज्ञान या पायरीवर मुमुक्षू असतां होणेंही शक्य नाहीं. पण गुरुमुखानें व शास्त्राध्ययनानें होणारें परोक्षज्ञानही वैराग्यप्राप्तीस कारणीभूत होतें. ज्ञान व वैराग्य हीं एकमेकांस सहाय्यभूत होतात. ह्मणजे वैराग्यानें ज्ञान वाढतें व ज्ञानानें वैराग्य वाढतें.

वसिष्ठ ह्मणतातः—

**वैराग्यबोधोपरमाः सहाय्यास्ते परस्परं ।**

भावार्थः—वैराग्य, तत्वज्ञान, व उपरति हे एकमेकांस सहाय्य करतात.

उपरतीविषयीं पुढील व्याख्यानांत विचार करावयाचा आहे. सध्या तत्वज्ञान वैराग्यास कसें सहाय्यभूत होतें तें पाहूं. सद्वस्तूचें परोक्ष ज्ञानही जर मुमुक्षूस झालें तर ब्रह्मप्राप्तीपुढें इतर सर्व ऐहिक व पारलौकिक भोग तुच्छ आहेत अशी खात्री होऊन मुमुक्षू अत्यंत वैराग्ययुक्त होतो. शिवाय सर्व दृश्य पदार्थ हे मायामय आहेत असें त्यास समजलें कीं सहसा तो त्यांच्या मोहांत गुंतून जात नाहीं.

( ५ ) अभ्यासः—नुसत्या विचारानें किंवा परोक्षज्ञानानेंही मुमुक्षूचें सर्व काम भागत नाहीं. कारण विषयांचा मोह अनिवार असल्यामुळें तो एकदम सुटणें शक्य नाहीं. तो हळू हळू सोडला पाहिजे. व तो सोडण्याचा प्रयत्न एकसारखा व क्रमाक्रमानें झाला पाहिजे. यालाच अभ्यास ह्मणतात.

कोणतीही महत्वाची गोष्ट एकदम साध्य होत नाहीं. ती क्रमाक्रमानें व हळू हळू साध्य केली पाहिजे. ती जितकी अवघड असेल तितका तिच्या प्राप्तीकरतां नेटानें यत्न केला पाहिजे. हा यत्न वारंवार करीत गेलें ह्मणजे अखेर जें कार्य प्रारंभीं अवघड दिसत होतें तें सोपें वाटूं लागतें व तें सहज साध्य होतें.

अभ्यासाच्या उपयुक्ततेबद्दल सर्वांस अनुभव आहेच. बालकास प्रथम एक एक अक्षर ओळखण्यास फारच कठीण वाटतें. पण कांहीं काळ गेल्यावर तोच बालक अभ्यासाच्या जोरावर अति त्वरेनें मोठमोठे ग्रंथ वाचण्यास समर्थ होतो. त्याचप्रमाणें मुमुक्षूस अभ्यासाच्या योगानें या सर्व जगताविषयीं विरक्त होतां येतें. पण हा अभ्यास मात्र चिरकाल चालविला पाहिजे.

वसिष्ठ ह्मणतातः—

**जन्मांतरशताभ्यस्तारामसंसारसंस्थितिः ।**
**साचिराभ्यासयोगेन विना न क्षीयते क्वचित् ॥**

भावार्थः—हे रामा, शेंकडों जन्मांच्या संस्कारानें दृढ झालेली संसारावरील आसक्ति दीर्घकालपर्यंत अभ्यास योग केल्याशिवाय क्षीण होणार नाहीं.

हा अभ्यास दोन प्रकारचा. पहिला विषयांकडे दोषदृष्टीनें पाहून त्यांस तुच्छ व त्याज्य मानीत जाण्याचा; व दुसरा सद्वस्तूविषयीं पूज्यबुद्धि व आदर वाढविण्याचा. पहिल्याविषयीं विचार झालाच आहे. आतां दुसरा ह्मणजे ब्रह्माभ्यास कसा करावयाचा तें पाहूंः—

**तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनं।**
**एतदेकपरत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ।**

भावार्थः—त्या सद्वस्तूचें चिंतन, तिजविषयीं संभाषण, व एक-

मेकांस तिजसंबंधानें बोध करणें, तिच्याचठायीं एकनिष्ठ भक्ति ठेवणें यास ब्रह्माभ्यास ह्मणतात.

हा ब्रह्माभ्यास मुमुक्षु मनःपूर्वक व एकनिष्ठेनें करीत गेला ह्मणजे विषयांवरील वासना अजीबात नाहींशी होते.

पंचदशींत अद्वैतानंदांत ह्मटलें आहेः—

**वासनानेककालीना दीर्घकालं निरंतरं ।**
**सादरं चाभ्यस्यमाने सर्वथैव निवर्तते ॥**

भावार्थः—अनेक कालपर्यंत जिचा संस्कार झाला आहे अशी ही वासना दीर्घकालपर्यंत, एकसारखा, व आदरपुरःसर अभ्यास केला तर अजीबात नाहींशी होते.

( ६ ) भक्तिः—पण हा ब्रह्माभ्यास सर्वांसच एकदम साधतो असें नाहीं. कांहीं भाग्यवान पुरुषांची निर्गुण ब्रह्मावर निष्ठा असते व ते ब्रह्माभ्यासही सहजरीतीनें करूं शकतात. पण जो या उच्च स्थितीला अजून येऊन पोहोंचला नाहीं त्यानें काय करावें ? त्यानें या मायेच्या मोहांतून कसें सुटावें ?

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥**

भावार्थः—ही माझी त्रिगुणयुक्त व दैवी माया जिंकण्यास फार कठीण आहे. जे मला शरण येतात तेच या मायेला तरून पलीकडे जातात.

आपल्या स्वतःच्या शक्तीनें हा भवसागर तरून जाण्याची ताकत फार थोड्याच पुरुषांस असते. ह्मणून कोणाचें तरी सहाय्य मुमुक्षूनें घेतलेंच पाहिजे. हें सहाय्य देणारा ईश्वरासारखा समर्थ दुसरा कोणीच

नाहीं. ह्मणून वैराग्यप्राप्तीसाठीं ईश्वराचे भक्तीसारखा दुसरा उत्तम उपाय कोणताही नाहीं.

आतां ईश्वराची भक्ति एकनिष्ठेनें व प्रेमळबुद्धीनें मुमुक्षू करूं लागला तर त्याला दोन रीतीनें फायदा होतो. तो असा--एक तर अनुभवावरून असें दिसून येतें कीं, एका वस्तूवरील आपली आसक्ति कमी करण्याचा सोपा मार्ग ह्मटला तर दुसऱ्या एखाद्या मनोहर वस्तूकडे आपलें मन लावणें हा होय. नव्या वस्तूवरील प्रेम वाढत गेलें कीं जुन्या वस्तूवरील आसक्ति कमी झालीच पाहिजे.

पण एका नाशिवंत वस्तूवरून आपलें मन काढून तें दुसऱ्या नाशिवंत वस्तूच्या मोहांत पाडणें हें परमार्थांत मुळींच श्रेयस्कर होणार नाहीं. या संसाराच्या येरझारांतून सुटून जाण्यास अशानें काय मदत होणार ? पण ईश्वरावर विश्वास ठेवून आपली भक्ति जर मुमुक्षू वाढवीत गेला, तर अनायासानें त्याचें मन हळूहळू विषयांकडून परावृत्त होईल, व त्याची विषयावरील आसक्ति कमी होत जाईल. सारांश, भक्तीच्या बळानें त्याचे अंगीं वैराग्य बाणत जाईल, व त्याची उन्नति होत होत अखेर त्याच्या जन्माचें सार्थक होईल, याबद्दल संशय नाहीं. विषयांवरील लोभाप्रमाणें ईश्वरभक्ति अपायकारक नाहीं, येवढेंच नव्हे तर ती तारक व उच्चपददायक आहे हें सांगावयास नको.

शिवाय ईश्वर परम दयाळू व भक्तजनाभिमानी असल्यामुळें तो आपण होऊन आपल्या भक्तांस या संसारांतून मुक्त करतो.

समर्थ ह्मणतातः—

**संसार ह्मणिजे महापूर। माजी जळचरें अपार। खंडूं धांवती विखार। काळसर्प ॥ आशा ममता देह बेडी। सुसरी करिताती ताडातोडी। नेऊनि दुःखाचे सांगडी। माजी घालिती॥ बहुतेक**

आवर्ती पडले । प्राणी वाहतचि गेले । जिहीं भगवंता बोभाइलें । भावार्थवळें ॥ देवें आपण घालूनि उडी । तयांसि नेलें पैलथडी । येर नी अभाविकें बापुडीं । वाहतचि गेलीं ॥ भगवंत भावाचा भुकेला । भावार्थ देखोनि भुलला । संकटीं पावे भाविकाला । रक्षीत असे ॥ जयां भगवंत आवडे । तयांचें देवासि सांकडें पडे । देहदुःख समूळ झडे । निज दासांचें ॥

सारांश, ईश्वरासारख्या परमोच्च तत्वावर भक्ति बसल्यामुळें स्वाभाविकरीतीनें मन विषयांस तुच्छ मानूं लागतें, व विषयांच्या मोहांतून सुटल्यामुळें त्याची उन्नति होत जाते. व शिवाय सर्वशक्तिमान ईश्वर प्रसन्न होऊन जर मुमुक्षूस सहाय्य करण्यास तय्यार झाला तर वैराग्यप्राप्तीला व मोक्षप्राप्तीला काय उशीर ?

वरील सर्व उपायांनीं किंवा त्यांपैकीं जे साधतील तितक्यांनीं मुमुक्षूंनीं वैराग्य संपादन करावें. वैराग्य प्राप्त झालें व तें खरें आणि तीव्र असलें तरच मोक्षदायक ब्रह्मज्ञान होण्यास अडचण पडणार नाहीं. वैराग्याशिवाय मात्र हें कल्याणकारक ज्ञान मिळणें अशक्य असें ह्मटलें तर चालेल.

रंगनाथस्वामी त्यांच्या योगवासिष्ठांत ह्मणतात:—

यालागीं ब्रह्मप्राप्तीप्रती । एक वैराग्य गा रघुपती ।
वैराग्येंविण ज्ञानाची उक्ती । व्यर्थ बोलती गा वाचाळपणें ॥

हें सर्व खरें असेल पण आमची मागील एक शंका राहिली आहेच. विषयसुखाचा आह्मास प्रत्यक्ष अनुभव येतो, व तें गोडही वाटतें. मग तें सोडून लाभ काय ? परमार्थासाठीं श्रम केले तर उत्तम सुख मिळेल अशी खात्री आहे काय ? नाहींतर हातचें सोडून पळत्याच्या पाठीं लागून व्यर्थ अखेर पश्चात्ताप करण्याची पाळी येईल.

याचें उत्तर असें आहे कीं, या विषयोपभोगानें खरें सुख कधींही मिळत नाहीं. वास्तविकरीतीनें पहातां विषय दुःखमयच आहेत. हें ध्यानांत ठेऊनच सनत्कुमारांनीं नारदास सांगितलें कीं, सर्वव्यापी परमात्मप्राप्तींतच सुख आहे, या अल्प दृश्य सृष्टींत तें नाहीं.

**सुखं वैषयिकं शोकसहस्रेणावृतत्वतः ।**
**दुःखमेवेति मत्वाह नाल्पेस्ति सुखमित्यसौ ॥**

भावार्थः—विषयापासून उत्पन्न होणारें सुख सहस्र प्रकारच्या शोकांनीं आवृत असल्यामुळें तें खरोखर दुःखच आहे असें जाणून तो ह्मणाला कीं, या परिमित सृष्टींत सुख नाहीं.

परंतु परमात्मतत्त्व सुखमय असल्यामुळें, ज्या भाग्यवान साधकास त्याची प्राप्ति होते त्याला खरें व अविनाशी असें अत्यंत सुख मिळतें. या सुखाचें वर्णन करतां येत नाहीं.

**समाधिनिर्धूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत् ।**
**न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदंतःकरणेन गृह्यते ॥**

भावार्थ—समाधीनें निर्मल झालेलें चित्त आत्मानुसंधानांत स्थिर झालें ह्मणजे जें सुख होतें त्याचें वाणीनें वर्णन करतां येत नाहीं तर तें स्वतः अंतःकरणानेंच अनुभवतां येतें.

ह्मणजे सर्व व्यापारधंदे सोडून योगी होऊन नाक धरून स्वस्थ बसलें, तरच खरें सुख मिळणार काय? वाहवा! असें झालें तर अनर्थ होणार नाहीं का? सर्व मनुष्यें आपापले उद्योग सोडून योगाभ्यासांत स्तब्ध बसलीं तर सृष्टीची रहाटी कशी चालेल? याचें उत्तर असें आहे कीं, एक तर सर्व मनुष्यें योगाभ्यास करावयास लागतील असें नाहीं. शिवाय ब्रह्मप्राप्तीसाठीं योगाभ्यासच केला पाहिजे असें नाहीं. समाधी या शब्दानें योग्याची समाधी असें समजूं नये.

योगवासिष्ठांत सुरघु ह्मणतोः—

**तत्वावबोधो भगवन् सर्वाशा तृणपावकः ।**
**प्रोक्तः समाधिशब्देन न च तूष्णीमवस्थितिः ॥**
**समाहिता नित्यतृप्ता यथाभूतार्थदर्शिनी ।**
**साधो समाधिशब्देन परा प्रज्ञोच्यते बुधैः ॥**

भावार्थः—सर्व आशांना तृणवत् भस्म करणारें तत्वज्ञान हाच समाधिं शब्दाचा खरा अर्थ समजावयाचा. समाधि ह्मणजे स्तब्ध बसणें नव्हे. हे साधो, समाधि शब्दानें, शांत, नित्य तृप्त, यथार्थ समजणारी जी पराप्रज्ञा, तीच ज्ञानी पुरुषांनीं बोलली जाते.

**नित्यप्रबुद्धचित्तत्वात्कुर्वंतोऽपि जगत् क्रियाः ।**
**आत्मैकतत्वतन्निष्ठाः सदैव सुसमाधयः ॥**

भावार्थः—जे स्वात्मतत्वनिष्ठ असतात त्यांनीं सावध चित्तानें सर्व या जगांतील क्रिया केल्या, तरी ते उत्तम समाधींतच आहेत असें समजावें.

असा जो खरा तत्वज्ञानी त्यालाच उत्तम प्रकारची तृप्ति प्राप्त होते. कारण त्याला या जगतांत कांहीं मिळवावयाचेंही राहिलें नाहीं व कोणतें कर्तव्यही राहिलें नाहीं.

पंचदशींत ह्मटलें आहेः—

**सांकुशा विषयैस्तृप्तिरियं तृप्तिर्निरंकुशा ।**
**कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव तुष्यति ॥**

भावार्थः—विषयांपासून होणारी तृप्ति प्रतिबंधयुक्त असते. या तृप्तीस कोणताही प्रतिबंध नाहीं. करावयाचें तें सर्व केलें, मिळावयाचें तें मिळालें, ह्मणून तो तृप्त होतो.

अशी तृप्ति ज्यास प्राप्त झाली आहे त्या धन्य पुरुषाचे उद्गार कसे असतात ते पहाः—

धन्योऽहं धन्योऽहं नित्यं स्वात्मानमंजसा वेद्मि ।
धन्योऽहं धन्योऽहं ब्रह्मानंदो विभाति मे स्पष्टं ॥
धन्योऽहं धन्योऽहं दुःखं सांसारिकं न वीक्ष्येऽद्य ।
धन्योऽहं धन्योऽहं स्वस्याज्ञानं पलायितं क्वापि ॥
धन्योऽहं धन्योऽहं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ।
धन्योऽहं धन्योऽहं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नं ॥
धन्योऽहं धन्योऽहं तृप्तेर्मे कोपमा भवेल्लोके ।
धन्योऽहं धन्योऽहं धन्यो धन्यः पुनः पुनर्धन्यः ॥

भावार्थः—मी धन्य आहें, मी धन्य आहें, मला नित्य आत्मा स्पष्टपणानें दिसतो, व ब्रह्मानंद स्पष्ट भासतो. मला संसाराचें दुःख बिलकुल दिसत नाहीं, व माझें सर्व अज्ञान नाहींसें झालें आहे. मी धन्य आहें, मी धन्य आहें, मला कर्तव्य कांहींच उरलें नाहीं व प्राप्त होण्याचें सर्व मिळालें. मी धन्य आहें, मी धन्य आहें, माझ्या तृप्तीची उपमा या जगांत कोठें मिळेल? मी खरोखर धन्य आहें व पुनःपुनः मी धन्य आहें.

असे उद्गार विषयी लोकांचे कधीं तरी असतील काय? ह्मणून विषयांवर विरक्त होऊन मुमुक्षूंनीं ब्रह्मप्राप्तीविषयीं दीर्घ प्रयत्न करावा.





# परमार्थपर व्याख्यानमाला-

## ३

### शमदमादि षट्संपत्ति.

विवेक आणि वैराग्य या दोन साधनांचें विवेचन झालें. आतां तिसरें साधन जी षट्संपत्ति तिजविषयीं या व्याख्यानांत विचार कर्तव्य आहे. या संपत्तीचीं सहा अंगें आहेत. त्यांचीं नांवें:—शम, दम, तितिक्षा, उपरति, श्रद्धा, आणि समाधान, अशीं आहेत. या सर्वांची मुमुक्षूला आवश्यकता आहेच. ह्मणून त्यांचीं लक्षणें कोणतीं हें सांगितलें पाहिजे. पण प्रथमारंभीं एक शंका विचारवान् साधकाला सहज येण्यासारखी आहे, तिचें समाधान केलें पाहिजे. या शंकेचें दिग्दर्शन एकवार झालेंच आहे. पण ती महत्वाची असल्यामुळें तिजविषयीं पुनः एकवार चर्चा करणें उपयुक्त वाटतें.

ज्या साधकास या सर्व विषयाची अद्याप बरोबर समजूत झाली नाहीं, तो ह्मणेल कीं आमचा खरा हेतु तर ब्रह्मज्ञान संपादन करण्याचा आहे. असें असतां विवेक, वैराग्य, शमदमादि साधनांस इतकें महत्व कां देतात? तीं तर मुळींच ज्ञानाचीं साधनें नाहींत. पहा, या जगतांतील कोणत्याही वस्तूचें खरें ज्ञान मिळवावयाचें आहे, तर दोन प्रकारचीं साधनें उपयुक्त होतात. एक तर त्या वस्तूसंबंधानें शक्य तें ज्ञान आपल्या इंद्रियांनीं प्रत्यक्ष करून घेतलें पाहिजे. अथवा ती वस्तु जर कारणपरत्वें प्रत्यक्ष मिळण्यासारखी नसेल, तर तिजविषयीं ज्ञाते व अनुभवी पुरुषांच्या मुखानें, किंवा त्यांचे लेख वाचून माहिती मिळविली पाहिजे. पण हें सारें एकीकडे ठेवून विवेक वैराग्यादि साधनांच्या खटपटीला त्या बिचाऱ्या मुमुक्षूला कां लावतात?

या शंकेचें समाधान असें आहे कीं, साधकानें वेदशास्त्रादिकांचें अध्ययन करून सद्वस्तूविषयीं शास्त्रीय ज्ञान तर मिळविलें पाहिजेच, व गुरुमुखानें आपण शास्त्राचें खरें मर्म समजलों किंवा ठिकठिकाणीं आपली गैरसमजूत झाली आहे, याजबद्दल निवाडा करून घेऊन तें ज्ञान शुद्ध करून घेतलें पाहिजे. पुढें सर्व शंकांचें समाधान करून तें ज्ञान संशयरहित व दृढ केलें पाहिजे.

पण शास्त्राभ्यासानें व गुरुमुखानें जें ज्ञान साधकास प्राप्त व्हावयाचें तें अर्थातच परोक्ष असणार. ह्मणून केवळ या ज्ञानानें मोक्षप्राप्ति होणें शक्य नाहीं. साधकास जेव्हां स्वतःच्या अनुभवानें सद्वस्तूचें अपरोक्षज्ञान होतें, तेव्हांच तो मोक्षाचा अधिकारी होतो. ह्मणून साधकानें अपरोक्ष ज्ञानाकरतां एकनिष्ठ अंतःकरणानें अविश्रांत श्रम केले पाहिजेत.

पण परब्रह्माचें अपरोक्ष ज्ञान होणें फारच कठिण आहे. कारण जगांतील वस्तूप्रमाणें तें इंद्रियगोचर नाहीं. ह्मणून तें दाखवितां किंवा पहातां येत नाहीं. फार तर काय मनाची ही धांव तेथपर्यंत जात नाहीं.

ज्ञानेश्वरमहाराज ह्मणतातः—

**कैसें बोटानें दाखवूं तुला। पाहे अनुभवें गुरूच्या रे मुला॥ धृ०॥**
**तेथें डोळिया दृष्टि पूरेना। तेथें वृत्तीचें कांहीं चालेना॥**
**तेथें बुद्धीचा रीघ होईना। तेथें मनाची धांव पुरेना गा॥धृ०॥**

ब्रह्मसाक्षात्कार व्हावयास सूक्ष्म अंतर्दृष्टि जागृत झाली पाहिजे, व यासाठीं अनेक उपायांनीं चित्तशुद्धि केली पाहिजे. जोंपर्यंत चित्त विषयासक्तीनें मलिन झालेलें आहे, तोंपर्यंत अपरोक्ष ज्ञान होणें शक्य नाहीं.

वसिष्ठ ह्मणतातः—

**आशावैवश्यमलिने चित्ते संतोषवर्जिते ।**
**म्लाने वक्रमिवादर्शे न ज्ञानं प्रतिबिंबति ॥**

भावार्थः—जसें मलानें आच्छादित झालेल्या आरशांत तोंड नीट प्रतिबिंबित होत नाहीं, त्याचप्रमाणें, आशेनें व्याकुल होऊन मलिन झालेल्या चित्तांत ज्ञान बिंबत नाहीं.

चित्ताचा विषयवासनारूपी मल जावा ह्मणूनच या सर्व साधनांची येवढी खटपट करावी लागते. मनुष्याचें मन स्वभावतःच विषयांकडे धांवत असतें, व त्यांच्या लोभांत गुंतून राहातें. त्याला हर प्रयत्नानें परावृत्त करून विषयवासनारहित व शुद्ध केलें तरच मुमुक्षूस ज्ञानप्राप्ति होईल.

बरें हें जरी कबूल केलें तरी विवेक व वैराग्य या दोन साधनांनींच मुमुक्षूची गरज कां भागूं नये? हें सर्व जग नाशिवंत आहे, तें आगेंमागें सर्व अजीबात नाहींसें होणार. सर्व सुखोपभोग क्षण-भंगुर आहेत, एक परमात्मतत्व मात्र अविनाशी असून श्रेष्ठ आहे, अशी खात्री झाल्यावर विषयासंबंधानें वैराग्य उत्पन्न झालेंच पाहिजे व परमात्म्यावर निष्ठा बसलीच पाहिजे. मग इतर साधनांची अपेक्षा कां असावी? या शमदमादिकांच्या घोंटाळ्यांत त्या बिचाऱ्या साध-काला कां घालतां?

याचें उत्तर हेंच आहे कीं हें जगड्व्याळ उत्पन्न करणारी माया अनिवार आहे. तिच्या खऱ्या शक्तीविषयीं प्रथमतःच वाजवी कल्पना होत नाहीं. पण जेव्हां मुमुक्षू तिला जिंकण्यासाठीं सरसावून पुढें उभा रहातो, तेव्हां तिच्या विलक्षण प्रभावाचा त्याला हळूहळू अनुभव येऊं लागतो. तिला सोडूं लागलें तर ती सुटत नाहीं. तिला तोडूं

गेलें तर ती तुटत नाहीं. तिला लांब झुगारून दिलें तर ती पुनः येऊन चिकटते. तिचा मी समूळ नाश केला असें जरी साधकास वाटलें, तरी ती लौकरच ताजी तवानी होऊन त्या बिचाऱ्याला जेर करते. तिला मी खास जिंकिलें असा भ्रम मुमुक्षूस होतो न होतो, इतक्यांत ती केव्हांच नकळत येऊन त्याजवर झेंप घालते, आणि त्याला एका क्षणांत चीत करून टाकते.

मायेच्या विलक्षण मोहकतेबद्दल अनुभव सर्व प्राणिमात्रांस आहेच. मी मी ह्मणणारे महापुरुषही हिला हारी आले आहेत. पहा, विश्वामित्रासारखा धैर्यवान, आग्रही, व मनस्वी पुरुष मिळणें कठीण. पण त्यालाही मेनकेनें हं हं ह्मणतां वश केला, व आपल्याबरोबर कुत्र्याच्या रूपानें देवसभेस नेला, हें सर्वांस माहित आहेच. अन्य महान् महान् ऋषींचीही याचप्रमाणें दुर्दशा झाली आहे. मग बिचाऱ्या प्राकृत मानवांची काय कथा?

भर्तृहरी ह्मणतातः—

> **विश्वामित्रपराशरप्रभृतयो वातांबुपर्णाशनाः ।**
> **तेऽपि स्त्रीमुखपंकजं सुललितं दृष्ट्वैव मोहं गताः ।**
> **शाल्यन्नं सघृतं पयोदधियुतं भुंजंति ये मानवाः ।**
> **तेषामिंद्रियनिग्रहो यदि भवेद्विन्ध्यस्तरेत्सागरं ॥**

भावार्थः—विश्वामित्रपराशरासारखे वारा, पाणी व झाडांचीं पानें खाऊन रहाणारे ऋषीही स्त्रियांचें सुंदर मुखकमल पाहून मोहित झाले. मग तांदुळांचा भात, तूप, दूध, व दहीं यांनीं मिश्रित असा जे भक्षण करतात, त्यांना जर इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवतां येतील, तर विंध्याद्रि देखील समुद्रावर तरूं शकेल.

आतां प्रथमदर्शनीं, मनुष्य विषयांस भुलून आपला नाश करून

घेतो ही गोष्ट आश्चर्यकारक आहे. कारण मनुष्यास सदसद्विवेक बुद्धि असल्यामुळें आपलें खरें हित कशांत आहे हें त्याला पूर्णपणें कळतें. त्याचप्रमाणें आपणास कशापासून अपाय होईल हेंही त्याला सहज समजतें. असें असूनही तो आत्मोन्नतीसाठीं यत्न करीत नाहीं इतकेंच नव्हे, पण उलट विषयांस भुलून आपला घात करून घेतो. तेव्हां मोहाचा महिमाच गहन आहे असें ह्मणावें लागतें.

भर्तृहरी ह्मणतातः—

> अजानन्दाहार्तिं विशति शलभो दीपदहने ।
> न मीनोऽपि ज्ञात्वावृतबडिशमश्नाति पिशितं ।
> विजानन्तो ह्येते वयमिह विपज्जालजटिलान् ।
> न मुंचामः कामानहह गहनो मोहमहिमा ॥

भावार्थः—दहनापासून होणारें दुःख माहित नसल्यामुळें पतंग दिव्याच्या ज्योतींत शिरतो. मासादेखील झांकलेला गळ न समजल्यामुळें मांस खातो. पण आह्मांस सर्व कळत असतांही आह्मी दुःखजालांनीं व्याप्त अशा विषयवासनांचा त्याग करित नाहीं. यास्तव अरेरे मोहाचा महिमा गहन आहे हेंच खरें.

पण नीट विचार केला तर यांत खरोखर आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. कारण मायेची शक्तीच विलक्षण आहे. ही माया मोठ्या सत्पुरुषांचाही छल करते.

भर्तृहरी ह्मणतातः—

> बीभत्साः प्रतिभांति किं न विषयाः किंतु स्पृहायुष्मती ।
> देहस्यापचयो मतौ निविशते गाढो गृहेषु ग्रहः ।
> ब्रह्मोपास्यमिति स्फुरत्यपि हृदि व्यावर्तिका वासना ।
> का नामेयमतर्क्यहेतुगहना दैवी सतां यातना ॥

भावार्थः—विषय कंटाळवाणे वाटत नाहींत काय? पण त्यांजवरील आसक्ति कायम रहातेच. देहाचा नाश होणार हें ध्यानांत येऊनही गृहादिकांवरील लोभ दृढ रहातो. ब्रह्माची उपासना करावी अशी अंतःकरणांत स्फूर्ति होत असतांही विषयवासना आह्मास परावृत्त करते. सत्पुरुषांनां दुर्दैवानें या यातना कां सोसाव्या लागतात, याचा हेतु मुळींच कळत नाहीं.

सारांश वैराग्य प्राप्त होण्यास किती आयास पडतात, व तें नष्ट होण्याचें किती भय असतें हें सहज लक्षांत येईल. ह्मणून वैराग्य संपादून तें कायम ठेवण्यास विशेष सामर्थ्याचे उपाय योजिले पाहिजेत. या उपायांस शमदमादि षट्संपत्ति असें ह्मणतात.

आतां विषयांवर लुब्ध होऊन मनुष्यास विषयांकडे प्रवृत्त करणारें कोण? मनुष्यानें विषयांपासून परावृत्त होण्यास कितीही प्रयत्न केला तरी त्याला पुनः विषयांकडे वळवून त्यांचे मोहांत गुंतवून ठेवणारें कोण? मनुष्याच्या पारमार्थिक उन्नतीच्या मार्गांत अनेक विघ्नें आणून त्या बिचाऱ्याला संसारचक्रांत गुंतवून ठेवणारें कोण? या प्रश्नांचा नीट विचार केला तर या सर्व अनर्थपरंपरेचें कारण त्याचें मनच होय अशी खात्री होईल. ह्मणून प्रथमारंभीं मुमुक्षूनें या मनाचा निग्रह केला पाहिजे.

वसिष्ठ ह्मणतातः—

**अस्य संसारवृक्षस्य सर्वोपद्रवदायिनः ।**
**उपाय एक एवास्ति मनसः स्वस्य निग्रहः ॥**

भावार्थः—या सर्वप्रकारें उपद्रव देणाऱ्या संसारवृक्षाच्या नाशाला उपाय एकच आहे, व तो आपल्या मनाचा निग्रह हाच होय.

कारणः—

**सहस्रांकुरशाखात्मफलपल्लवशालिनः ।**
**अस्य संसारवृक्षस्य मनो मूलमिति स्थितं ॥**

भावार्थः—हजारों शाखा व अंकुर असणाऱ्या, व फळें आणि पल्लव यांनीं युक्त अशा या संसारवृक्षाचें मन हें मूळ होऊन राहिलें आहे.

कोणत्याही झाडाचा वरचा भाग तोडला तर त्या झाडास नवे अंकूर व नव्या शाखा फुटून त्याचा विस्तार पुनः पूर्ववत वाढतो. ह्मणून मुळाचा नाश केल्याशिवाय झाडाचा नाश होणें शक्य नाहीं. मूळ कायम राहिलें तर झाडाचा पुनःपुनः उगम होऊन तें वाढण्याचा संभव असतोच. तशीच स्थिति या संसाराची आहे. संसाराचा नाश करणें असल्यास त्याचें मूळ जें मन त्याचा अगोदर नाश झाला पाहिजे.

वसिष्ठ ह्मणतातः—

**मनसोऽभ्युदयो नाशो मनोनाशो महोदयः ।**
**ज्ञमनो नाशमभ्येति मनोऽज्ञस्य हि शृंखला ॥**

भावार्थः—मनाचा विकास हाच आपला नाश. मनाचा नाश हें आपलें मोठें कल्याण. शहाण्या मनुष्याचें मन नाश पावतें. तेंच मन अज्ञास शृंखलारूपी होऊन बद्ध करतें.

पण मनाचा नाश करणें ह्मणजे त्यास अजीबात नाहींसें करणें असें मात्र समजूं नये. कारण तसें केलें तर कोणतेंच कार्य सिद्ध न होतां, उलट मनुष्याची स्थिति अति शोचनीय होईल. मनोनाश ह्मणजे मनाच्या स्वातंत्र्याचा नाश, अर्थात् मनोनिग्रह हाच अर्थ इष्ट आहे. मनाला जिंकून आपल्या ताब्यांत ठेवावें; त्याच्या आधीन आपण होऊं नये, त्याचा पगडा आपल्यावर बसूं देऊं नये, ह्मणजे झालें. कारण मन जर आपल्या ताब्यांत पूर्णपणें आलें, तर तें आपल्या इष्ट कार्यांत, अर्थात्

परमार्थप्राप्तींत, विघ्नें आणण्यास समर्थ होणार नाहीं. पण जर मनास न जिंकितां उलट मनाच्या ताब्यांत साधक राहिला, तर मोक्षप्राप्तीची आशा करणें व्यर्थ होईल.

वसिष्ठ ह्मणतातः—

न धनान्युपकुर्वंति न मित्राणि न बांधवाः ।
न हस्तपादचलनं न देशांतरसंगमः ॥
न कायक्लेशवैधुर्यं न तीर्थायनजीवितं ।
केवलं तन्मनोमात्रजयेनासाद्यते परं ॥

भावार्थः—परब्रह्मप्राप्तीस पैशाचा उपयोग होत नाहीं, मित्रांचा नाहीं, सोयरेधायऱ्यांचाही नाहीं. हातपाय हालविले, देशांतराला गेलें, शरीराला (तपादिकांनीं) क्लेश दिले, किंवा तीर्थाटन करण्यांत सर्व आयुष्य घालविलें तरी तें सर्व व्यर्थ होतें. ती परवस्तु केवळ मनाच्या जयानेंच प्राप्त होते.

ह्मणूनच वसिष्ठमुनि उपदेश करतातः—

हस्तं हस्तेन संपीड्य दंतान्दंतैर्विचूर्ण्य च ।
अंगान्यंगैः समाक्रम्य जयेदादौ स्वकं मनः ॥

भावार्थः—हातानें हात आंवळून, दांतांनीं दांत चावून, अंगानें अंग पिळून प्रथम आपलें मन जिंकिलें पाहिजे.

या मनोनिग्रहास " शम " असें ह्मणतात. पण मनाबरोबर मनाचीं साह्यकारीं जीं इंद्रियें त्यांचाही निग्रह केला पाहिजे. आतां हें खरें आहे कीं मन हें इंद्रियांवर आपली सत्ता चालवितें व त्याला इंद्रियांचा राजा असें ह्मटलें तरी चालेल.

पंचदशींत पंचभूतविवेकांत ह्मटलें आहेः—

मनो दशेंद्रियाध्यक्षं हृत्पद्मगोलके स्थितं ।

तच्चांतःकरणं बाह्येष्वस्वातंत्र्याद्विनेन्द्रियैः ॥
अक्षेष्वर्थार्पितेष्वेतद्गुणदोषविचारकं ।

भावार्थः—मन हें दशेंद्रियांचें अध्यक्ष आहे. तें हृदयकमलाच्या गोलकांत रहातें. बाह्यवस्तूंसंबंधानें हें इंद्रियांवर अवलंबून असल्यामुळें त्याला आंतील इंद्रिय ( अंतःकरण ) ह्मणतात. इंद्रियें पदार्थांच्या निरीक्षणाकडे लागलीं असतां, हें चांगलें, हें वाईट, असा विचार करणारें मनच होय.

सारांश इंद्रियांनीं पदार्थांविषयीं माहिती आणावयाची पण त्यावरून हा पदार्थ चांगला, हा आवडतो, हा दुसरा पदार्थ वाईट, हा नको, हा विचार करण्याचा अधिकार मनाकडेच असल्यामुळें मन इंद्रियांचा राजा ठरतें. पण राजास देखील आपल्या स्वार्थासाठीं फंदांत घालावयास जसे भोंवतालचे लोक असतात, त्याचप्रमाणें मनास विषयांवर लुब्ध करणारीं हीं इंद्रियें आहेत. हीं स्वभावतःच बहिर्मुख असल्यामुळें यांची धांव विषयांकडे असावयाचीच. ह्मणून मनाबरोबर इंद्रियांचाही निग्रह केला पाहिजे. या इंद्रियनिग्रहास "दम" असें ह्मणतात. इंद्रिय व मन यांचा परस्परांशीं निकट संबंध असल्यामुळें, व तीं एकमेकांस प्रेरणा करित असल्यामुळें "शम" व "दम" या दोनीही साधनांचा विचार बरोबर करणें सोयीवार होईल.

( १ शम, २ दम ):—वैद्यशास्त्रांत रोग उत्पन्न झाल्यावर तो बरा करण्याचीं साधनें पहात बसण्यापेक्षां, तो उत्पन्नच होऊं देऊं नये यासंबंधानें खबरदारी ठेवणें जास्त हितकर असें मानलें आहे. ह्मणून उत्पन्न झालेल्या मनोविकारास दाबून टाकण्याचा यत्न करित बसण्यापेक्षां ते उत्पन्नच होऊं देऊं नयेत हें जास्त श्रेयस्कर होईल.

आतां हें तर उघड आहे कीं, एखाद्या वस्तूपासून मनोविकार

उत्पन्न व्हावयास ती वस्तू इंद्रियगोचर जाहली पाहिजे. विषय कितीही मोहक असला, तरी जोंपर्यंत तो इंद्रियगोचर झाला नाहीं, तोंपर्यंत त्याच्या मोहकतेनें मनोविकार उत्पन्न होणें शक्य नाहीं. ह्मणून विषयांपासून इंद्रियें जर परावृत्त केलीं, आणि इंद्रियजन्य ज्ञानच उत्पन्न होऊं दिलें नाहीं, तर विषयांच्या लोभानें मनुष्य बद्ध होण्याचा संभव फारच कमी होईल. यासाठीं सर्व ज्ञानेंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवून मुमुक्षूनें त्यांस मोहक विषयांकडे जाऊं देऊं नये.

बरें यदाकदाचित् कोणत्याही आकस्मिक कारणानें मनोविकार झालाच, तर विषयप्राप्तीसाठीं प्रवृत्त होणारीं जीं कर्मेंद्रियें, तीं जर आपले ताब्यांत असलीं, तर आपले हातून वाईट आचरण होणार नाहीं, व पुढील अनर्थापासून आपला बचाव होईल. ह्मणून कर्मेंद्रियांचाही निग्रह केला पाहिजे. सारांश, कर्मेन्द्रियें व ज्ञानेन्द्रियें या दोहींसही मुमुक्षूनें आपले ताब्यांत ठेवून, त्यांची प्रवृत्ति विषयांकडे होऊं देऊं नये. या इंद्रियनिग्रहास "दम" असें ह्मटलें आहे.

आचार्य ह्मणतात:—

**विषयेभ्यः परावृत्य स्थापनं स्वस्वगोलके ।**
**उभयेषामीन्द्रियाणां स दमः परिकीर्तितः ॥**

भावार्थ:—विषयांपासून मागें फिरवून ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें या दोनीही प्रकारच्या इंद्रियांस आपापले गोलकांचे ठिकाणीं आंवरून धरणें यास दम असें ह्मणतात.

इंद्रियांस विषयांकडे न जाऊं देणें हेंच उत्तम असें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. कारण उत्तम रुचीचें फल किंवा अन्न खाल्लेंच नाहीं तर त्यावर आसक्ति कशी बसेल? एखाद्या सुंदर स्त्रीकडे जर पाहिलेंच नाहीं तर मोह उत्पन्न होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें मनोहर ध्वनी

जर ऐकलेच नाहींत, सुवासिक पदार्थ जर नाकाजवळ नेलेच नाहींत, तर त्यांजवर साधक लुब्ध होण्यास संधीच मिळणार नाहीं. ह्मणून दमाचा अभ्यास निरंतर साधकानें केला पाहिजे, ज्या वस्तूंच्या मोहानें पतन पावण्याची धास्ती आहे, त्या वस्तूंपासून दूर रहाणें यांतच शहाणपण आहे.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतात:—

**यदा संहरते चाऽयं कूर्मोंगानीव सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥**

भावार्थः—कांसव जसा सर्व बाजूंनीं आपलीं अंगें आंत ओढून घेतो, तसा साधक जेव्हां आपलीं इंद्रियें विषयापासून आंवरून धरतो, तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली असें समजावें.

परंतु ज्या मनुष्यास या संसारांत रहाणें भाग आहे, व विशेषें-करून ज्याच्या मागें कुटुंबाचें ओझें लागलें आहे, त्याला नेहेमीं इंद्रियांचे व्यापार बंद ठेवून कसें रहातां येईल ? तो नेहेमीं जर नाक, कान, डोळे वगैरे बंद करून बसला तर त्याचा संसार कसा चालावा ? विशेष प्रसंगीं क्वचित् क्वचित् इंद्रियांना परावृत्त करणें शक्य आहे, व तें रास्तही होईल. परंतु नेहेमीं जशीं काय इंद्रियें नाहींतच अशा स्थितींत कसें रहावें ?

जगांत फिरणाऱ्या मनुष्याला कधींना कधीं तरी सुंदर वस्तु दिसणार, त्याच्या कानांत अवचित सुस्वर गायन पडणार, त्याला पुष्पादिकांचा सुवास घ्यावा लागणार, मग त्याची काय वाट ? त्यानें आपला कसा बचाव करावा ? याचें उत्तर असें आहे कीं जोंपर्यंत मन कोणत्याही इंद्रियांना वश झालें नाहीं, तोंपर्यंत तें इंद्रिय साधकास धक्का देऊं शकत नाहीं.




श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥**

भावार्थः—भ्रमण करणाऱ्या इंद्रियांपैकीं ज्या इंद्रियाशीं मनाचा संयोग होतो, तें इंद्रिय, वारा पाण्यामध्यें जसा नावेला ओढून नेतो, तद्वत साधकाच्या बुद्धीचें हरण करतें.

ह्मणून डोळे झांकावयास नको. नाक कान बंद करण्याची जरूर नाहीं. इंद्रियें आपापले व्यापार करीत असलीं, व विषयांचें प्रत्यक्ष ज्ञान होत असलें तरी चिंता नाहीं. फक्त साधकानें आपलें लक्ष कोणत्याही मोहक वस्तूकडे जाऊं दिलें नाहीं ह्मणजे बस्. कारण विषयांकडे लक्ष लागल्याशिवाय त्यांचें सामर्थ्य साधकावर चालणार नाहीं. ह्मणून इंद्रियांचा आणि मनाचा संयोग होऊं न देणें ही इंद्रिय व मनोनिग्रहाची उत्तम युक्ति आहे, व व्यवहारांतही हिचा उपयोग होणें शक्य आहे. पण इतक्यानेंच मुमुक्षूचें काम नेहमीं भागत नाहीं. कारण ज्या वस्तु अझून अपरिचित आहेत, ज्यांची रुची अझून घेतली नाहीं, अशा वस्तूंच्या मोहकतेपासून या उपायानें साधकाचा बचाव होईल. पण ज्या वस्तूंवर मन अगोदरच लुब्ध झालेलें आहे, त्यांच्या संबंधानें विकार होण्यास फक्त इंद्रियनिग्रहानें आळा पडणार नाहीं. Out of sight out of mind (दृष्टीआड तें मनाबाहेर) ही इंग्रजी ह्मण कांहीं अंशीं खरी आहे. तरी ज्या वस्तूंवर अतिशय प्रेम किंवा आसक्ति आहे त्यांना ही लागू नाहीं.

मेघदूतांत कालिदास ह्मणतातः—

**स्नेहानाहुः किमपि विरहे ध्वंसिनस्ते त्वभोगात् ।**
**इष्टे वस्तुन्युपचितरसा प्रेमराशीर्भवंति ॥**

भावार्थः—स्नेह वियोगानें नाहींसा होतो असें उगीच ह्मणतात. कारण उपभोग न मिळाल्यामुळें इष्ट वस्तूवर उलटी आसक्ति वाढते, व तिची गोडीही जास्त वाटते.

मनाची स्मरणशक्ति विलक्षण आहे. ह्मणून विषय जरी प्रत्यक्ष भासत नसले, तरी जोंपर्यंत त्यांची आवड सुटली नाहीं, तोंपर्यंत त्यांचें वारंवार स्मरण होऊन मनोविकार उत्पन्न होणारच. व त्या विषयांवरील वासना वृद्धिंगत होत जाणार. ह्मणून मनाचा निग्रह करून वासनांचा त्याग केला पाहिजे. हा शमाचा भाग आहे.

आचार्य ह्मणतातः—

**सदैव वासनात्यागः शमोऽयमिति शब्दितः ।**

भावार्थः—नेहेमीं वासनांचा त्याग करणें यास शम अशी संज्ञा आहे.

पण मनाकडून विषय वासनांचा त्याग करविणें, हें मनाचा पूर्णपणें जय केल्याशिवाय साधणार नाहीं. विषयांवर मन इतकें लुब्ध असतें कीं विषयोपभोगाशिवाय, निदान विषयचिंतनाशिवाय तरी त्याला स्वस्थ रहातां येत नाहीं. ह्मणून मनोनिग्रहाची परमार्थांत अत्यंत उपयुक्तता मानिली आहे. मनास विषयांकडून परावृत्त केल्याशिवाय मुक्ति मिळणें शक्य नाहीं.

कारणः—

**मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ।**
**बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतं ॥**

भावार्थः—मनुष्याला बद्ध होण्यास किंवा मुक्ति मिळण्यास मनच कारण होतें. तें विषयासक्त असलें ह्मणजे मनुष्य बद्ध होतो. पण तेंच विषयांपासून परावृत्त झालें कीं मुक्ति मिळते.

ह्मणून अर्थातच मनाला विषयांपासून मागें फिरविण्याचा यत्न मुमुक्षूंनीं अवश्य केला पाहिजे.

**यतो निर्विषयस्यास्य मनसो मुक्तिरिष्यते ।**
**अतो निर्विषयं नित्यं मनः कार्यं मुमुक्षुणा ॥**

भावार्थः—ज्या अर्थीं निर्विषय झालेल्या मनास मुक्ति मिळालीच पाहिजे, त्याअर्थीं मुमुक्षूंनीं मन निर्विषय करण्याबद्दल नित्य यत्न करावा.

पण मनाला निर्विषय कसें करतां येईल ? विषय तर मनाला अत्यंत आवडतात. विषयांचा लोभ अनिवार आहे. मग त्यांतून मनाला सोडवावें कसें ? यासंबंधानें दोन उत्तम उपायांची योजना साधकांस करतां येते.

पहिला उपाय असा कीं जे विषय अत्यंत प्रिय व मोहक असे वाटतात त्यांचें खरें स्वरूप समजून घेण्याचा यत्न करावा. त्यांजबद्दल नीट विचार केला, तर ते वास्तवीक रीतीनें दोषानें भरलेले आहेत, असें ध्यानांत येईल. ते अनित्य आहेत, ते दुःखमय आहेत, त्यांजपासून खरें सुख न मिळतां उलट त्यांच्या सेवनानें अनर्थपरंपरा भोगाव्या लागतात, अशी मुमुक्षूची खात्री होईल. असें झालें ह्मणजे अर्थातच त्याचें मन विषयांस कंटाळून त्यांजपासून परावृत्त होईल.

दुसरा उपाय हा कीं, मनाला सद्वस्तूकडे वळविण्याचा अभ्यास ठेवावा. परवस्तू नित्य आहे, ती आनंदमय आहे, तिचा साक्षात्कार झाला तर प्राणी या संसारचक्रांतून सुटून मोक्षाच्या शाश्वतसुखाचा अधिकारी होतो, ह्मणून सद्वस्तूकडे सर्व लक्ष लावावें. असा अभ्यास करीत गेलें ह्मणजे मनाची प्रवृत्तिही तिकडे हळू हळू होत जाईल.

हीं दोनीही शमाचींच अंगें आहेत. व या दोनीही अंगांचा अभ्यास साधकानें अवश्य केला पाहिजे.

आचार्य ह्मणतातः—

**विरज्य विषयव्राताद्दोषदृष्ट्या मुहुर्मुहुः ।**
**स्वलक्ष्ये नियतावस्था मनसः शम उच्यते ॥**

भावार्थः—विषयसमुदायाकडे दोषदृष्टीनें वारंवार पाहून त्यांजवर विरक्त होऊन, लक्ष्य जें परब्रह्म त्याचे ठिकाणीं मनाचें नित्य अनुसंधान रहाणें, याला शम असें ह्मणतात.

या दोनीही उपायांनीं मनाला विषयांकडून परावृत्त करण्याचा प्रयत्न मुमुक्षूनें चालू ठेवला पाहिजे. हा त्याचा यत्न एकदम सिद्धीस जाईल असें नाहीं. त्याला अनेक वेळां हार खाण्याचा प्रसंगही येईल. पण त्यानें आपलें धैर्य खचूं न देतां सावधगिरीनें व उत्साहानें आपला यत्न चालू ठेवला पाहिजे.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**यततोह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥**

भावार्थः—हे कुंतीपुत्रा, मनुष्य विद्वान जरी असला, व तो (मनाला आवरण्याचा) यत्न जरी करीत असला, तरी बलवान इंद्रियें त्याचें मन ओढून नेतात.

इंद्रियें अशीं दांडगीं झालीं तर मनुष्यानें काय करावें ? त्याचा उपाय या दुष्ट इंद्रियांपुढें काय चालणार ? त्याला हारी जाऊन उगीच चुरमुरे खात बसलें पाहिजे. पण साधकानें असें करूं नये. अनेकवार पराजय झाला तरी त्यानें आपलें धैर्य खचूं देवूं नये. त्यानें आपला उत्साह कायम ठेवून इंद्रियनिग्रहाचा आपला यत्न चालू ठेवावा; व ईश्वरकृपेनें अखेर इंद्रियांस जिंकावें.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥**

भावार्थः—त्या सर्वांना आवरून धरून योगी पुरुषानें मन्निष्ठ असावें. ज्याच्या स्वाधीन इंद्रियें झालीं, त्याची बुद्धि स्थिर झाली असें समजावें.

त्याचप्रमाणें त्या इंद्रियांना कधीं कधीं आपण होऊनच प्रवृत्त करणाऱ्या मनाचाही हळू हळू निग्रह करून त्याजकडून सर्व वासनांचा त्याग करवावा. या कामीं मुमुक्षूनें माघार घेऊं नये, व दीर्घ प्रयत्नानें आपला कार्यभाग साधावा. असें झालें ह्मणजे त्याला या संसाराचें दुःख बाधेनासें होईल व त्याची परमार्थांत अबाधित प्रगती होईल.

वसिष्ठ ह्मणतातः—

**वासनासंपरित्यागे यदि यत्नं करोष्यलं ।**
**तास्ते शिथिलतां यांति सर्वाधिव्याधयः क्षणात् ॥**

भावार्थः—वासनांच्या त्यागाकरतां जर तूं पुरेसा यत्न करशील तर तुझ्या सर्व आधिव्याधी एका क्षणांत कमी होतील.

असो. याप्रमाणें एकसारखा नेटानें यत्न केला तर अखेर इंद्रियें व मन यांचा निग्रह करण्याची शक्ति मुमुक्षूचे अंगीं येईल. पण मनाचे दोन भाग आहेत. एक विकारमय व दुसरा विचारशक्तीचा. पहिल्या भागांत कामक्रोधलोभादिक मनोविकार असतात. या विकारमय भागाच्या निग्रहाबद्दल येथपर्यंत विवेचन झालें. आतां मनाचा जो दुसरा विचारात्मक भाग आहे, त्यासंबंधीं विचार केला पाहिजे.

ही विचारशक्ति विलक्षण आहे. हिला इंद्रियादि अन्य साधनांची अपेक्षा मुळींच नसते. विषय पुढें नसतां त्यांजविषयीं हिला चिंतन करतां येतें, ते हुबेहुब पुढें आहेत असें भासवितां येतें, व त्यांजपासून एका तऱ्हेच्या सुखाचा अनुभवही प्राण्यांस देतां येतो. या शक्तीचा अनुभव

आनंदमय मनोराज्यांत येतो. या शक्तीचाही निग्रह साधकानें केला पाहिजे. व विषयचिंतनरूप मनोराज्यास आळा देऊन ईश्वरचिंतन अथवा ब्रह्मचिंतनाकडे वृत्तीस वळविलें पाहिजे. या साधनास उपरति असें ह्मणतात.

( ३ उपरति ):—मनोवृत्तींला बाह्यविषयांकडे जाऊं देऊं नये व तिला सर्वथैव दाबांत ठेवून ब्रह्मचिंतनाकडे वळवावें, इकडे आतां मुमुक्षूचें लक्ष लागलें पाहिजे. उपरतीची व्याख्या आचार्य देतातः—

**बाह्यानालंबनं वृत्तेरेषोपरतिरुत्तमा ।**

भावार्थः—मनाच्या वृत्तीला बाहेर ( विषयांकडे ) जाऊं न देणें हींच उत्तम उपरति होय.

पण मुमुक्षूनें कल्पनाशक्तीला कां दाबून टाकावें ? असल्या मनोराज्यापासून काय अनर्थ होतो ? कामक्रोधादि विकार उघड रीतीनें अनर्थकारक आहेत. त्यांचा निग्रह करणें रास्त आहे, पण बिचाऱ्या निरुपद्रवी मनोराज्यापासून काय हानी होण्याचा संभव आहे ? मानसिक कल्पनासृष्टीपासून चमत्कार व आनंद उत्पन्न होतात. मनोराज्यांत वास्तविक कोणताही पदार्थ उपलब्ध नसतां एक प्रकारचें सुख अनुभवितां येतें, ह्मणून या कल्पनाशक्तीचा निग्रह न करतां तिचें अभिनंदनच करावें. ही शंका द्वैतविवेकांत घेऊन विद्यारण्यस्वामी तिचें समाधान करतातः—

**त्यज्यतामेषकामादिर्मनोराज्ये तु का क्षतिः ।**
**अशेषदोषबीजत्वात्क्षतिर्भगवतेरिता ॥**

भावार्थः—कामादि विकार पाहिजे तर टाकावेत, पण मनोराज्यानें काय हानी होईल ? सर्व दोषांचें बीज हें मनोराज्य असल्यामुळें तें नाशकर आहे असें भगवंतांनीं ठरविलें आहे.

हें कसें बरें होईल ? प्राणी मनोराज्य करीत असतां तो वास्तवीक कांहींच करीत नाहीं. त्याचे विचार उगीच आंतल्या आंत चालू असतात. तो कल्पनेची सृष्टी निर्माण करून आपल्या मनाचें समाधान करीत असतो. पण खरोखर तेथें कोणताही विषय उपलब्ध नसतो, व तो कोणतीही क्रिया करीत नाहीं. मग तो दोषास पात्र कसा होईल ? याचें उत्तर असें आहे कीं, कल्पनाशक्तीनेंच कां होईना, विषयांचा ध्यास करणें धोक्याचें आहे. या ध्यासानें विषयांवरील आसक्ति कायम राहते, व मुमुक्षूचें मन व इंद्रियें हीं विषयांची गोडी विसरत नाहींत. यामुळें तीं कधीं ना कधीं तरी मुमुक्षूच्या ताब्यांतून निसटून जाऊन त्याला अनर्थांत घालावयास चुकणार नाहींत.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥**

भावार्थः—विषयांचें चिंतन केलें ह्मणजे त्यांजवर आसक्ति उत्पन्न होते. आसक्तीमुळें ते प्राप्त व्हावेत अशी इच्छा होते. इच्छेस प्रतिबंध झाला तर क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून संमोह होतो. संमोहापासून स्मरणशक्ति भ्रष्ट होते. व त्यामुळें बुद्धीचा नाश होऊन तो पुरुष अधोगतीस जातो.

ह्मणून मुमुक्षूनें विषयांचें चिंतनसुद्धां करूं नये. विषयांकडून सर्वथैव मन माघारें घेऊन तें ईश्वरचिंतनांत घालावें. पण कल्पनाशक्ति विलक्षण सामर्थ्याची असल्यामुळें तिला कसें आवरून धरतां येईल हें पाहिलें पाहिजे. या कामीं अभ्यासाची आवश्यकता आहे.

प्रथमतः या कल्पनाशक्तीचा अगदीं निरोध करून मनाला आवरून धरण्याचा यत्न करावा. त्याला विषयांकडे जाऊंच देऊं नये. त्याला विषयांचें चिंतनही करूं देऊं नये. पण मन अतिशय चंचळ असल्यामुळें हा निरोध जास्त वेळ टिकणार नाहीं. तरी रोज थोड-थोडा अभ्यास करीत गेलें तर साधकाची मनाचा निरोध करण्याची शक्ति वाढत जाईल व वृत्तींला बराच वेळ आवरून धरण्याचें सामर्थ्य त्याचे अंगीं येईल. हा एक प्रकारचा अभ्यास झाला.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत्**

भावार्थः—हळू हळू धैर्यानें स्वाधीन केलेल्या बुद्धीला अंतर्मुख करावें. मन आत्म्याचे ठाईं स्थिर करून कोणत्याही विषयाचें चिंतन करूं नये.

पण एकसारखा निरोध ज्यास्त वेळ टिकत नाहीं. ह्मणून, जर मन निरोधापासून सुटून जाऊं लागलें तर त्याला जेथें जावयाचें तेथें प्रथम जाऊं द्यावें, आणि नंतर लगेच त्याला तिकडून परतावून आणून अंतर्वृत्ति करावें. मन चंचळ असल्यामुळें विषयांकडे धांव घेणारच. पण विषयीपुरुष जसे त्याला विषयांत मग्न व्हावयास देतात, तसे साधकानें त्यास विषयांस चिकटून राहूं देऊं नये. जरा विषयांकडे तें राहिलें न राहिलें तोंच त्याजवर पुनः आपला दाब बसवून त्याला माघारी आणून आत्मचिंतनांत त्याचा लय करावा. अथवा त्याचें अनुसंधान ईश्वराकडे वळवावें.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरं।**
**ततस्ततो नियम्येतदात्मन्येव वशं नयेत्॥**

भावार्थः—चंचळ व अस्थिर मन जिकडे जिकडे जाईल तिकडून त्यास ओढून आणून त्याला आत्म्याचे ठायीं स्थिर करावें.

मनोनिग्रहाच्या अभ्यासाचा तिसरा प्रकार असा कीं, ज्या ज्या विषयांच्या चिंतनाकडे मनाची प्रवृत्ति होते, त्या त्या विषयांसंबंधानें विवेक करून ते विषय नाशिवंत आहेत, असार आहेत, व अनेक दोषांनीं भरलेले, व ह्मणूनच त्याज्य आहेत अशी आपले मनाची खात्री करीत जावें, ह्मणजे मन आपोआप त्यांजपासून परावृत्त होत जाईल.

श्रीमुकुंदराज परमामृतांत ह्मणतातः—

**पाहिजे एकांतस्थान । जेथें चंचळ न होय मन । सकळ वृत्तींतें आवरोन । बैसावें तेथें ॥ करूनि विषयाची निवृत्ति । चित्तासि प्रत्यगावृत्ति । धरी दृश्यमात्रीं विरक्ति । त्याग बुद्धी ॥ बैसोनि आसनीं सावकाशें । अंतरामाजी प्रवेशें । एकवटी इंद्रियद्वारीं बैसे । मनोवृत्ती जे ॥ सांडोनि अभिमान स्थूळाचा । भाव धरीं अंतराचा । अभाव करूनि सर्वांचा । गगन पाहीं ॥ स्थूल इंद्रियांमधून । युक्तीनें एकवटीं मन । अंतराकाशीं नेऊन । स्थिर करीं ॥ जे जे वृत्ती बाहेर धांवे । तियेतें परतोनी आणावें । येणें अभ्यासें स्थिरावें । आपेंआप ॥ ना तरी जिकडे मनाची राहाटी । लागावें ना तयाचे पाठीं । माघारी घालोनियां दृष्टी । स्वस्वरूपीं ठेविजे ॥ मन जो जो विषय धरी । तो तो विवेकें विदारी । तरी तें स्थिरावे अंतरीं । सांडोनि कल्पना ॥**

याप्रमाणें तीनीही प्रकारचा अभ्यास करीत गेलें, तर मन ताब्यांत येत जाईल, आणि त्याचा निरोध साधकाला करतां येईल. पण हें

सांगण्यास जितकें सोपें दिसतें तितकें करण्यास सोपें नाहीं. मनोवृत्तीचा जय करणें हें भगीरथ प्रयत्नाशिवाय साध्य होणार नाहीं. कधींही न ढळणारा निश्चय, व अविश्रांत श्रम करण्याची तयारी, या दोहींचीही या कामीं आवश्यकता आहे. पण या कामीं मुमुक्षूचें कधीं कधीं धैर्य खचून तो उत्साहरहित झाला तर नवल नाहीं. कारण अर्जुनासारखा पराक्रमी पुरुषही काय ह्मणतो तें पहा.

**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथी बलवद्दृढं ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करं ॥**

भावार्थः—हे कृष्णा, मन फार चंचल, जुलमी, बलवान् व हट्टी आहे. त्याचा निग्रह करणें ह्मणजे वायूस कोंडण्याप्रमाणेंच कठीण असें मला वाटतें.

आतां मनाचा निग्रह करणें कांहीं सोपें नाहीं. हें सर्वांस कबूल करावें लागेल. पण तें अशक्य आहे असें मात्र समजूं नये. कारण मनोजयास दोन मोठीं साधनें आहेत. एक अभ्यास व दुसरें वैराग्य. या दोन साधनांनीं चपल मनाला साफ बांधून टाकितां येतें, व हस्तगत करून घेतां येतें.

श्रीकृष्ण अर्जुनास उत्तर देतातः—

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलं ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥**

भावार्थः—हे महाबाहो ! मन खरोखरच चंचल व निग्रह करण्यास कठीण असें आहे. पण अभ्यासानें आणि वैराग्यानें तें हस्तगत करून घेतां येतें.

अभ्यास हा सर्व प्रयत्नांच्या मुळाशीं आहेच. याची उपयुक्तता सांगावी तितकी थोडीच. व्यवहारांत देखील अभ्यासाच्या महतीबद्दल

मतभेद नाहीं. विद्वत्ता आणि सर्व जातीचीं कलाकौशल्यें अभ्यासाच्या जोरावरच साधतां येतात. पण हा अभ्यास सतत चालू ठेविला पाहिजे. यासंबंधानें जर हयगय केली तर साध्य झालेलें हातचें जातें.

**अनभ्यासेन मर्त्यस्य प्राप्तो योगोऽपि नश्यति ।**

भावार्थः—अभ्यास चालू न ठेवल्यानें मनुष्यास प्राप्त झालेला योगही नष्ट होतो.

श्रीकृष्णांनीं सांगितलेलें मनोजयाचें दुसरें साधन वैराग्य हें आहे; याजबद्दल बरेंच विवेचन झालेलें आहे. प्रस्तुत प्रसंगीं मुमुक्षूंनीं या साधनांची एकमेकांशीं कशी सांगड आहे, हें लक्षांत आणावें. शम, दम, उपरति यांनीं वैराग्यप्राप्तीस मदत होते. उलट पक्षीं वैराग्यानेंही शमादि साधनांस मदत मिळून तीं फलप्रद होतात. सारांश जसजसा सर्व साधनांचा अभ्यास चालू राहील, तसतशी साधकाची सर्व बाजूंनीं परमार्थांत प्रगति होत जाईल.

( ४ तितिक्षा):—वर सांगितल्याप्रमाणें, विषयांकडे मन जाऊं देऊं नये, त्यांच्या उपभोगाविषयीं आसक्ति सोडावी, इंद्रियें ताब्यांत ठेवावीं, मनोनिग्रह करावा, हें सर्व कबूल करून त्याप्रमाणें आपलें आचरण ठेवण्याकडे जरी मुमुक्षूची प्रवृत्ति झाली, तरी त्याला हा कष्टप्रद अभ्यास चालू ठेवण्यास स्वस्थता कोठें असते ? बसल्याठिकाणीं त्याला अनेक दुःखें, अनेक व्याधि, अनेक संकटें येऊन जेर करतात. असें झाल्यावर त्या गरीब प्राण्यानें काय करावें ?

बरें, हीं दुःखें तरी एक तऱ्हेचीं आहेत काय ? त्यांची गणना कोणी करावी ? परंतु या सर्व दुःखांचा समावेश आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक या तापत्रयांत होतो. यांपैकीं आध्यात्मिक दुःखें कोणतीं तें पाहूं—

देहेंद्रियमनःप्राणैः सुखं दुःखं यदाप्यते ।
इममाध्यात्मिकं तापं विजानीयाद्धि देहिनां ॥

भावार्थः—देह, इंद्रियें, मन व प्राण यांजपासून जें सुखदुःख होतें, तो अध्यात्मिक ताप जाणावा.

सुखाचीही गणना तापांतच होते, इकडे मुमुक्षूंनीं अवश्य लक्ष द्यावें. सुखानेंही मनुष्याची बुद्धि चंचल होऊन भ्रष्ट होण्याचा संभव असतो. हा आध्यात्मिक ताप दोन प्रकारचा असतो. एक शारीरिक व दुसरा मानसिक.

विष्णुपुराणांत व्यास ह्मणतातः—

आध्यात्मिको वै द्विविधः शारीरो मानसस्तथा ।

भावार्थः—आध्यात्मिक ताप दोन तऱ्हेचा आहे. शारीरिक आणि मानसिक.

अनेक रोगांपासून शरीरास पीडा होते. रसविकारानें हात पाय वगैरे नासून जातात, इंद्रियांनां विकार होतात, प्राणांच्या क्रिया सुरळीत चालत नाहींत, या सर्वांमुळें प्राण्यास शारीरिक दुःख सोसावें लागतें. तसेंच मनास अनेक व्यवहारांसंबंधानें काळजी काढावी लागते, स्त्रीपुत्रादिकांच्या वियोगाचें दुःख सोसावें लागतें, त्याचप्रमाणें द्रव्यादिकांच्या अभावानें किंवा इच्छित फल न मिळाल्यानें, किंवा दुसऱ्या अनेक कारणांनीं मनास खिन्नता येते. हे सर्व मानसिक ताप होत.

आतां दुसरा ताप जो आधिभौतिक तो असाः—

सर्वभूतैर्देहयोगात्सुखं दुःखं यदाप्यते ।
द्वितीयं तं विजानीयात्संतापं चाधिभौतिकं ॥

भावार्थः—सर्व भूतांचा देहाशीं संयोग झाला ह्मणजे त्यामुळें जें सुखदुःख होतें, तो दुसरा ह्मणजे आधिभौतिक ताप जाणावा.

हाही दोन प्रकारचा आहे. एक आकाशादि महाभूतांपासून व जड पदार्थांच्या संयोगानें, दुसरा जिवंत प्राण्यांच्या उपद्रवानें उत्पन्न होतो.

विष्णुपुराणांत ह्मटलें आहे:—

**मृगपक्षिमनुष्याद्यैः पिशाचोरगराक्षसैः ।**
**सरीसृपाद्यैश्च नृणां जन्यते चाधिभौतिकः ।**
**शीतोष्णवातवर्षांबुवैद्युतादिसमुद्भवः ॥**

भावार्थः—मृग, पक्षि, मनुष्यें, पिशाच, सर्प, राक्षस, नाग आदिकरून प्राण्यांपासून आधिभौतिक त्रास मानवांस सोसावा लागतो. तसाच, शीत, उष्ण, वायू, वृष्टी, जल, बीज, यांपासूनही तो होतो.

सुसरीनें ओढून नेलें, वाघ खावयास आला, हत्तीनें पायांखालीं तुडविलें, सर्प वगैरे चावले ह्मणजे आधिभौतिक ताप होतो. त्याचप्रमाणें वीज अंगावर पडली, अग्नीनें अंग पोळलें, पावसानें भिजलें, दगडावर आपटलें, ह्मणजे आधिभौतिक ताप होतो.

तिसरा ताप ह्मणजे आधिदैविक ताप. तो असा असतो:—

**शुभाशुभैः कर्मभिस्तैर्देहांते यमयातना ।**
**स्वर्नरकादिभोक्तव्यमिदं विद्धयाधिदैविकं ॥**

भावार्थः—देह पडल्यावर शुभाशुभ कर्मांसाठीं ज्या यमयातना, व स्वर्गनरकादिक उपाधी भोगाव्या लागतात, ते आधिदैविक ताप होत असें समजावें.

आधिदैविक दुःखाचेही अनेक भेद आहेत.

विष्णुपुराणांत ह्मटलें आहे:—

**गर्भजन्मजराव्याधिमृत्युजं नारकं तथा ।**
**दुःखं सहस्रशो भेदैर्भिद्यते मुनिसत्तम ॥**

भावार्थः—हे मुनिश्रेष्ठा! गर्भवास, जन्म, जरा, रोग, मृत्यु व नरक यांपासून होणारें दुःख हजारों प्रकारचें आहे.

सत्पुरुषांनीं सुखाचीही गणना दुःखांतच केली आहे हें वर सुचविलें आहे. त्यांचा हेतू इतकाच दिसतो कीं, इहपरलोकींचें सुख खरें नसून ज्ञात्याच्या दृष्टीनें तें दुःखमयच आहे, हें मुमुक्षूच्या लक्षांत यावें.

असो. हा तीन प्रकारचा त्रास जर प्राण्यास सोसावा लागला, तर त्यानें आपलें मन शांत कसें ठेवावें, व परमार्थसाधन करीत कसें असावें? एकदम बिचाऱ्या साधकावर दुःखाची परंपरा कोसळून पडली, तर त्याचें धैर्य व उत्साह कायम ठेवण्यास उपाय कोणता, असें विचारलें तर त्यानें चौथें साधन जी तितिक्षा तिचा अभ्यास केला पाहिजे हेंच उत्तर आहे. तितिक्षा ह्मणजे काय?

आचार्य सांगतातः—

**सहनं सर्वदुःखानामप्रतीकारपूर्वकं ।**
**चिंताविलापरहितं सा तितिक्षा निगद्यते ॥**

भावार्थः—प्रतीकार न करतां, व चिंता खेदादिक विकार न होऊं देतां, जें सर्व दुःखांचें निमुटपणें सहन करणें, त्याला तितिक्षा ह्मणतात.

प्रतीकार दोन प्रकारचा समजावा. एक कोणीही आपणास त्रास दिला असतां त्याला उलट दुःख देऊन सूड उगवावा हा. साधकानें सर्वदा क्षमायुक्त असलें पाहिजे. दुष्ट मनुष्यांनीं त्याला कितीही त्रास दिला तरी त्यानें उसणें घेण्याची इच्छा करूं नये. उलट सर्व प्राणीमात्राचें कल्याण इच्छीत जावें. दुसऱ्या प्रकारचा प्रतीकार ह्मणजे दुःखें टाळण्याबद्दल खटपट. हाही प्रतीकार साधकास त्याज्य आहे, असा वरील श्लोकांतून अर्थ निघतो.

पण आचार्यांचें इंगित निराळें असलें पाहिजे. आपण स्वतःच्या प्रयत्नानें एखादा अनर्थ टाळूं नये असें त्यांचें ह्मणणें नसावें. कोणी हिंस्र पशू अंगावर चालून आला, किंवा घर अंगावर पडण्याची वेळ आली, अथवा आग पेटत पेटत जवळ येऊन ठेपली, तर पळून जाऊन आपले प्राण वांचवूं नये असें कोणीही सूज्ञ पुरुष सांगणार नाहीं. रोग झाला तर औषध घेतलें पाहिजे, पथ्यही केलें पाहिजे. त्याचप्रमाणें क्षुधा शमनार्थ उचित प्रयत्न केले पाहिजेत. असें न करील तो मूर्ख. आचार्यांचा हेतू ह्राच दिसतो कीं आपणास भोगावीं लागत असलेलीं दुःखें कमी करण्या करतां दुसऱ्यांस उपद्रव देऊं नये मग ते मनुष्य असोत वा देवादिक असोत. आपलीं दुःखें आपण निमुटपणें सोसावीं. त्यांजबद्दल दुसऱ्यास संकट कां घालावें ? ज्याचा त्याला संताप आहेच; त्यांत आपण आपल्या दुःखाची भर कां घालावी ? साधु पुरुष देवादिकांसही आपल्या करतां संकटांत घालीत नाहींत. व साधकाचेंही वर्तन याचप्रमाणें असणें श्रेयस्कर आहे.

श्रीकृष्ण अर्जुनास उपदेश करतातः—

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्वभारत ॥**

भावार्थः—हे अर्जुना, विषयांशीं इंद्रियांचे संयोगापासून शीत, उष्ण, सुख, दुःख, वगैरे विकारांची उत्पत्ति होते. हे सर्व विकार अनित्य आहेत. यांना उत्पत्ति व नाश असतात. ह्मणून ते सर्व तूं निमुटपणें सोस.

हा उपदेश निर्दयपणाचा दिसतो. पण तो खरा व हितकर आहे. पहा आपण कितीही खेद केला तरी दुःख भोगण्याचें चुकत नाहीं.

मग रडून तरी काय उपयोग? शिवाय तितिक्षेपासून साधकास फार लाभ होतो.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥

भावार्थः—हे पुरुषश्रेष्ठा! ज्या धैर्यवान आणि सुखदुःखांला सारखें मानणाऱ्या पुरुषास हे (विषयेंद्रियसंयोग) कष्टी करूं शकत नाहींत, तो अमरत्वाला योग्य होतो.

ह्मणून अशी उत्तम स्थिति प्राप्त करून घेण्यास मुमुक्षूनें योग्य प्रयत्न केला पाहिजे. तितिक्षा परमार्थांतच उपयोगी पडते असें नाहीं. संसारांतही तिचा अत्यंत उपयोग आहे. जो धैर्यानें सर्व दुःखें सोसूं शकतो, व आपला उत्साह व शांती कायम ठेवतो, त्याला संसारांतही उत्तम फळ मिळूं शकतें. असो. तितिक्षेची आवश्यकता सर्वांस आहे याजबद्दल मतभेद नाहीं. पण तितिक्षा पूर्णपणें अंगीं बाणणें कांहीं सोपें नाहीं. ह्मणून साधकानें या कामीं अनेक उपायांची योजना केली पाहिजे. त्यांपैकीं कांहीं येथें सुचविले आहेत.

(अ) विचारः—एखादें दुःख जरी प्राप्त झालें तरी मनुष्यानें जर योग्य विचार करून मनाचें समाधान केलें तर तेंच दुःख हलकें होतें. यास्तव साधकानें नित्य विचार करीत असावें. जगाचा अनुभव पाहिला तर प्राण्यास नेहेमीं दुःखच भोगावें लागत नाहीं. दुःखानंतर सुख, व सुखानंतर दुःख ही मालिका चालत असते.

भारतांत ह्मटलें आहेः—

सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्यानंतरं सुखं ।
सुखदुःखे मनुष्याणां चक्रवत्परिवर्तिनः ॥

भावार्थः—सुखानंतर दुःख, आणि दुःखानंतर सुख, याप्रमाणें सुखदुःखें मनुष्याला फिरणाऱ्या चक्राप्रमाणें पाळिपाळिनें येतात.

आलेलें दुःख टिकणार नाहीं, पुढें सुख होईल ह्मणून धैर्यानें सर्व दुःखें सोसण्याचा अभ्यास ठेवावा.

दुसरा विचार असा आहे कीं खेद करून काय उपयोग? रडल्यामुळें आलेलें दुःख टळतें असा अनुभव नाहीं. उलट खेदामुळें तें वाढत जातें, व जास्त भयंकर दिसून सोसवेनासें होतें. ह्मणून साधकानें सद्धर्मानें व न्यायानें आलेलें दुःख नाहींसें करण्याचा प्रयत्न करावा. त्या प्रयत्नाअंतीं यश आलें तर बरेंच झालें. पण यदाकदाचित् तें दुःख भोगावेंच लागलें तर साधकानें असा विचार करावा कीं दैव बलवान आहे, त्याचा प्रतीकार कोणासही करतां येत नाहीं, ह्मणून तें दुःख मुकाट्यानें सोसलें पाहिजे. खेद करणें शहाण्या मनुष्याचें काम नव्हे. जेथें उपाय नाहीं तेथें सोसणें हेंच वाजवी.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**अपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ।**

भावार्थः—जीं दुःखें टाळतां येत नाहींत त्यांजबद्दल शोक करणें तुला उचित नाहीं.

तिसरा विचार असा आहे कीं, दुःख भोगणें कोणासही चुकलें नाहीं. ज्यांस आपण थोर समजतों, भाग्यवान समजतों, पूज्य समजतों, सुखी समजतों, त्यांसही दुःखानें व दुर्दैवानें सोडलें नाहीं. देवादिकांचीही कधींकधीं कशी दुर्दशा होते ती पहा.

भर्तृहरी ह्मणतातः—

**नेता यस्य बृहस्पतिः प्रहरणं वज्रं सुराः सैनिकाः ।**

**स्वर्गोदुर्गमनुग्रहः खलुहरेरैरावतो वारणः ।**
**इत्याश्चर्यबलान्वितोऽपि बलभिद्भग्नः परैः संगरे ॥**

भावार्थः—ज्याचा गुरू बृहस्पती, आयुध वज्र, देव हे सैनिक, स्वर्गासारखा किल्ला, ज्याच्यावर विष्णूची पूर्ण कृपा, ऐरावत ज्याचा हत्ती, अशा आश्चर्यकारक बलांनीं युक्त जो इंद्र, त्यासही शत्रूंनीं समरांगणांत जिंकिलें.

जिंकिलें इतकेंच नव्हे, तर रावणासारख्यांनीं आपले घरांत नोकराप्रमाणें हलकें काम करावयास लावलें. ही दशा जर प्रत्यक्ष देवांच्या अधिपतीची तर इतरांची काय कथा ?

सर्व देवांत श्रेष्ठ मानलेल्या महादेवाची स्थिति पहाः—

**स्वयं महेशः श्वशुरो नगेशः ।**
**सखा धनेशस्तनयो गणेशः ।**
**तथापि भिक्षाटणमेव शंभोः ।**
**बलीयसी केवलमीश्वरेच्छा ॥**

भावार्थः—स्वतः तर महेश, सासरा पर्वतांचा राजा, मित्र धनाधिपति कुबेर, मुलगा गणपती, इतकें सर्व असूनही शंकरास भिक्षा मागावी लागतेच. तेव्हां ईश्वराची इच्छा बलवत्तर असेंच ह्मणावें लागतें.

देवादिकांची जर ही दशा तर मनुष्यांचीं दुःखें सांगत बसणें काय कामाचें ? ह्मणून साधकानें विचार करून आपलें समाधान करीत जावें. जर सर्व प्राण्यांस कमीजास्त प्रमाणानें दुःख भोगणें भाग पडतें तर कोणींही कुरकुर करूं नये.

**जनीं सर्वसूखी असा कोण आहे ।**
**विचारी मना तूंचि शोधोनि पाहें ॥**

असा बोध मुमुक्षूनें आपल्या मनास नेहेमीं करून त्यास शांत ठेवावें. याप्रमाणें जो विचार करतो तो धैर्यानें सर्व दुःखें सोसतो. परमार्थासाठीं यत्न करणाराचें प्रारब्ध नष्ट होत नाहीं. त्याला पूर्वकर्मा-प्रमाणें सुखदुःखें तर भोगावीं लागतात. मात्र तो विवेकानें दुःख भोगीत असतांही आपलें मन शांत ठेवतो, ह्मणून त्यास क्लेश होत नाहींत. अज्ञ मनुष्य मूर्खपणानें अधीरा होऊन रडत बसतो. ह्राच कायतो ज्ञान्यांत व अज्ञ पुरुषांत फरक.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहे:—

**ज्ञानिनोऽज्ञानिनश्चात्र समे प्रारब्धकर्मणी ।**
**न क्लेशो ज्ञानिनो धैर्यान्मूढः क्लिश्यत्यधैर्यतः ॥**

भावार्थः—ज्ञानी व अज्ञ पुरुष या दोघांचेंही प्रारब्धकर्म सारखें असलें तरी धैर्यामुळें ज्ञान्यास क्लेश होत नाहींत, पण मूर्खास अधिरे-पणामुळें क्लेश होतात.

(ब) सर्वांत विचार तर श्रेष्ठ आहेच, पण त्याला अभ्यासाचा दुजोरा पाहिजे. ह्मणून इतर साधनांप्रमाणें तितिक्षेचाही अभ्यास करीत गेलें पाहिजे, तरच इष्ट हेतू सिद्धीस जाईल. सहन करण्याची शक्ति साधकानें हळू हळू वाढवावी. याला एक उत्तम युक्ति गीतेंत श्रीकृष्णांनीं सुचविली आहे.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियं ।**

भावार्थः—आवडीची वस्तू मिळाली तरी फार आनंद मानूं नये व न रुचणारें घडून आलें तरी कष्टी होऊं नये.

स्वाभाविकरीत्या मनुष्यास प्रियवस्तूची प्राप्ति झाली तर अतिशय आनंद होतो, व दुःख प्राप्त झालें तर खिन्नता येते. पण साधकानें

हर्षही करूं नये व खिन्नही होऊं नये. हे दोनीही विकार अपायकारक आहेत, व ह्मणूनच ते त्याज्य आहेत. साधकाचे मनाची स्थिति शांत व निर्विकार अशी झाली पाहिजे. त्याचें मन थोड्या लाभाकरतां हर्षयुक्त झालें, व थोड्या दुःखाकरतां खिन्न होऊं लागलें, तर त्याला सद्वस्तूचें चिंतन कसें करतां येईल ? यासाठीं साधकानें आपले मनास चंचल होऊं न देण्याचा अभ्यास केला पाहिजे. ह्मणजे त्याचें मन हळू हळू स्थिर होत जाईल. पण त्यानें हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं जर त्यानें सुख भोगतांना आपलें मन आवरून त्याला अत्यानंद करूं न दिला, तरच दुःख भोगतांना त्याचें मन अति खिन्न होणार नाहीं. तो ह्मणेल कीं मी सुखाचे प्रसंगीं यथेच्छ आनंद मानणार. पण मला दुःख भोगतांना मात्र त्रास होऊं नये, तर असें होणें शक्य नाहीं, असेंच त्याला दिसून येईल. दोनीही प्रसंगीं मन आवरलें तरच तें ताब्यांत येईल. असो. याप्रमाणें मन आवरण्याचा अभ्यास मुमुक्षूनें वाढवीत नेला तर अखेर त्याला सर्व स्थितींत आपलें मन शांत व स्थिर ठेवण्याचें सामर्थ्य येईल.

शम, दम, उपरति व तितिक्षा, या चारही साधनांचा उत्तम अभ्यास ज्यानें निश्चयानें व एकनिष्ठतेनें केला त्या दैववान् साधकाचें मन पूर्णपणें त्याच्या ताब्यांत येईल. येवढें महत्वाचें कार्य ज्यानें सिद्धीस नेलें, त्या भाग्यवान पुरुषाची परमार्थांत बरीच उन्नति झाली असें मानण्यास हरकत नाहीं. कारण, चित्ताचा जय हें कांहीं लहानसहान कार्य नव्हे.

योगवासिष्ठांत रामचंद्र ह्मणतातः——

अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि ।
अपि वन्ह्यशनात्साधो विषमश्चित्तनिग्रहः ॥

भावार्थः—हे साधुपुरुषा ! मोठा समुद्र पिवून जाण्यापेक्षां मेरू पर्वतास उपटून टाकण्यापेक्षां, अग्निभक्षणापेक्षांही चित्ताचा निग्रह करणें कठीण आहे.

येथपर्यंत कार्यभाग उरकल्यावर पुढें साधकास मोक्षप्राप्तीस कांहींच अडचण पडणार नाहीं. ज्यांनें चित्ताचा जय पूर्णपणें केला त्याला ज्ञान व मोक्ष हीं ठेवलेलींच आहेत असें समजावें.

गौडपादाचार्य ह्मणतातः—

**मनसो निग्रहायत्तमभयं सर्व योगिनां ।**
**दुःखक्षयः प्रबोधश्चाप्यक्षया शांतिरेवच ॥**

भावार्थः—सर्व योग्यांना भयरहित होणें, दुःखाचा क्षय होणें, ज्ञान व अक्षय शांति प्राप्त होणें, हीं सर्व मनोनिग्रहावर अवलंबून आहेत.

ज्यांनीं वरील चार साधनांच्या सहाय्यानें चित्ताचा जय केला त्यांना मुक्ति मिळणें कठीण तर नाहींच, पण त्यांनीं अजून राहिलेला कार्यभाग उरकण्याकडे लक्ष दिलें पाहिजे. जगाकडून त्यांनीं आपलें मन काढून घेतलें हें खरें, पण त्या मनाचा लय परवस्तूंत झाला पाहिजे येवढें अजून शिल्लक राहिलें आहे.

( ५ ) **श्रद्धाः**—परवस्तू इंद्रियगोचर नाहीं. ती प्रत्यक्ष पहातां येत नाहीं, व दाखवितांही येत नाहीं. ह्मणून ती आहे किंवा नाहीं याजबद्दल संशय मुमुक्षूला खास येणार. या संशयाचें अखेरचें निरसन साक्षात्कार झाल्याशिवाय होणार नाहीं. पण साधकानें नास्तिकपणाचें अवलंबन केलें, तर त्याला इष्ट सिद्धि कधींही प्राप्त होणार नाहीं. त्यानें शास्त्र आणि गुरू यांचे वचनावर विश्वास ठेऊन, सद्वस्तू खास आहे, व योग्य प्रयत्नानें तिचा साक्षात्कार होतो, या दोनीही गोष्टी खऱ्या मानिल्या पाहिजेत. श्रद्धा हें षट्संपत्तींतील पांचवें साधन आहे. तिची व्याख्या आचार्य देतातः—

**शास्त्रस्य गुरुवाक्यस्य सत्यबुद्ध्यावधारणं ।**
**सा श्रद्धा कथिता सद्भिर्यया वस्तूपलभ्यते ॥**

भावार्थः—शास्त्र व गुरु जें सांगतात तें सत्य आहे असें मानणें, याला साधुपुरुष श्रद्धा असें ह्मणतात. या श्रद्धेनें परब्रह्मप्राप्ति होते.

पूर्वपुण्यानें ह्मणा, किंवा दैवयोगानें ह्मणा, अथवा ईश्वरकृपेनें ह्मणा, ही श्रद्धा ज्यांना अनायासानें प्राप्त होते, ते भाग्यवान समजले पाहिजेत. त्यांच्या मार्गांतून एक मोठी अडचण गेली असें समजावें. त्यांना ब्रह्मप्राप्ति सहज होते.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥**

भावार्थः—जो श्रद्धायुक्त असून ब्रह्मनिष्ठ व जितेंद्रिय आहे, त्याला ज्ञान प्राप्त होतें, व त्यानंतर लौकरच त्याला सर्वोत्कृष्ट शांति मिळते.

परंतु ज्या साधकांस दैववशात् असावी तशी श्रद्धा नाहीं त्यांनीं ती संपादन करण्यास हर तऱ्हेनें यत्न केला पाहिजे. श्रद्धा वाढविण्याचे कामीं उपयुक्त अशा कांहीं सूचना येथें केल्या आहेत.

प्रथम मुमुक्षूंनीं असा विचार करावा कीं, वसिष्ठ, व्यास, शंकराचार्य-प्रभृति महान् महान् साधू पुरुषांना सत्य सोडून उगीच कांहीं तरी सांगत बसण्याचें काय प्रयोजन ? या महात्म्यांना कोणाचीही भीड नव्हती, व कोणाचें मन वश करून घेण्याची जरूर नव्हती. त्यांनीं सर्वसंग-परित्याग केल्यामुळें त्यांना कशाचीही अपेक्षा नव्हती. फक्त दुसऱ्याचें कल्याण व्हावें या स्तुत्य हेतूनें व करुणार्द्र अंतःकरणानें ते उत्तम प्रकारचा बोध करीत होते. त्यांना प्राण गेला तरी असत्य भाषण

करण्याची इच्छाही होणें शक्य नव्हतें. ह्मणून त्यांच्या सांगण्यांत तथ्य असलें पाहिजे असा निश्चय सहज होतो.

पण इतक्यानेंच आधुनिक विद्वानांची खात्री होणार नाहीं. कारण जरी ते महापुरुष बुद्धिपुरःसर खोटें बोलणार नाहींत, हें कबूल करणें भाग पडतें, तरी कदाचित् त्यांचा गैरसमज होऊन ते स्वतःच फसले नाहींत कशावरून, ही शंका निघणारच. ह्मणून साधकांनीं शास्त्रांत व सत्पुरुषांच्या ग्रंथांत प्रतिपादित केलेलीं तत्त्वें आणि सिद्धांत, तर्क-दृष्टया व अनुभवानें खरे ठरतात किंवा कसें याजबद्दल आपली खात्री करून घ्यावी.

आतां आधुनिक शास्त्रांतील शोध जसे अनुभवानें पाहिजे तेव्हां सर्वांस सिद्ध करतां येतात त्याप्रमाणें सिद्धांत पाहिजे तेव्हां अनुभ-वानें सिद्ध करतां येत नाहीं; कारण अनुभव येण्यास मुमुक्षूची स्थिति फार उच्च झाली पाहिजे. पण सर्व आधुनिक शोधही स्वानुभवानें सिद्ध करण्यापुरती यंत्रसामग्री सर्वत्र उपलब्ध नसते. तरी ते शोध सत्य आहेत अशी खात्री बहुतेक सर्वांस असते, ती आप्तवाक्यावर विश्वास ठेऊनच नव्हे काय ?

आक्सिजन व नैट्रोजन या वायूंस जलमय स्थितींत आणतां येतें हें सर्वांस माहित आहेच. पण ह्या वायूस प्रत्यक्ष जलमय स्थितींत पाहिलेले मनुष्य फारच थोडे असतील. तरी ही गोष्ट सर्व शास्त्रज्ञांस संमत आहे, व हें विश्वासामुळेंच, असें कबूल केलें पाहिजे. याचप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कार होई तों मुमुक्षूनें आप्तवाक्यावर श्रद्धा ठेविली पाहिजे.

अद्वैतमतांतील मुख्य सिद्धांत आचार्यांनीं फार थोडक्यांत पण उत्तम रीतीनें सांगितले आहेत.

**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या यो जीवो ब्रह्मएव सः ।**

भावार्थः—ब्रह्म सत्य आहे, हें जगत् मिथ्या आहे. व जो जीव तोच ब्रह्म होय. या सिद्धांतावर मुमुक्षूंची श्रद्धा बसली पाहिजे. पण या श्रद्धेच्या आड विपरीत भावना येते. विपरीत भावना ह्मणजे वस्तु-स्थितीच्या उलट गैरसमज. हा गैरसमज अनेक जन्मांत दृढ झाल्यामुळें तो पुनःपुनः मनांत उगवतो. तो गैरसमज असा. जग सत्य आहे, व जीव हा देहमय आहे.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**वहुजन्मदृढाभ्यासाद्देहादिष्वात्मधीः क्षणात् ।**
**पुनःपुनरुदेत्येवं जगत्सत्यत्वधीरपि ॥**

भावार्थः—अनेक जन्मांच्या दृढाभ्यासानें हा देहच आत्मा आहे अशी बुद्धि, व त्याचप्रमाणें जग सत्य आहे ही बुद्धि पुनःपुनः उदय पावते.

ही विपरीत भावना आहे. हिचा नाश झाला कीं श्रद्धा वृद्धिंगत होईल. ह्मणून या विपरीत भावनेचा नाश केला पाहिजे. यासंबंधानें अत्यंत उपयुक्त असे दोन उपाय विद्यारण्य स्वामींनीं सुचविले आहेत. त्यांपैकीं पहिला हाः—

**विपरीता भावनेयमैकाग्र्यात्सा निवर्तते ।**
**तत्वोपदेशात्प्रागेव भवत्येतदुपासनात् ॥**

भावार्थः—ही विपरीत भावना आहे. ती एकाग्रतेच्या योगानें निवृत्त होते. ही एकाग्रता तत्वोपदेशापूर्वींच उपासनेनें प्राप्त होते.

ईश्वराच्या उपासनेनें चित्ताचें एकाग्र्य प्राप्त होतें, व नंतर ही विपरीत भावना नाहींशी होऊन तत्वसिद्धांतावर पूर्ण श्रद्धा बसते. हा

एक उपाय झाला. दुसरा उपाय असा कीं, या विपरीत भावनेच्या निवृत्तीसाठीं तत्वभावना वारंवार करीत जावी ह्मणजे ही विपरीत भावना नाहींशी होईल आणि तत्त्वसिद्धांतावर श्रद्धा बसेल.

तत्त्वभावनया नश्येत्सातो देहातिरिक्तताम् ।
आत्मनो भावयेत्तद्वन्मिथ्यात्वंजगतोऽनिशं ॥

भावार्थः—ती तत्त्वभावनेनें नष्ट होते, ह्मणून आत्म्याची देहातिरिक्तता व जगताचें मिथ्यत्व यांची वारंवार भावना करीत जावें.

ब्रह्मप्राप्तीसाठीं ज्या श्रद्धेची आवश्यकता आहे ती श्रद्धा फारच दुर्लभ आहे असें समजावें. ही श्रद्धा योग्य अधिकाराच्या साधकाशिवाय इतरांस प्राप्त होणें शक्य नाहीं. "ही श्रद्धा विद्वानांत मात्र नाहीं, पण ती भोळे भाविक लोकांत बरेच ठिकाणीं आढळेल" असा साधारण लोकसमज आहे पण तो चुकीचा आहे.

स्वामी विवेकानंदांस एके साधूंनीं जें या मुद्यासंबंधानें सांगितलें, त्याचा नीट विचार केला तर, खरी वस्तुस्थिति काय आहे, हें सहज लक्षांत येईल. साधु ह्मणाले "ह्या विश्वांत अतिपूज्य, अति शुद्ध, अत्युत्तम, दयाळू, व सर्वशक्तिमान असा ईश्वर आहे; व त्याची प्राप्ति झाली तर अक्षय सुखाचा ठेवा प्राण्यास सांपडेल; व त्याला उत्तम गति मिळेल, अशी जर मनुष्यांची पक्की खात्री असती, तर सर्व लौकिक धंदा उद्योग सोडून देऊन ईश्वरप्राप्तीसाठीं सर्वांनीं यत्न केला नसता काय ?"

"पहा शेजारच्या खोलींत सोन्याचा मोठा गोळा आहे, असें जर एखाद्या चोरास समजलें, तर तो गोळा हस्तगत होईपर्यंत त्याला एक पळभरही चैन पडेल काय ? त्याला स्वस्थ डोळ्यास डोळा लावतां येईल काय ? हरएक प्रयत्नानें तो सोन्याचा गोळा आपल्या स्वाधीन करून

घेण्याचा त्याचा उद्योग कधीं बंद पडेल काय ? इतकी कासावीस जर क्षुल्लक संपत्तीकरतां लोक करतात, तर अक्षय सुखाचा ठेवा मिळविण्यास त्यांनीं किती झटावें? परमेश्वरप्राप्तीसाठीं त्यांना किती उत्कंठा असावी ? पण अशी उत्कंठा लाखांत एकालाही नसते. मग ईश्वरावर श्रद्धा ठेवणारे पुष्कळ लोक आहेत असें कसें ह्मणतां येईल ?

आतां ईश्वरावरही जर क्वचितच श्रद्धा असलेली दिसते, तर निर्गुण ब्राह्मावर श्रद्धा ठेवणारे पुरुष याहूनही विरळा, असेंच ह्मणणें भाग पडतें. पण ज्याला मोक्षाची खरी इच्छा असेल त्यानें वर सांगितलेल्या उपायांनीं आपली श्रद्धा अवश्य वाढवावी.

( ६ ) समाधानः—आतां षट्संपत्तींतील अखेरचें साधन जें समाधान त्याबद्दल विचार केला पाहिजे. चित्तास कोणत्याही प्रकारची काळजी, चिंता नसली, कोणताही त्रास नसला व तें सुखमय असलें ह्मणजे तें समाधानांत आहे असा व्यवहारांत समाधान या शब्दाचा अर्थ होतो. पण षट्संपत्तींतील अखेरचें साधन जें समाधान तें व्यावहारिक समाधान असें समजूं नये. या समाधानाची व्याख्या आचार्य देतातः—

**नियतं स्थापनं बुद्धेः शुद्धे ब्रह्मणि सर्वदा ।**
**तत्समाधानमित्युक्तं न तु चित्तस्य लालनं ॥**

भावार्थः—शुद्ध ब्रह्माच्याठायीं नेहेमीं एकनिष्ठेनें बुद्धीचें स्थापन, त्याला समाधान असें ह्मणतात. समाधान ह्मणजे चित्ताचें लालन नव्हे.

अद्वैत सिद्धांताप्रमाणें हें सर्व जग ब्रह्ममयच आहे.

**सर्वं खल्विदं ब्रह्म नेह नानास्ति किंच न ।**

भावार्थः—हें ( दृश्यजगत् ) सर्व ब्रह्मच आहे, येथें अनेक असें कांहीं नाहीं.

तथापि हें जग दिसतें व ब्रह्म दिसत नाहीं. व या जगतांत, ब्रह्मांत नसलेले, अनेक धर्म आहेत ह्मणून हें जग जरी ब्रह्ममय असलें, तरी त्यांत उघड उघड दुसऱ्या कशाचें तरी मिश्रण असलें पाहिजे. हें मिश्रण मायेचें होय. मायाब्रह्माचें मिश्रण होऊन जग झालें आहे. ह्मणून या जगांतील पदार्थांत माया व ब्रह्म या दोघांच्याही स्वरूपाचें मिश्रण झालें आहे. त्यापैकीं ब्रह्माचें रूप कोणतें व मायेचें कोणतें याचा निवाडा झाला पाहिजे.

पचदशींत विषयानंदांत ह्मटलें आहेः—

**सत्ता चितिः सुखं चेति स्वभावा ब्रह्मणस्त्रयः।**

भावार्थः—सत्ता, चैतन्य व सुख असे ब्रह्माचे तीन स्वभाव आहेत. सारांश ब्रह्माचें स्वरूप सच्चिदानंदमय समजावें. आतां मायेचें स्वरूप काय तें पाहिलें पाहिजे.

**असत्ता जाड्यदुःखे द्वे मायारूपं त्रयंत्विदं ॥**
**असत्तानरशृंगादौ जाड्यं काष्ठशिलादिषु ।**
**घोरमूढधियोर्दुःखमेवं माया विजृंभिता ॥**

भावार्थः—असत्ता, जाड्य व दुःख असें तीन प्रकारचें मायेचें रूप आहे. त्यापैकीं असत्ता ही मनुष्याचें शिंग वगैरे असंभवनीय वस्तूंत असते. जाड्य हें काष्ठ, पाषाण वगैरे जड वस्तूंत दिसतें. व दुःख हें घोर आणि मूढ ( रजोगूण व तमोगुणाच्या ) बुद्धिवृत्तींत अनुभवास येतें.

ब्रह्माचें रूप सच्चिदानंदमय, व मायेचें रूप याच्या उलट ह्मणजे असत्, जड व दुःखमय असें आहे., या दोनीही रूपांचें मिश्रण होऊन हें जग बनलें आहे. या मिश्ररूपांत ब्रह्माचें रूप ओळखून साधकानें तेथें अनुसंधान लावलें पाहिजे. मायेच्या चिंतनानें साधकास

लाभ होत नसल्यामुळें, तिचे रूपाकडे लक्ष जाऊं न देतां, ब्रह्माचे धर्म जे या जगतांतील वस्तूंत दिसतात त्यांजकडे साधकानें आपलें लक्ष देत जावें, ह्मणजे व्यवहारांत असतांनाही ब्रह्माचें चिंतन घडेल. तें कसें ? या प्रश्नाचें उत्तर पंचदशींत विषयानंदांत दिलें आहे.

शिलादौ नामरूपे द्वे त्यक्त्वा सन्मात्रचिंतनं ।
त्यक्त्वा दुःखं घोरमूढधियोः सच्चिद्विचिंतनं ॥
शांतासु सच्चिदानंदांस्त्रीनप्येवं विचिंतयेत् ।
कनिष्ठमध्यमोत्कृष्टास्तिस्त्रश्चिंताः क्रमादिमाः ॥

भावार्थः—शिलादिक जड पदार्थांत नामरूपात्मक मायेचा अंश टाकून फक्त सत्तेचें चिंतन करावें. घोर मूढ या बुद्धिवृत्तींत दुःखाचा भाग टाकून सत्ता व चैतन्य यांचें चिंतन करावें. शांत वृत्तींत सच्चि-दानंद या तीहींचेंही चिंतन करीत जावें. याप्रमाणें क्रमानें कनिष्ठ, मध्यम व उत्कृष्ट असे हे चिंतन करण्याचे तीन प्रकार आहेत.

सारांश असा अभ्यास करणारा साधक जगांतील सर्व पदार्थांत ब्रह्माचें रूप शोधीत रहातो. याप्रमाणें अभ्यास वाढवीत गेलें ह्मणजे अखेर शुद्ध ब्रह्मस्वरूपाचा निश्चय होऊन तेथें साधकाचें अनुसंधान लागतें व अखेरचें साधन जें समाधान तें त्याच्या हातीं लागतें.

साधक षट्संपत्तीयुक्त झाला तरी त्यानें ब्रह्मसाक्षात्कार होईतों-पर्यंत साधनांचा अभ्यास सुरू ठेवला पाहिजे, व त्यांत यत्किंचित्‌ही कमतरता पडूं देऊं नये. एकदां साक्षात्कार झाला ह्मणजे मात्र क-शाचीच आवश्यकता रहात नाहीं.

भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यंते सर्वसंशयाः ।
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥

भावार्थः—त्या परमश्रेष्ठ परब्रह्माचा साक्षात्कार झाल्यावर या साधकाची हृदयग्रंथी तुटते, सर्व संशय नाहींसे होतात, व सर्व कर्मांचा क्षय होतो.

असें झाल्यावर कोणत्याही साधनाचा अभ्यास करावयास नको. साधकपणा जाऊन त्या धन्य पुरुषाला सिद्धत्व प्राप्त झालें, व त्याच्या अविश्रांत श्रमाचें त्याला पूर्ण फल मिळालें. आतां त्याला कसलीही खटपट करण्याची आवश्यकता राहिली नाहीं. तो मुक्तीचा अधिकारी झाला येवढेंच नव्हे तर जिवंतपणींच तो मुक्तीचे उत्तम सुखाचा अनुभव घेतो. त्याला मिळावयाचें तें सर्व मिळालें, व कोणतेंही कर्तव्य राहिलें नाहीं.

याला उत्तम दृष्टांत हाच कीं, लोखंडाचें भांडें नेहेमीं घांसलें पाहिजे, तरच तें स्वच्छ व चकचकीत राहील. जरा घांसण्याची हयगय झाली कीं तें लागलेंच काळें पडतें. पण एकदां त्यास परिसाचा स्पर्श होऊन त्याचें सोनें झालें, ह्मणजे मग तें स्वाभाविकरीत्याच स्वच्छ आणि तेजवान रहातें. त्याला पुनःपुनः घांसून साफ करण्याची जरूरी नसते. तें पुर्ववत् काळें व मलीन कधींही होणार नाहीं.

मुक्त पुरुषाची स्थिति सोन्याप्रमाणें स्वभावतःच स्वच्छ व मलरहित असते. पण साधकदशेंत असलेल्या पुरुषाचा अभ्यास सदैव सुरू राहिला पाहिजे. या अभ्यासाच्या जोरावरच मुमुक्षूची उन्नति होत जाते. प्रथम त्याचें चित्त शुद्ध व विरक्त होऊन जागृतींत त्याचें बोलणें, आचरण, व विचार सर्व शुद्धच असतात. तो विषयांच्या मोहास हारी जात नाहीं. किंबहुना विषयवासनाही तो मनांत येऊं देत नाहीं. साधक या दशेस पोहोंचला ह्मणजे त्याची बरीच उन्नति झाली असें समजावें.

पण याही पलीकडे एक पायरी आहे. मन व इंद्रियें ताब्यांत असल्यामुळें ज्याप्रमाणें आचारविचार जागृतींत शुद्ध रहातात, त्याप्रमाणें स्वप्नांतही ते शुद्ध राहिले पाहिजेत. हें युक्त, हें अयुक्त, ही व्यवस्था स्वप्नांत नसते. तरी ज्यांचा स्वभावच सर्व शुद्ध झाला आहे, त्यांना वाईट आचरणाची बुद्धि स्वप्नांतसुद्धां येणार नाहीं. ही उत्तम व अभिनंदनीय स्थिति जेव्हां साधकास प्राप्त होते, तेव्हां अखेरची सिद्धि त्यास लौकरच मिळणार असें खास समजावें. अशा साधकानें नेटानें शेवटचा यत्न करून आपलें कल्याण अवश्य करून घ्यावें.





# परमार्थपर व्याख्यानमाला.

## ४

## मुमुक्षुत्व.

साधनचतुष्टयापैकीं तीन साधनांबद्दल विचार मागील व्याख्यानांत झाला. आतां चौथें साधन जें मुमुक्षुत्व त्याचें विवेचन कर्तव्य आहे. मुमुक्षुत्व ह्मणजे सुटून जाण्याची इच्छा. पण कशांतून सुटून जावयाचें हा प्रश्न शिल्लक राहिला.

आचार्य ह्मणतातः—

**संसारबंधनिर्मुक्तिः कथं मे स्यात्कदा विधे ।**
**इति या सुदृढा बुद्धिर्वक्तव्या सा मुमुक्षुता ॥**

भावार्थः—हे ब्रह्मदेवा, माझी या संसाराच्या बंधनांपासून कशी सुटका होईल, व ती कधीं होईल, अशी दृढ इच्छा झाली ह्मणजे तिला मुमुक्षुता ह्मणावें.

मुमुक्षुता ह्मणजे या संसाररूपी बंधनांतून आपली सुटका करून घेण्याची इच्छा. अर्थातच ती होण्यापूर्वीं, या संसारांत राहाणें ह्मणजे कारागृहवासच आहे, असें पूर्णपणें समजलें पाहिजे. पण बहुतेक प्राण्यांस असें वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर विषकीटन्यायानें ते या दुःखमय संसारांतच सुख मानतात. या सृष्टींतील तरतऱ्हेचे विषयोपभोग आपणास मिळावे अशी इच्छा करतात, आणि दैववशात् ते प्राप्त झाले तर आपणास धन्य मानतात.

अशा प्राण्यांस आपण बद्ध आहों याचा थांगच लागलेला नसतो. हा सर्व संसार अनर्थमूलक आहे, विषयजन्य सुख नाशिवंत व असार आहे, अखेरीस दुःख ठेवलेलेंच आहे, तें कोणासही सोडीत नाहीं, हें त्या बिचाऱ्यांच्या ध्यानांतही येत नाहीं. त्यांना अहोरात्र कनक व कांता यांचाच ध्यास लागलेला असतो. खरें हितकर भाषण त्यांना रुचत नाहीं, व सदुपदेश करणाराचा ते उपहास करतात.

अशा बद्ध प्राण्यांचें वर्णन समर्थ दासबोधांत करतातः—

**आतां बद्ध जाणिजे ऐसा । अंधारींचा अंध जैसा । चक्षुविण दाही दिशा । शून्याकार ॥ न दिसे नेणे कर्माकर्म । न दिसे नेणे धर्माधर्म । न दिसे नेणे सुगम । परमार्थमार्ग ॥ न कळे भक्ति न कळे ज्ञान । न कळे वैराग्य न कळे ध्यान । न कळे मोक्ष न कळे साधन ॥ या नांव बद्ध ॥ परमार्थाविषयीं अज्ञान । प्रपंचाचें उदंड ज्ञान । नेणे स्वयें समाधान । या नांव बद्ध ॥ परमार्थाचा अनादर । प्रपंचाचा अत्यादर । संसार भार जोजार । या नांव बद्ध ॥ नेत्रीं द्रव्यदारा पहावी । श्रवणीं द्रव्यदारा ऐकावी । चिंतनीं द्रव्य दारा चिंतावी । या नांव बद्ध ॥ जागृतीं स्वप्नीं रात्रंदिवस । ऐसा लागला विषयीं ध्यास । नाहीं क्षणाचा अवकाश । या नांव बद्ध ॥**

बद्धप्राण्यांचीं हीं लक्षणें तर सर्व आहेतच, पण विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें लक्षण हें कीं त्या दुर्दैवी जीवांस आपण बद्ध आहोंत याचा पत्ताही नसतो.

समर्थ ह्मणतातः—

**न कळे कैसें तें बंधन । न कळे मुक्तीचें लक्षण । न कळे वस्तू विलक्षण । या नांव बद्ध ॥**

ही खरोखर आश्चर्यकारक गोष्ट नाहीं काय ? अज्ञान पक्ष्यांस देखील पिंजऱ्यांत कोंडून ठेवले, तर ते बिचारे किती अस्वस्थ होतात किती खिन्न मुद्रेनें चहूंकडे पहातात ! सुटून जाण्यासाठीं किती वेळ त्या पिंजऱ्याच्या तारांवर आपला देह व चोंच आपटून आपणास इजाही करून घेतात ! व अखेर दैववशात जर उडून जाण्याची संधी मिळालीच तर एक क्षणभरही मागें पुढें न पहातां त्या कारागृहांतून निसटून जातात.

पण मनुष्याची स्थिति पहा. या संसारांत बद्ध राहून तो लक्ष चौर्यायशीं योनींत भ्रमण करीत रहातो, व अनेक दुःखपरंपरा भोगतो. पण दुर्लभ मनुष्य देह प्राप्त झाला तरी त्याला येथून सुटून जाण्याची बुद्धि होत नाहीं. वस्तुतः त्याला विचार व विवेक करण्याची शक्ति आहेच. पण या संसारांत जरा श्लाघ्यता मिळाली कीं मी मोठा, मी श्रीमान, मी बुद्धिमान, मी रूपवान, मजसारखा दैववान कोणीही नाहीं, याच घमेंडींत राहून विषयोपभोगांत आपलें सर्व आयुष्य तो गमावितो, व अखेर यमपुरीचा रस्ता धरतो. सारांश ईश्वरी माया अगाध आहे. मी मी ह्मणणारे पंडितही या अज्ञानांतच गुंतून रहातात. आपलें आयुष्य थोडें आहे, त्याचा लौकर नाश होणार पुढें मरण ठेवलेलेंच आहे, व मरणानंतर अनेक यातना भोगूनही पुनर्जन्म चुकत नाहीं. याचा विचार करणारे विरळा.

याप्रमाणें आपण बद्ध आहों याचाच थांग ज्यांना नाहीं त्यांना आपली सुटका करून घेण्याची इच्छा तरी कशी व्हावी ? पण येवढें बरें आहे कीं या संसारांतच सर्व काल संतुष्ट रहाणें मानवी प्राण्यांस शक्य नाहीं.

अनेक जन्मांचें जमत गेलेलें सुकृत केव्हांना केव्हां तरी फलास येतें, आणि त्या अंध झालेल्या जीवांचे डोळे उघडूं लागतात. या

संसाराचा व विषयोपभोगाचा त्याला वीट येऊं लागतो. त्याची विवेकबुद्धि जागृत होऊन त्याला या जगताचें खरें स्वरूप समजूं लागतें. ज्या विषयांस आपण इतके दिवस सुखकारक समजत होतों, ते वस्तुतः दुःखमयच आहेत, अशी त्याची खात्री होते. मनुष्यजन्मास येऊन विषयोपभोगांतच गुंतून रहाणें मानवीप्राण्यास शोभत नाहीं असा बोध त्याचे अंतःकरणांत उत्पन्न होतो. हा सर्व संसार अनर्थमूलक आहे, यांतून सुटून जाण्यांतच आपलें खरें कल्याण आहे, असा दृढ ठसा त्याचे मनावर उमटतो. अर्थातच तो या जन्मपरंपरेंतून सुटून जाण्याची इच्छा करतो, आणि मुमुक्षू या संज्ञेस पात्र होतो. परमार्थाचा सर्व पाया मुमुक्षुत्वावर रचला जातो, हें सांगण्याची जरूरी नाहीं. कारण जोंपर्यंत मोक्ष मिळविण्याची इच्छा सुद्धां झाली नाहीं, तोंपर्यंत परमार्थाकडे पहाणार तरी कोण ?

आतां ही संसारांतून सुटण्याची इच्छा कित्येक पुण्यवान प्राण्यांस पूर्वजन्म संस्कारानें, अथवा साधुसमागमानें, किंवा ईश्वरकृपेनें, सुखोपभोग घेत असतांच होते. दैव पूर्णपणें अनुकूल असतां, अखंड राज्यश्री हातीं असतां, कोणतेंही अनिवार्य दुःख किंवा संकट अंगावर येऊन पडलें नसतां, असे सत्पुरुष सर्वसंगपारित्याग करून, संपत्ति व ऐश्वर्यावर लाथ मारून, केवळ परमार्थप्राप्तीसाठीं आपल्या राहिलेल्या आयुष्याचा व्यय करतात.

पूर्वीचे पुण्यशील राजे, आपला पुत्र राज्यकारभार पाहण्यास समर्थ झाला आहे इतकें पाहिल्याबरोबर, आपला सर्व राज्यकारभार त्याजकडे सोपवून, त्याला राज्यपदावर स्थापून आपण अरण्यांत तपश्चर्येकरतां जात असत; व अखेर तेथें मोक्ष साधनाकरतां दृढ निश्चयानें झटून अंतीं कृतकृत्य होत असत.

सूर्यवंशी राजाबद्दल कालिदास ह्मणतात:—

**गुणवत्सुतरोपितश्रियः परिणामे हि दिलीपवंशजाः ।**
**पदवीं तरुवल्कवाससां प्रयताः संयमिनां प्रपेदिरे ॥**

भावार्थ:—गुणवान पुत्राला आपलें सर्व ऐश्वर्य देऊन दिलीपाच्या वंशांत उत्पन्न झालेले राजे, अखेर झाडांचीं वल्कलें नेसणाऱ्या व आत्मसंयमन करणाऱ्या यतींच्या पदवीला पोहोंचत असत.

त्याचप्रमाणें प्राचीन कालीं आश्रमधर्म पाळणारे पुरुष, प्रथम गृहस्थाश्रम स्वीकारून, व त्या आश्रमांतील सर्व कर्तव्यकर्में यथासांग करून, नंतर योग्य क्रमानें वानप्रस्थाश्रमाचे धर्म यथाविधी आचरून, अखेर संन्यास दीक्षा घेत असत. या शेवटच्या आश्रमांत त्यांना अनायासानें मोक्षप्राप्ति होत असे.

या कलियुगांत, व विशेषेंकरून सद्यःस्थितींत असे मुमुक्षू विरळा. पण बुद्धासारखे महात्मे या युगांतच झाले आहेत, हें विसरूं नये. या श्रेष्ठ पुरुषास सर्व प्रकारचें सुख उपलब्ध होतें. तारुण्याची भरज्वानी, उत्तम रूप, अप्रतिम शक्ति, श्रेष्ठ राज्यपद, लावण्ययुक्त स्त्री, अशी उत्कृष्ट उपभोगाची सामुग्री जवळ असूनही त्यानें ती सर्व तुच्छ मानिली, व स्वतःला दुःखाचा लेश नसतां, केवल परदुःखानें कष्टी होऊन, या जगांतील प्राण्यांच्या दुःखाचें निरसन व्हावें, निदान तें कमी करण्याचा उपाय तरी मिळावा, या स्तुत्य हेतूनें त्यानें यतिदीक्षा घेतली.

पण सुख भोगीत असतां विरक्ति झाल्याचीं उदाहरणें विरळा. मायेचा मोह असा अनिवार आहे कीं, अनेक त्रास, संकटें व आधिव्याधी भोगूनही बहुतेकांस मुळींच विरक्ति होत नाहीं. परंतु वारंवार दुःखें भोगून व्याकुळ झालेल्या एखाद्या प्राण्यास ईश्वरकृपेनें या संसाराचा वीट येतो, व येथून सुटून जाण्याची इच्छा होते.

समर्थ ह्मणतात:—

**ऐसा प्राणी जो कां बद्ध । संसारीं वर्ततां अबद्ध । तयासि प्राप्त झाला खेद । काळांतरीं ॥ संसारदुःखें दुखावला । त्रिविध-तापें पोळला । निरूपणें पालटला । अंतर्यामीं ॥ झाला प्रपंचीं उदास । मनीं घेतला विषयत्रास । ह्मणे आतां पुरे सोस । संसाराचा ॥ प्रपंच जाईल सकळ । तेथील श्रम तो निष्फळ । आतां कांहीं आपुला काळ । सार्थक करूं ॥**

आतां या संसारांत दुःखाचा अनुभव येणें कठीण नाहीं. सुखच मिळण्यास प्रयास पडतात. दुःख अयाचित ठेवलेलें आहेच. सर्व प्राणिमात्रांस सुखापेक्षां दुःखच जास्त भोगावें लागतें.

तुकोबा ह्मणतात:—

**सुख पहातां जवापाडें । दुःख पर्वता येवढें ॥**

आणि याबद्दल नवलही वाटावयास नको. कारण देवादिकांचीही हीच स्थिति. पहा:—

**दिनमेकं शशीपूर्णः क्षीणस्तु बहु वासरान् ।**
**सुखाद्दुःखं सुराणामप्यधिकं का कथा नृणां ॥**

भावार्थ:—चंद्र एकच दिवस पूर्ण असतो. पण क्षीणावस्थेंत त्याला पुष्कळ दिवस काढावे लागतात. याप्रमाणें सुखापेक्षां दुःख देवादिकांनाही जास्त असतें, मग मनुष्याची काय कथा ?

दुःख भोगणें कोणासही आवडत नाहीं. ज्याला वारंवार अनेक दुःखें भोगावयास लागतात, तो आपणास हतभाग्य मानतो. पण कष्ट व त्रास भोगण्यांतच त्याचें खरें कल्याण आहे. कारण असें नसल्यास त्याला तीव्र वैराग्य व मुमुक्षुता उत्पन्न होणें दुरापास्त आहे. असो.

या दुःखपरंपरेमुळेंच अखेर अनुताप होऊन प्राणी परमार्थसिद्धीसाठीं उत्कंठित होतो.

त्याला आपण केलेल्या अनेक दुष्कर्मांची आठवण होऊन पश्चात्ताप होतो. तो आपणास तुच्छ मानूं लागतो. जो पूर्वीं गर्वानें फुगून आपणास सर्वांपेक्षां श्रेष्ठ मानीत होता, व सर्वांशीं ताठ्यानें वागत होता, तो आपल्या अनेक अवगुणांमुळें लज्जायमान होऊन, लीनतेचा स्वीकार करतो.

समर्थ ह्मणतातः—

**ह्मणे मी अवगुणाची राशी । ह्मणे मी कुकर्मी आळशी । ह्मणे मी भार झालों भूमीशी । या नांव मुमुक्षू ॥ आपणास निंदी सावकाश । पोटीं संसाराचा त्रास । धरी सत्संगाचा ह्व्यास । या नांव मुमुक्षू ॥**

आपण इतकावेळ पर्यंत आपलें आयुष्य व्यर्थ घालविलें, व आपलें कांहींच सार्थक करून घेतलें नाहीं, असें त्याच्या ध्यानांत येऊन त्याला अत्यंत खेद होतो, व अनुताप होतो.

**जन्मेदं वंध्यतां नीतं भवभोगोपलिप्सया ।**
**काचमूल्येन विक्रीतो हंत चिंतामणिर्मया ॥**

भावार्थः—विषयोपभोगांवर लंपट होऊन मी आपला सर्व जन्म व्यर्थ घालविला. अरेरे, कांचेचें मोल घेऊन मी चिंतामणी विकून टाकला.

विषयसुखाच्या लोभानें फायदा तर झाला नाहींच. पण उलट त्या बिचाऱ्या प्राण्यानें आपली जी शोचनीय स्थिति करून घेतली त्याबद्दल तो हळहळत असतो.

भर्तृहरी ह्मणतातः—

**भोगा न भुक्ता वयमेव भुक्तास्तपो न तप्तं वयमेव तप्ताः ।**
**वयो न यातं वयमेव यातास्तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः ॥**

भावार्थः—भोग कांहीं भोगले गेले नाहींत पण उलट आह्मींच भुक्त झालों, तप तर केलें नाहींच पण आह्मीं उगीच तप्त झालों, वय तर गेलें नाहीं पण आह्मींच जात चाललों, व तृष्णा जीर्ण न होतां आह्मीं जीर्ण झालों.

अशा स्थितींत आलेल्या पुरुषास मोक्ष मिळविण्याची अत्यंत उत्कंठा असते. पण केलेल्या कर्मांची आठवण पडून आपण मोक्षास अनधिकारी आहों असें वाटून त्यांना भय होतें. ते आपली शोचनीय स्थिति उघड कबूल करतात, कारण आपले दोष छपवून ठेवण्याची इच्छा त्यांना मुळींच नसते.

> परदाररतिः फलाभिसंधिर्बहुदंभो वसुकामना ममत्वं ।
> चरितं मुहुरस्मदीयमेतदपवर्गस्य कथं नु भाजनं स्मः ॥

भावार्थः—परस्त्रीविषयीं इच्छा, फलांवर आसक्ति, अत्यंत दंभ, द्रव्याचा अभिलाष, व अहंकार असें तर आमचें नेहमींचें आचरण, मग आह्मीं मोक्षाचे अधिकारी कसे होऊं?

असा पश्चात्ताप होऊन तीव्र वैराग्य प्राप्त झालें, व आपणास मोक्ष मिळावा अशी दृढ इच्छा उत्पन्न झाली, ह्मणजे तो पुरुष मुमुक्षू या संज्ञेस पात्र होतो. पण हें वैराग्य अथवा मुमुक्षुत्व फार वेळ टिकेलच अशी खात्री नसते. अनुताप झालेला प्राणीही दुर्दैवानें पुनः संसारावर लंपट होऊन बद्ध स्थितींत पुनः पडतो. अथवा त्याचें वैराग्य व मुमुक्षुत्व जसें तीव्र पाहिजे तसें रहात नाहीं. जोंपर्यंत वैराग्य आणि मुमुक्षुत्व हीं दोनीही मंदच आहेत तोंपर्यंत शमदमादि साधनांपासून व्हावी तशी फलप्राप्ति होत नाहीं.

आचार्य ह्मणतातः—

> एतयोर्मन्दता यत्र विरक्तत्वमुमुक्षयोः ।
> मरौ सलिलवत्तत्र शमादेर्भानमात्रता ॥

भावार्थः—जेथें वैराग्य आणि मुमुक्षुता हीं दोनींही मंदच आहेत तेथें मारवाडांत जसें मृगजळ भासतें तसा शमदमादिसाधनांचा भास मात्र होतो.

सारांश मुमुक्षू साधनांचा अभ्यास तर करीत असतोच, पण त्यापासून एक तर त्याची व्हावी तशी प्रगती होत नाहीं, व शिवाय त्याला स्वस्थता ही वाटत नाहीं. तो जे जे उपाय करतो त्यांत त्याला यश येत नसल्यामुळें तो संशयांत पडतो. त्याच्या जिवास नेहमी तळमळ लागलेली असते. तो अनेक ग्रंथ वाचतो, पण त्यापासूनही त्याचे मनास समाधान होत नाहीं. सारांश त्या बिचाऱ्याची स्थिति चमत्कारिक व शोचनीय अशी होते.

समर्थ ह्मणतातः—

**नाना तीर्थें धुंडाळिलीं । शमदमादि साधनें केलीं । नाना ग्रंथांतरें पाहिलीं । शोधूनियां ॥ तेणें नव्हे समाधान । वाटे अवघाचि अनुमान । ह्मणे रिघूं संतांसि शरण । या नांव मुमुक्षू ॥**

अखेर असा खिन्न झालेला मुमुक्षू संतांस शरण जातो, व त्यांची प्रार्थना करतो "महाराज मी मोक्ष मिळविण्याच्या आशेनें अनेक उपाय केले, पण त्यांत मला तिळमात्रही यश आलें नाहीं. आतां आपण तरी माझा उद्धार करा." संत उत्तर देतात "बाबा ज्याचा त्यानें आपल्या स्वतःच्या यत्नानेंच उद्धार केला पाहिजे. एकाचा उद्धार दुसरा करूं शकत नाहीं.

आचार्य ह्मणतातः—

**ऋणमोचनकर्तारः पितुः सन्ति सुतादयः ।**
**बंधमोचनकर्ता तु स्वस्मादन्यो न विद्यते ॥**

भावार्थः—बापास ऋणमुक्त करणारे पुत्रादिक असतात. पण

या संसारबंधनापासून आपली सुटका करणारा आपल्या स्वतःवांचून दुसरा कोणीही नाहीं.

"आतां ही गोष्ट खरी कीं दुःखांत दुःखांत प्रकार आहेत. कांहीं दुःखांचें निरसन दुसऱ्यास करतां येतें. पण कांहीं दुःखांपासून आपणास आपणच सोडविलें पाहिजे. याशिवाय अन्य उपायच नाहीं.

आचार्य ह्मणतातः—

**मस्तकन्यस्तभारादेर्दुःखमन्यैर्निवार्यते ।**
**क्षुधादिकृतदुःखं तु विना स्वेन न केनचित् ॥**

भावार्थः—मस्तकावर ठेवलेल्या भारादिकांचें दुःख दुसरे निवारण करूं शकतात. पण क्षुधा तृषा वगैरे शरीराच्या पीडा आपण स्वतः अन्नोदक सेवन करून शांत केल्या पाहिजेत. तेथें दुसऱ्याचा उपाय चालत नाहीं.

"पण याहीपेक्षां तुझ्या अंतःकरणावर उत्तम ठसा उमटून तुझी खात्री होईल असा व्यवहारिक दृष्टांत तुला देतों. पहा ज्याला रोग झाला आहे, त्याला जर आपला रोग बरा व्हावा अशी इच्छा असेल तर त्यानें औषध घेतलें पाहिजे, व अवश्य तें पथ्यही केलें पाहिजे, तरच त्याचा इष्ट हेतु सिद्धीस जाईल.

आचार्य ह्मणतातः—

**पथ्यमौषधसेवा च क्रियते येन रोगिणा ।**
**आरोग्यसिद्धिर्दृष्टास्य नान्यानुष्ठितकर्मणा ॥**

भावार्थः—जो रोगी औषध घेतो व पथ्य करतो, त्यालाच आरोग्य मिळालेलें दिसतें. दुसऱ्यानें पथ्य वगैरे करून रोग्यास फायदा काय.

"मला औषध कडू लागतें, अथवा त्याची रुची इतकी वाईट आहे कीं तें घेतल्याबरोबर माझें मन विटतें. पथ्यही माझ्यानें बिल-

कुल करवत नाहीं. पण माझा रोग तर बरा झाला पाहिजे. यासाठीं दुसऱ्या कोणी मजकरतां औषध घेऊन पथ्य केलें तर चालेल काय? असें जर एखादा रोगी ह्मणाला तर सर्वांस हंसें येणार नाहीं काय?

"मग बाबा हा भवरोग तर सर्व रोगांत अत्यंत कठीण आहे. यापासून ज्याला आपली मुक्तता करून घ्यावयाची आहे त्यानें इतर रोग्यांप्रमाणें स्वतःच यत्न केले पाहिजेत.

आचार्य ह्मणतातः—

**तस्मात्सर्वप्रयत्नेन भवबंधविमुक्तये ।**
**स्वेनैव यत्नः कर्तव्यो रोगादाविव पंडितैः ॥**

भावार्थः—ह्मणून या भवबंधनांतून सुटण्याकरतां शहाण्या पुरुषांनीं स्वतःच यत्न केला पाहिजे. रोग निरसनार्थ जसा करतात तसा.

श्रीकृष्णही गीतेंत ह्मणतातः—

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥**

भावार्थः—आपण स्वतः आपला उद्धार केला पाहिजे. स्वतःस अधोगतीस जाऊं देऊं नये. कारण आपणच आपला मित्र व आपणच आपला शत्रू व्हावयाचें.

"बाबा या संसारांतून सुटून मोक्ष मिळविण्याचें खरें साधन एकच आहे. तें परब्रह्माचें अपरोक्ष ज्ञान हें होय. हें झाल्याबरोबर जीवाचा जीवभाव नष्ट होऊन आपण परब्रह्मरूपी आहों अशी त्याची निःसंशय खात्री होते, व या संसारबंधनापासून तो मुक्त होतो.

आचार्य ह्मणतातः—

**न योगेन न सांख्येन कर्मणा नो न विद्यया ।**
**ब्रह्मात्मैकत्वबोधेन मोक्षः सिद्ध्यति नान्यथा ॥**

भावार्थः—मोक्ष, योगानें साध्य होत नाहीं, सांख्यशास्त्रानें नाहीं, कर्मानें नाहीं, विद्येनें नाहीं, फक्त जीव व ब्रह्म यांच्या ऐक्याचें, ( अपरोक्ष ) ज्ञान झालें तरच मोक्ष प्राप्त होतो.

" आतां हें तर उघडच आहे कीं, अपरोक्ष ज्ञान ज्याचें त्यासच झालें पाहिजे. तें दुसऱ्यास कसें होईल ?

आचार्य ह्मणतातः—

**वस्तुस्वरूपं स्फुटबोधचक्षुषा स्वेनैव वेद्यं न तु पंडितेन ।**
**चंद्रस्वरूपं निजचक्षुषैव ज्ञातव्यमन्यैरवगम्यते किं ॥**

भावार्थः—परब्रह्माचें स्वरूप आपण स्वतःच बोधरूपी नेत्रानें पाहिलें पाहिजे. तें पंडितद्वारा पहातां येत नाहीं. जसें चंद्राचें बिंब स्वतः आपणच पाहिलें तर तें आपल्यास दिसतें. इतर लोकांच्या नेत्रांनीं तें आपणास कसें दिसेल ?

"ह्मणून तुला मोक्ष मिळविण्याकरतां स्वतःच यत्न केले पाहिजेत. आह्मी तुला बोध करून खरा मार्ग दाखवूं पण त्या मार्गानें तुला स्वताला गेलें पाहिजे." अनुभवी संत मुमुक्षूस असा उपदेश करून त्याला पुनः शमदमादि साधनांच्या अभ्यासाकडे वळवितात, व आपल्या देखरेखीखालीं पुनः तो अभ्यास सुरू करवितात. मग हळूहळू त्यांच्या कृपेनें व सहाय्यानें मुमुक्षूला साधनांचें फल मिळूं लागतें, व मोक्ष मिळविण्याची त्याची इच्छाही वृद्धिंगत होते.

आचार्य ह्मणतातः—

**मंदमध्यमरूपापि वैराग्येण शमादिना ।**
**प्रसादेन गुरोः सेयं प्रवृद्धा सूयते फलं ॥**

भावार्थः—ती मुमुक्षुता मंद अथवा मध्यम प्रकारची जरी असली तरी गुरूच्या प्रसादानें ती वैराग्य व शमदमादि साधनांनीं वाढून फलप्रद होते.

याप्रमाणें मुमुक्षुता तीव्र झाली कीं, वैराग्यही तीव्र होऊं लागतें. कारण ज्याला मोक्षाची तीव्र इच्छा झाली तो या जगतांतील अनित्य व दुःखप्रद पदार्थावर कसा आसक्त राहील ? असो. मुमुक्षुता आणि वैराग्य हीं दोन ज्याचीं तीव्र आहेत त्या साधकाचा शमदमादि साधनांचा अभ्यास ज्यास्त श्रेयस्कर होतो. आचार्य ह्मणतातः—

**वैराग्यं च मुमुक्षुत्वं तीव्रं यस्य तु विद्यते ।**
**तस्मिन्नेवार्थवंतः स्युः फलवंतः शमादयः ॥**

भावार्थः—वैराग्य व मुमुक्षुत्व हीं ज्याचीं तीव्र आहेत, त्या पुरुषासच शमादि साधनें उपयुक्त होऊन फल देतात.

आतां अशी एक शंका उत्पन्न होते कीं परमार्थांत मोक्षाची इच्छा अगोदर झाली पाहिजे. ती झालीच नाहीं तर मनुष्य शमदमादिकांच्या खटपटींत पडणार नाहीं. यासाठीं मुमुक्षुत्व हें पहिलेंच साधन समजलें पाहिजे. मग त्याची गणना सर्व साधनांच्या नंतर या साधनचतुष्टयांत कां केली आहे ? व या व्याख्यानमालेंतही त्याचा ऊहापोह प्रथमच कां केला नाहीं ? याचें उत्तर असें आहे कीं, साधनचतुष्टयांत जें मुमुक्षुत्व अपेक्षित आहे, तें शेवटचें अति तीव्र मुमुक्षुत्व होय. मंद मुमुक्षुत्वाची साधनांत गणनाच केली नाहीं. हें मंद मुमुक्षुत्व अर्थांतच प्रथम उत्पन्न झालें पाहिजे. त्या शिवाय मनुष्य शमदमादि कष्टसाध्य उपयांच्या खटपटीस लागणारच नाहीं. पुढें गुरुप्रसादानें व इतर साधनांच्या दृढ अभ्यासानें जेव्हां त्या मुमुक्षुत्वाचें रूपांतर होऊन तें अति तीव्र होतें, तेव्हांच त्याची गणना या साधनचतुष्टयांत केली जाते.

मुमुक्षुत्व किती तीव्र असलें पाहिजे याजबद्दल एक गोष्ट स्वामी विवेकानंदानीं सांगितली आहे, ती मजेची आहे. एक तरुण मनुष्य एका

सत्पुरुषाकडे जाऊन " मजवर अनुग्रह करा " अशी रोज त्याची प्रार्थना करी. साधू कांहीं उत्तर न देतां त्याची विनंती निमुटपणें ऐकत असत. अखेर कंटाळून शिष्यानें साष्टांग नमस्कार घातला, व ह्मणाला " महाराज मीं आपणास रोज प्रार्थना करीत असतां आपणास माझी दया कां येत नाहीं ?" सत्पुरुषानें हांसून त्याला आपले बरोबर स्नानास बोलाविलें.

गुरुशिष्य दोघेही नदीवर गेले, व स्नान करण्यास सुरुवात केली. स्नान करतां करतां अकस्मात् गुरुजींनीं शिष्यास पाण्यांत ढकललें व आंत थोडावेळ दाबून ठेवलें. त्या बिचाऱ्या शिष्यानें सुटून जाण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण तो साधला नाहीं. अखेर गुरूनें त्याला सोडलें व पाण्याबाहेर काढलें.

तो बिचारा शिष्य पाणी ओकत व गुदमरत एकीकडे पडला. त्याला गुरुजींनीं सावध करून विचारलें, " बाबा तूं पाण्यांत असतांना तुझे मनांत काय विचार होता ?" शिष्यानें उत्तर केलें, " महाराज, काय विचारतां ? मी सुटतों कसा, व हवेचा एकच श्वास मला मिळतो कसा, हाच मला ध्यास लागला होता." गुरु ह्मणाले, " पाण्यांत असतां तुला या पृथ्वीचें राज्य दिलें असतें तर त्यावेळीं त्याची तुला अपेक्षा होती काय ?" शिष्य ह्मणाला, " नाहीं महाराज." गुरुजी ह्मणाले, " बाबा या संसारांतून सुटून जाण्याचा व ईश्वरप्राप्तीचा तुला असाच जेव्हां ध्यास लागेल, व सर्व ऐहिक ऐश्वर्य तुला तुच्छ वाटेल तेव्हांच तुला मोक्ष मिळण्याचा संभव आहे. ह्मणून या मुमुक्षुतेसाठीं तूं प्रथम प्रयत्न कर."

असें तीव्र मुमुक्षुत्व ज्या पुरुषास प्राप्त झालें तो लौकरच कृतकृत्य व्हावयाचा असें समजावें. जो मुमुक्षू संतांस शरण गेला, व ज्याला

आश्वासन देऊन त्यांनीं शमदमादिकांच्या अभ्यासास लाविलें, तो साधक या संज्ञेस पात्र झाला.

समर्थ ह्मणतातः—

**जो संतांसि शरण गेला । संतजनीं आश्वासिला । मग तो साधक बोलिला । ग्रंथांतरीं ॥ अभ्यासाचा संगू धरिला । साक्षेपासारिखा निघाला । प्रयत्न सांगाती घेतला । साधन पंथें ॥**

असा साधनांचा अभ्यास करणारा जो साधक त्यानें काय करावें. प्रपंचांत राहून त्याला आपला कार्यभाग साधतां येईल काय ? अथवा संसारावर लाथ मारून त्यानें अरण्याची वाट धरलीच पाहिजे काय ? याचें उत्तर हेंच आहे कीं संसारांत रहाणें किंवा रानांत जाणें हें साधकाच्या स्थितीवर अवलंबून आहे. ज्या साधकानें गृहस्थाश्रम पतकरून कुटुंबाचें ओझें अंगावर घेतलें आहे, त्यानें रानांत जाऊं नये. निराश्रित कुटुंबाची हेळसांड करून तो जर अरण्यांत निघून गेला, तर तो दोषास पात्र होईल, व त्याला सिद्धि मिळेल कीं नाहीं याजबद्दल बराच संशय आहे. पण जो एकटा निस्पृह आहे अशा साधकानें जर अरण्यांत जाण्याची इच्छा केली तर चालेल.

कांहीं सत्पुरुष संसारावर इतके विरक्त असतात कीं, जनसमूहांत रहाणें त्यांना आवडत नाहीं. निर्जन वनांतच वास करणें त्यांना पसंत पडतें. अशा सत्पुरुषाचे मनांतील उद्गार भर्तृहरी व्यक्त करतात.

**एकाकी निस्पृहः शांतः पाणिपात्रो दिगंबरः ।**
**कदा शंभो भविष्यामि कर्मनिर्मूलनक्षमः ॥**

भावार्थः—हे शंकरा, मी सर्वसंगपरित्याग करून एकटा, निस्पृह, शांत, दिगंबर, व हातच ज्याचें पात्र आहे असा होऊन, सर्व कर्मांचा समूल नाश करण्यास केव्हां समर्थ होईन ?

लौकिक संसार हा योगादिकांच्या अभ्यासांत विघ्न करणारा असल्यामुळें तो सर्वथैव त्याज्य आहे, त्यांत गुंतून राहिलें तर मोक्ष मिळणार नाहीं असेंच या सत्पुरुषांचें मत असतें. ह्मणून हा संसार मुमुक्षूनें सोडावा असाच ते उपदेश करतात. आतां मुमुक्षूला जर संसार कर्तव्यच आहे तर यांच्यामतें तो असा असला तर चालेल.

भर्तृहरी ह्मणतातः—

**धैर्यं यस्य पिता क्षमा च जननी शांतिश्चिरं गेहिनी ।**
**सत्यं सूनुरयं दया च भगिनी भ्राता मनः संयमः ॥**
**शय्या भूमितलं दिशश्च वसनं ज्ञानामृतं भोजनं ।**
**एते यस्य कुटुंबिनो वद सखे कस्माद्भयं योगिनः ॥**

भावार्थः—धैर्य ज्याचा पिता, क्षमा ही माता, शांती हीच चिरकालची पत्नी, सत्य हा पुत्र, दया ही बहीण, मनाचा संयम हाच बंधू, जमीनीचा पृष्ट भाग हीच शय्या, दिशा हेंच वस्त्र, ज्ञानामृताचें भोजन, अशी ज्याच्या कुटुंबाची व्यवस्था आहे त्या योग्याला भय कोठून असणार ?

दुसऱ्या एका सत्पुरुषानें दाखविलेली योग्याच्या कुटुंबाची दुसरी एक रचनाही ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

**नित्यानित्यविचारणा प्रणयिनी वैराग्यमेकं सुहृत् ।**
**मित्राण्येव यमादयः शमदमप्रायः सखायो मताः ।**
**मैत्र्याद्याः परिचारिकाः सहचरी नित्यं मुमुक्षा बलात् ।**
**उच्छेद्या रिपवश्च मोहममतासंकल्पवैरादयः ॥**

भावार्थः—नित्यानित्यविचारणा ही आवडती स्त्री, वैराग्य हा एकटा जिवाचा दोस्त, यमनियमादि मित्र, शमदमादिक सखे, मैत्री वगैरे शुभ वासना या दासी, मुमुक्षुता ही सहचरी, व बलानें नाश करण्यास योग्य असे मोह, अहंकार, संकल्प, वैरादिक शत्रू.

साधकानें जर संसार करावयाचा तर असलाच करावा. पुत्रदारादिकांच्या लोभांत गुंतून राहूं नये. जर तो साधक लौकिक संसारांत राहिला तर त्याचा नाश होऊन त्याला अधोगतीस जावें लागेल.

देवीभागवतांत ह्मटलें आहे:—

**कदाचिदपि मुच्येत लोहकाष्ठादियंत्रितः।**
**पुत्रदारैर्निबद्धस्तु न विमुच्येत कर्हिचित् ॥**

भावार्थ:—लोखंडी व लांकडी वेड्यांनीं बांधलेला मनुष्य कदाचित् मुक्त होईल. पण स्त्रीपुत्रादिकांनीं बांधलेला कधींहीं मुक्त होणार नाहीं.

कारण स्त्रीपुत्रादिक मुमुक्षूच्या मार्गांत विघ्न करतील. त्यांना मुमुक्षूची परमार्थांत प्रगती होणें इष्ट नसतें. त्यांना आपला स्वार्थ साधावयाचा असतो. ह्मणून हा विषयोपभोगाचा संसार त्याज्य आहे.

**पुत्रदारादिसंसारः पुंसां संमूढचेतसां।**
**विदुषां शास्त्रसंसारः सद्योगाभ्यासविघ्नकृत् ॥**

भावार्थ:—मूढ अंतःकरणाच्या पुरुषांचा पुत्रदारादि संसार उत्तम योगाभ्यासाला विघ्न करणारा असतो. पण शहाणे पुरुषांचा शास्त्रसंसार हा योगाभ्यास करितांना जीं विघ्नें येतात त्यांचा नाश करणारा आहे. ( या श्लोकांतील शेवटचें पद दोन अर्थांचें आहे. )

यास्तव देवीभागवतांत परम विरक्त शुक महाराज आपला पिता जो व्यास भगवान त्याला ह्मणतात कीं हे तात, आह्मास गृहच नको. कारण जो गृहांत शिरला तो बद्ध झालाच.

**गृण्हाति पुरुषं यस्माद् गृहं तेन प्रकीर्तितं।**
**क्व सुखं बंधनागारे तेन भीतोस्म्यहं पितः ॥**

भावार्थ:—हे पित्या! पुरुषाला धरून बद्ध करीत असल्यामुळें घराला गृह हें नांव मिळालें आहे. कारागृहांत सुख कोठून मिळणार ह्मणून मला या गृहाविषयीं भय वाटतें.

ही एक बाजू झाली, व हिचे पुरस्कर्ते मोठमोठे साधू आहेत. परंतु उलटपक्षींही मोठमोठ्या सत्पुरुषांचींही उदाहरणें सांपडतील. वसिष्ठ, अगस्ति प्रभृति महात्म्यांनीं आपले धर्मपत्नीचा त्याग केला नाहीं, असें असूनही ते कृतकृत्य झालेच. ह्मणून ज्यानें आपखुशीनें एकदां संसार स्वीकारला त्यानें तो टाकूं नये, व टाकण्याचें प्रयोजनही नाहीं. कारण गृहस्थाश्रमांत राहूनही मोक्षप्राप्ति करतां येते. जीवन्मुक्त स्थितींतही राज्याचा भार उत्तम प्रकारें वाहणारे जनकासारखे सिद्ध पुरुष आहेतच.

शिवाय सर्वांनीं जर गृहस्थाश्रमाचा त्याग केला तर साधुपुरुषांचा ही चारितार्थ कसा चालेल? सर्वांस माध्यान्ह काल आहेच. त्याचें अतिक्रमण कोणासही करवत नाहीं, व तो काल प्राप्त झाला ह्मणजे यति, ब्रह्मचारी, आदिकरून सर्व विरक्त पुरुषांस गृहस्थांवरच अवलंबून रहावें लागतें.

देवीभागवतांत श्रीव्यास शुकास ह्मणतातः—

**ब्रह्मचारी यतिश्चैव वानप्रस्थो व्रतस्थितः ।**
**गृहस्थं समुपासंते मध्यान्हातिक्रमे सदा ॥**

भावार्थः—मध्यान्हकाल झाला ह्मणजे ब्रह्मचारी, यती, वानप्रस्थ व व्रताचरण करणारे पुरुष, हे सर्वही गृहस्थाच्या आश्रयाकरतां त्याचे जवळ जातात.

गृहस्थाला आपले कुटुंबाचेंच पालन करावें लागतें असें नाहीं. त्याला वर निर्दिष्ट केलेल्या सर्वांचें आतिथ्य करून शिवाय लंगडे लुले वगैरे अनाथ प्राण्यांनाही मदत केली पाहिजे. न्यायानें धन मिळवून जो त्याचा सद्व्यय करतो, तो या सर्वांचा कल्याण करणारा असल्यामुळें त्याला अधोगती कधींच होणार नाहीं.

व्यास ह्मणतातः—

**न्यायागतधनः कुर्वन्वेदोक्तं विधिवत्क्रमात् ।**
**गृहस्थोऽपि विमुच्येत श्राद्धकृत्सत्यवाक्शुचिः ।**

भावार्थः—ज्याला न्यायानें धन मिळालें आहे, व जो वेदोक्त कर्में यथाविधि यथाक्रमानें करतो, व तसा जो श्राद्ध वगैरे करतो, व सत्य बोलतो, व जो शुचिर्भूत आहे, तो गृहस्थ असूनही मुक्त होतो.

सदाचरणी पुरुष गृहस्थाश्रमांत राहूनही बंधन पावत नाहीं, इतकेंच नव्हे, तर उलट त्याला अनेक सत्कर्में करण्यास या गृहस्थाश्रमांतच उत्कृष्ट संधि मिळते, व उत्तम रीतीनें परोपकार करतां येतो. यासाठीं गृह हें खरोखर बंधन नाहीं.

शुकास व्यास ह्मणतातः—

**न गृहं बंधनागारं बंधने न च कारणं ।**
**मनसा यो विनिर्मुक्तो गृहस्थोपि विमुच्यते ॥**

भावार्थः—गृह हें बंधनाचें ठिकाण नव्हे, व बंधनाचें कारणही नव्हे. ज्यानें मनापासून सर्व आसक्ति सोडली, तो गृहस्थ असतांही मुक्त होतो.

हा वाद अनादिकालापासून चालत आला आहे. कोणी ह्मणतात मुमुक्षूनें सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत जावें व तेथें एकांतांत योग साधावा. कोणी ह्मणतात तो गृहस्थाश्रमांत राहिला तरी हरकत नाहीं, मात्र त्यानें सर्व विषयांवरील आसक्ति सोडली पाहिजे. या प्रश्नांचा विचार रामदासस्वामींनीं मार्मिक रीतीनें दासबोधांत केला आहे.

समर्थ ह्मणतातः—

**बळेंचि अवघा त्याग कीजे । तरीच साधकू बोलिजे ॥ येथें संशयो उठिला । निस्पृह तो साधक झाला । त्याग न घडे संसारिकाला । तरी तो साधक नव्हे कीं ॥**

अशी एका समासांत शंका घेऊन, त्या शंकेचें समाधान पुढील समासांत केलें आहे.

**मागां कथिला संसारिक । त्यागेंविण नव्हे साधक । ऐका त्याचा विवेक । ऐसा असे ॥ सन्मार्ग तो जीवीं धरणें । असन्मार्गाचा त्याग करणें । संसारिका त्याग येणें । प्रकारें ऐसा ॥ कुबुद्धि त्यागाविण कांहीं । सुबुद्धि लागणार नाहीं । संसारिका त्याग पाहीं । ऐसा असे ॥ प्रपंचीं वीट मानिला । मनें विषय त्याग केला । तरीच पुढें अवलंबिला । परमार्थ मार्ग ॥ त्याग घडे संशयाचा । त्याग घडे अभावाचा । त्याग घडे अज्ञानाचा । शनैःशनैः ॥ ऐसा सूक्ष्म अंतरत्याग । उभयतांसि घडे सांग । निस्पृहासि बाह्यत्याग । विशेष घडे ॥ संसारिका ठाईं ठाईं । बाह्यत्याग घडे कांहीं ।**

मुमुक्षूंनीं विषयत्याग तर केला पाहिजे. पण प्रत्यक्ष सर्व विषयांचा त्याग करणें शक्य नाहीं. विषयांचें सेवन बिलकुल केलेंच नाहीं, तर शरीरयात्रा कशी चालेल? ह्मणून व्यवहारापुरतें विषयांचें सेवन करून त्यावरील आसक्ति सोडली ह्मणजे बस. आतां कुमार्ग व दुर्नीती यांचा त्याग तर केलाच पाहिजे, व तो निस्पृहांस व संसारिकांसही करणें भाग आहे. त्याचप्रमाणें संशय, अज्ञान, व पाखांडमत यांचा ही त्याग केला पाहिजे. पण आपलें आचरण शुद्ध ठेऊन न्यायानें विषयांचें सेवन गर्हणीय नाहीं व तें बंधकही होत नाहीं. व संसारांत राहून विषयांचें शुद्ध व नियमित सेवन करणें, हें रानांत जाऊन सर्व विषय सोडण्याचा यत्न करण्यापेक्षां सोपें, व अनेक तऱ्हेनें हितकर असल्यामुळें बहुतेकांस तेंच रुचेल. न्यायानें व सद्धर्मानें संसार करणें हें साधकाच्या मार्गांत विघ्न करणारें नाहीं. पण त्यानें विषया-

वरील आसक्ति मात्र सोडली पाहिजे; ही आसक्ति सोडणेंच फार कठीण आहे. अरण्यांत गेलें किंवा संन्यास दिक्षा घेतली ह्मणजे ती सुटतेच असें नाहीं.

भर्तृहरी ह्मणतात:—

**भिक्षाशनं तदपि नीरसमेकवारं ।**
**शय्या च भूः परिजनो निजदेहयष्टिः ।**
**वस्त्रं च जीर्णशतखंडमलीनकंथा ।**
**हा हा तथापि विषयान्न परित्यजंति ॥**

भावार्थ:–भिक्षान्न खाणें, तें देखील निरस व (दिवसांतून) एक वेळ, निजावयाचें जमिनीवर, आपला देह हाच परिवार, शंभर ठिकाणीं फाटलेलें जुनें वस्त्र, काळी व मलीन कंथा, अशी स्थिति असूनहीं विषयांस सोडीत नाहींत, अरेरे !

परमार्थाला मुख्य वैराग्याची आवश्यकता आहे. हें वैराग्य अंगीं बाणल्यावर संसार केला तरी हरकत नाहीं. पण वनांत जाऊनही जर अंतःकरणांत वैराग्य नाहीं, जर सोडून दिलेल्या संसारसुखाकडे मन पुनः पुनः धांव घेतें, तर अरण्यांत गेल्यापासून कांहीं एक फायदा न होतां उलट कदाचित् दोषच पदरीं लागेल.

**वनेषु दोषाः प्रभवंति रागिणां गृहे तु पंचेंद्रियनिग्रहस्तपः ।**
**अकुत्सिते वर्त्मनि यः प्रवर्तते विनीतरागस्य गृहं तपोवनं ॥**

भावार्थ:–जे विषयांवर लोभ ठेवतात, ते वनांत असतांनाही त्यांजवर दोषांचा पगडा बसतो. पण गृहांत राहून पंचेंद्रियांचा निग्रह करणें तप होय. जो अनिंदित मार्गानें चालतो, व ज्याची आसक्ति नाहींशी झाली आहे, त्याला गृह हेंच तपोवन होतें.

पण काय हो ! घरांत जेथें तेथें गडबड चाललेली असते. तपासारखीं

साधनें करण्यास एकांत नको काय ? असा एकांत घरांत कसा मिळेल ? घरें तर मनुष्यांनीं भरलेलीं असतात. मग घरांत राहून साधकांचें कसें चालेल ?

वसिष्ठ ह्मणतातः—

**गृहमेव गृहस्थानां सुसमाहितचेतसां ।**
**शांताहंकृतिदोषाणां विजनावनभूमयः ॥**

भावार्थः—ज्यांचें चित्त समाधानं स्थितींत आहे, व ज्यांचा अहंकाररूपी दोष नाहींसा झाला आहे, अशा गृहस्थांना गृह हेंच विजन अरण्य भूमी होतें.

शिवाय गृहांत राहून जें तप करतां येण्यासारखें आहे, तें तप सर्व तपांत श्रेष्ठ असें साधकांनीं मानावें. हेंच मुमुक्षूस परमार्थांत अत्यंत उपयोगी आहे. तें तप कोणतें ?

**मनसश्चेंद्रियाणां च ह्यैकाग्र्यं परमं तपः ।**
**तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते ।**

भावार्थः—मनाची आणि इंद्रियांची एकाग्रता हें श्रेष्ठ तप आहे, तें सर्व धर्मांपेक्षां मोठें, तोच सर्वोत्कृष्ट धर्म असें ह्मणतात.

हें तप गृहांत राहूनही साधतां येईल. शिवाय ज्ञानास आवश्यक जो विचार तो करावयासाठीं वनांत जाण्याची जरूरी नाहीं. तो संसारांत राहूनही उत्तम तऱ्हेनें करतां येतो. ह्मणूनच समर्थ ह्मणतातः—

**संसारत्याग न करितां । प्रपंच उपाधि न सांडितां । जनांमध्यें सार्थकता । विचारेंचि होय ॥**

सारांश ज्याला खरी विरक्तता व मुमुक्षुता या दोनीही प्राप्त झाल्या आहेत, त्याला संसारांतच राहून मोक्ष मिळवितां येईल. त्याला अरण्यांत जाण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. असो.

आतां साधनांचा अभ्यास वगैरे करून साधकानें या कामीं झटलें तर पाहिजेच. त्यानें स्वतः अविश्रांत श्रम तर केले पाहिजेत. पण केवळ आपलेच सामर्थ्यानें सिद्धि प्राप्त करून घेणारे पुरुष विरळा. ईश्वराची माया अशी अगाध आहे कीं बिचाऱ्या मानवी प्राण्याला स्वतःच्या जोरावर तिचा जय करणें जवळ जवळ अशक्यच आहे असें ह्मटलें तरी चालेल.

तुकाबा ह्मणतातः—

**आपुलीया अंगें तोडी मायाजाळ ।**
**ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ॥**

पण असेंच जर असलें तर बिचाऱ्या मुमुक्षूंनीं काय करावें? त्यांनीं शक्य तो प्रयत्न केला तरी तो निष्फळच जर ठरावयाचा, तर त्यांनीं आपला इष्ट हेतू साधावा तरी कसा? या संसारांतून त्यांची सुटका स्वतःच्या जोरावर होणार नाहीं, तर त्यांनीं कोणास शरण जावें? त्यांना दयाळूपणानें सहाय्य करून त्यांचा उद्धार कोण करील? या प्रश्नाचें उत्तर एकच आहे. मुमुक्षूंचा त्राता सर्व शक्तिमान परमेश्वरावांचून कोणीही नाहीं.

पंत ह्मणतातः—

**सहाय्य दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ।**
**न हो जरि उताविळा स्वरिपु कापितो हा गळा ॥**

मृत्यूपासून सोडवून अक्षय मुक्ति देणारा परमेश्वरावांचून दुसरा कोणीही नाहीं. पण परमेश्वराची भक्ति करावयाची इच्छा होण्यास-हीं पूर्व सुकृतांचा जोर पाहिजे. उगीच साधक परमेश्वराची उपासना करण्यास प्रवृत्त होत नाहीं.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥
येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणां ।
ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥
जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।
ते ब्रह्मतद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलं ॥

भावार्थः—हे शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना! इच्छा व द्वेष यांपासून उत्पन्न झालेला जो द्वंद्व मोह त्यानें या सृष्टीमध्यें सर्व भूतें मोह पावतात. परंतु ज्यांचें पाप नष्ट झालें आहे ते पुण्य करणारे पुरुष द्वंद्व मोहापासून मुक्त होऊन दृढनिश्चयानें माझी भक्ति करतात. जरा व मरण यांपासून मुक्त होण्यासाठीं जे माझा आश्रय करून यत्न करतात, त्यांना ब्रह्माचें पूर्ण ज्ञान होतें व अध्यात्मकर्मांचीं सर्व रहस्यें कळतात.

ह्मणून इतर साधनांचा अभ्यास करीत असतां मुमुक्षूंनी परमेश्वराची उपासना अनन्यभावें करून केली पाहिजे, ह्मणजे ईश्वराच्या अनुग्रहानें शमदमादिक साधनें लौकर सफल होतात, व मुमुक्षूंची परमार्थांत उत्तम प्रगती होऊन, त्यांचा इष्ट हेतू सहज सिद्धीस जातो.

ईश्वराच्या भक्तीविषयीं विस्तृत विवेचन पुढें भक्तियोगांत यथाशक्ति करावयाचें आहे. पण योग्य प्रसंगीं भक्तीच्या उपयुक्ततेसंबंधानें दिग्दर्शन करणें इष्ट दिसतें, ह्मणून तें ठिकठिकाणीं केलें आहे. या सूचनेकडे मर्मज्ञ साधक लक्ष देतील अशी आशा आहे.

आतां सूज्ञ मनुष्यानें विषयांवर लुब्ध होऊन त्यांच्या उपभोगांत आपलें आयुष्य व्यर्थ घालवूं नये, भगवद्भक्तीनें ह्मणा, किंवा साध-

नचतुष्टयाच्या दृढ अभ्यासानें ह्मणा, किंवा अन्य योग्य उपायांनीं मोक्ष मिळविण्याची खटपट अवश्य केली पाहिजे, हें जरी कबूल केलें, तरी परमार्थप्राप्तीच्या कामीं केव्हांपासून लागावें, हा प्रश्न उरतोच. त्याचा विचार केला पाहिजे.

बहुतेकांस असें वाटतें, कीं, या संसारांत येऊन त्यांतील चमत्कार पाहिले नाहींत, विषयसुखाचा अनुभव घेतला नाहीं, तर जन्मास येऊन काय उपयोग? प्रत्येक कार्य करतांना वेळा काळाचा विचार केला पाहिजे. जी गोष्ट ज्यावेळीं करणें उचित असेल त्यावेळींच ती करावी. तरुणपणांत विषयसुखाचा उपभोग पूर्णपणें घेतां येतो. मग यौवनावस्थेंत विषयांचें सेवन कां करूं नये? पुढें वृद्धपण आल्यावर इंद्रियें अशक्त व निस्तेज होतात, व विषयोपभोग जवळ जवळ अशक्यच असतो. ह्मणून ह्मातारे झाल्यावर खुशाल हरि हरि करीत बसावें, व मोक्षसाधनाचे खटपटीस लागावें, ह्मणजे स्वार्थ आणि परमार्थ हे दोन्ही साधल्यासारखें होईल; मग असें करण्यास काय हरकत आहे?

याचें उत्तर असें आहे कीं, एक तर तरुणपणींच इंद्रियदमन करण्यांत जी मातब्बरी आहे, ती ह्मातारपणीं करण्यांत नाहीं.

**पूर्वे वयसि यः शांतः स शांत इति मे मतिः।**
**धातुषु क्षीयमाणेषु शांतिः कस्य न जायते॥**

भावार्थः—पूर्व वयांतच जो शांत झाला तोच खरा शांत असें मला वाटतें. कारण धातू क्षीण झाल्यावर कोणास शांती येत नाहीं?

ज्या मनुष्यानें तरुणपणीं यथेच्छ विषयोपभोग घेतला आहे, त्यानें वृद्धपणीं जरी विरक्ति धरली, तरी ती खरी अंतःकरणपूर्वक असेलच असा नियम नाहीं. बहुशः विषयांचें सेवन करण्याचें सामर्थ्य अंगीं नसल्यामुळेंच तो त्यांचा त्याग करतो. पण त्याची विषयावरील

आसक्ति सुटली आहे, असें मात्र खात्रीनें ह्मणतां येत नाहीं. त्याचे ठिकाणीं दिसणारें वैराग्य खरें नसून तें वैराग्याभासच असण्याचा ज़ास्त संभव आहे.

पण वृद्ध मनुष्यास हें वरवर दिसणारें वैराग्य तरी होतेंच असा-ही नियम नाहीं. जरेनें सर्व शरीर व्यापलें तरी उघडपणें आशाबद्ध दिसणारे असेच पुरुष पुष्कळ असतात.

आचार्य ह्मणतातः—

**अंगं गलितं पलितं मुंडं दशनविहीनं जातं तुंडं ।**
**वृद्धो याति गृहीत्वा दंडं तदपि न मुंचत्याशापिंडं ॥**

भावार्थः—अंग गलीत झालें, डोक्यास टक्कल पडलें, तोंडांतील दांत पडून गेले, ह्मातारा हातांत काठी घेऊन चालतो, पण आशापिंड सोडीत नाहीं.

ह्मणून ह्मातारपणीं देखील कसेंबसें वैराग्य झालें तर ठीक, व खरें वैराग्य झालें तर महद्भाग्यच समजावें. पण वृद्धापकाळपर्यंत विरक्ति होण्याची वाट पहात बसणें मूर्खपणाचें काम नाहीं काय ? अहो या मृत्युलोकीं आपण ह्मातारे होईपर्यंत वांचणार याचा काय भरंवसा ? मृत्यू लहान थोर न पाहातां सर्वांस ग्रासतो, हा प्रत्यक्ष अनुभव या मृत्युलोकीं प्राणिमात्रांस आहे. तान्हीं मुलें, सशक्त तरुण, उत्साह-युक्त मध्य वयस्क पुरुष, आणि ह्मातारे या सर्वांस आप आपल्या आयुष्यमर्यादेप्रमाणें काळाच्या मुखांत बळी पडावें लागतें.

समर्थ ह्मणतातः—

**संसार ह्मणिजे सवेंचि स्वार। नाहीं मरणासी उधार। मापीं लागलें शरीर। घडीनें घडी॥ नित्य काळाची संगती। न कळे होणारा-ची गती। कर्मासारखे प्राणी पडती। नाना देशींविदेशीं॥ एक**

मृत्युमार्गीं लागले। एकीं अर्धपंथ क्रमिले। एक ते शेवटास गेले। वृद्धपणीं ॥ मृत्यू न ह्मणे बाळ तरुण। मृत्यू न ह्मणे हा सुलक्षण। मृत्यू न ह्मणे हा विचक्षण। बहु बोलका ॥ आतां असो हें बोलणें। मृत्यूपासूनि सुटिजे कोणें। मागें पुढें विश्वास जाणें। मृत्युपंथें॥

मनुष्यें कधीं मरतील याबद्दल कांहींच नियम नाहीं. ज्याच्या त्याच्या आयुष्यमर्यादेप्रमाणें जो तो हा नाशिवंत देह टाकून जातो.

विष्णुपुराणांत सांगितलें आहेः—

**जातमात्रश्च म्रियते बालभावेऽथ यौवने।**
**मध्यमं वा वयः प्राप्य वार्धक्ये वा ध्रुवा मृतिः॥**

भावार्थः—कोणी झाल्याबरोबर मरतो, कोणी बाल्यावस्थेंत, कोणी यौवनावस्थेंत, कोणी मध्य वयाचा होऊन मरतो, अखेर वृद्धपणीं तर मरण निश्चितच आहे.

अनुभवसिद्ध गोष्टीविषयीं पुराणांतील दाखले देण्यांत मतलब नाहीं. फक्त हा मुद्दा चित्तावर उत्तम रीतीनें ठसावा ह्मणून ग्रंथांचे आधार दाखविले आहेत. असो.

अशी वस्तुस्थिति असल्यामुळें, तरुणपणीं विचारशक्ति आल्यावर तरी मनुष्यानें सावध व्हावें, व विलंब न करतां आपलें सार्थक करून घेण्याकरतां शक्य ते प्रयत्न करण्यास सुरावत करावी. पण या कामीं लोकांची किती अनास्था असते, हें पाहून आश्चर्य व खेद वाटतो. हींच मनुष्यें व्यवहारांत किती दक्ष असतात! आपल्या हिताचें रक्षण करण्याकरतां किती सावध राहतात! मग परमार्थांतच त्यांनीं इतकें बेफिकीर व मंद कां असावें?

पद्यः—

**गृहे पर्यंतस्थे द्रविणकणमोषं श्रुतवता।**
**स्ववेश्मन्यारक्षा क्रियत इति मार्गोऽयमुचितः।**

नरान्गेहाद्गेहात्प्रतिदिवसमाकृष्य नयतः ।
कृतांतात्किं शंका न हि भवति रे जाग्रत जनाः ।

भावार्थः—दूर असलेल्या एखाद्या घरांत एका लहान द्रव्याच्या कणाची चोरी झाली हें ऐकून आपले घरांत संरक्षणाबद्दल बंदोबस्त केला जातो, व तसें करणें योग्यही आहे. पण प्रत्येक घरांतून रोज मनुष्यांना ओढून नेत असलेल्या मृत्यूविषयीं कोणालाही शंका वाटूं नये काय ? हे जन हो जागे व्हा.

मरणाचा विचार एकीकडेच ठेवा; कोणतेंहीं कार्य नेटानें करण्यास आरोग्याची जरूरी आहे. त्या आरोग्याबद्दल तरी मनुष्यास खात्री आहे काय ? नाहीं असें दुःखानें ह्मणावें लागतें. बिचाऱ्या प्राण्यास अनेक तऱ्हेचे रोग येऊन वारंवार हैराण करतात. व अखेर वार्धक्य दशेंत सर्व इंद्रियांची व अवयवांची शक्ति जाऊन, मनुष्यास कोणतें-हीं कार्य करण्याचें सामर्थ्य किंवा उत्साह रहात नाहीं.

ह्मणून समंजस मनुष्यानें मिळेल ती संधी अमोल्य मानून आपलें सार्थक करून घेण्याच्या कामीं सावध असावें. व अविश्रांत श्रम क-रून परमार्थांत आपली प्रगति करून घ्यावी. आजची गेलेली घडी उद्यां येणार नाहीं. तिचा जर सद्व्य झाला नाहीं, तर आयुष्याचा तितका भाग व्यर्थ गेला असें समजावें. "आज तर चैन करूं या. उद्यां परमार्थाचा विचार करूं," हें ह्मणणें मूर्खपणाचें आहे. उद्यां आपली काय स्थिति होईल हें कोणासही सांगतां येण्यासारखें नाहीं. आकस्मिक रोगानें शरीर क्षीण झालें, अथवा मानसिक दौर्बल्य प्राप्त झालें, अथवा मृत्यूच आला तर एक जन्म व्यर्थ गेला असें होईल.

ह्मणून भर्तृहरी ह्मणतातः—

यावत्स्वस्थमिदं शरीरमरुजं यावज्जरा दूरतः ।
यावच्चेंद्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः ।

**आत्मश्रेयसितावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्।**
**संदीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः ॥**

भावार्थः—जोंपर्यंत हें शरीर निरोगी आणि स्वस्थ आहे, जोंपर्यंत ह्मातारपण अजून दूर आहे, जोंपर्यंत इंद्रियांची शक्ति कायम आहे, जोंपर्यंत आयुष्याचा क्षय झाला नाहीं, तोंच शहाण्या मनुष्यानें आपलें कल्याण करून घेण्यासाठीं मोठा प्रयत्न केला पाहिजे. घराला आग लागल्यावर विहिर खणण्यास लागणें याचा काय उपयोग होणार ?

समर्थ ह्मणतातः—

**काळ जातो क्षणक्षणा । मूळ येईल मरणा ॥**
**कांहीं धांवाधांव करी । जंव तो मृत्यू आहे दूरी ॥**
**देह आहे जाई जिणें । भुललासि कोण्या गुणें ॥**
**मायाजाळीं गुंतलें मन । परि दुःखासी कारण ॥**
**अंतकाळ येतो येतां । तेथें नये चुकवितां ॥**
**अकस्मात लागे जावें । कांहीं पुण्य आचरावें ॥**

आतां अखेरचा एक प्रश्न राहिला. मुमुक्षूनें मोक्षासाठीं यत्न करावा हें समजलें. पण हा मोक्ष मिळतो तरी कोठें ? स्वर्गादि पुण्यलोकांत मिळावयाचा असें ह्मटलें तर तेथील भोग अत्युत्तम असले तरी नाशिवंत व ह्मणूनच त्याज्य असें ठरलें आहे. मग हा मोक्ष पाताळांत मिळतो काय ?

वसिष्ठ ह्मणतातः—

**न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले ।**
**सर्वाशासंक्षये चेतःक्षयो मोक्ष इतीष्यते ॥**

भावार्थः—मोक्ष हा आकाशाच्या पृष्टभागीं नाहीं, पातालांत नाहीं,

भूतलावर नाहीं. सर्व आशांचा क्षय झाला ह्मणजे चित्ताची जी लीन स्थिति तोच मोक्ष होय.

उत्तम साधकाला जी मुक्ति मिळावयाची ती याच जन्मीं, याच देहांत असतांना मिळते. या संसारदुःखांतून सुटून ब्रह्मानंद या भूलोकीं जिवंत असतांच तो अनुभवितो.

बृहदारण्यकोपनिषदांत ह्मटलें आहेः—

**यदा सर्वे प्रमुच्यंते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥**

भावार्थः—जेव्हां मनुष्याच्या अंतःकरणांत असलेल्या सर्व इच्छा तो अगदीं सोडून देतो, तेव्हां तो अमर होतो; व येथेंच त्याला ब्रह्मप्राप्ति होते.

ब्रह्मप्राप्ति झाली कीं सर्व दुःखांची हानी होते, व ब्रह्मानंदांत प्राणी निमग्न असतो. या उत्तम व स्पृहणीय स्थितीस जीवन्मुक्ति असें ह्मणतात. कृतकृत्य झालेल्या साधकास प्रथम जीवन्मुक्ति प्राप्त होते. अशा उच्च स्थितीस मनुष्य पोहोंचला आहे, हें कशावरून समजावें ? जीवन्मुक्ताचीं लक्षणें कोणतीं ?

वसिष्ठ ह्मणतातः—

**यथास्थितमिदं यस्य व्यवहारवतोऽपि च ।**
**अस्तं गतं स्थितं व्योम स जीवन्मुक्त उच्यते ॥**

भावार्थः—हें सर्व जगत आहे तसें असूनही व त्यांत व्यवहार करीत असतांही ज्याला अस्तंगत झाल्याप्रमाणें भासतें, व एक चिदाकाशच ज्याला सर्वत्र अवशिष्ट राहिलेलें दिसतें, त्याला जीवन्मुक्त असें ह्मणावें.

हें सर्व अफाट जग जसेंच्या तसें असतांही, व त्यांत उत्तम प्रकारें

तो व्यवहार करीत असतांही, ज्याला स्वप्नाप्रमाणें मिथ्या भासतें, व एक स्वयंप्रकाश आत्मरूप ज्याला सर्वत्र स्वानुभवानें दिसतें त्याला दुःख कोठें राहिलें? ऐहिक सुख व दुःख हीं दोन्ही त्यानें खोटीं ठरविलीं, ह्मणून त्या दोहींपासून त्याला हर्ष किंवा शोक होत नाहीं.

वसिष्ठ ह्मणतात:—

**नोदेति नास्तमायाति सुखदुःखैर्मुखप्रभा ।**
**यथा प्राप्ते स्थितिर्यस्य स जीवन्मुक्त उच्यते ॥**

भावार्थ:—सुखांनीं ज्याची मुखप्रभा विकसित होत नाहीं व दुःखांनीं फिक्की पडत नाहीं, जी प्राप्त होईल त्या स्थितींत जो राहतो त्याला जीवन्मुक्त ह्मणावें.

तितिक्षेचा उत्तम अभ्यास केलेला साधक आणि जीवन्मुक्त यांजमध्यें मोठा फरक आहे तो हा कीं साधकास अजून आत्मसाक्षात्कार झाला नसल्यामुळें ब्रह्मानंदाची गोडी समजलेली नसते, व त्या ब्रह्मानंदांत तो निमग्न नसतो.

पण जो व्यवहारांत वागतो, त्याला कधीं राग आला पाहिजे, कधीं आवड उत्पन्न झाली पाहिजे, कांहीं उपद्रवी प्राण्यांविषयीं द्वेष उत्पन्न झाला पाहिजे, व भयही झालें पाहिजे, मग त्याचें अंतःकरण शांत कसें राहील?

वसिष्ठ ह्मणतात:—

**रागद्वेषभयादीनामनुरूपं चरन्नपि ।**
**योऽन्तर्व्योमवदत्यच्छः स जीवन्मुक्त उच्यते ॥**

भावार्थ:—आवड, द्वेष, आणि भय ह्या विकारांनुरूप वर्तन करीत असतांही, जो आंत आकाशाप्रमाणें अति स्वच्छ असतो, त्याला जीवन्मुक्त ह्मणतात.

सर्व व्यवहार देहासंबंधीं असतो, तो देह मी नव्हे, मी परब्रह्म-स्वरूपी आत्मा आहें, अशी ज्याची खात्री झाली, तो देहसंबंधीं सुखदुःख सर्व परक्याचें आहे, माझें नव्हे, असेंच समजणार. ह्मणून व्यवहार करीत असतांही तो शांत असतो.

वसिष्ठ ह्मणतातः—

**यः समस्तार्थजातेषु व्यवहार्यपि शीतलः ।**
**परार्थेष्विव पूर्णात्मा स जीवन्मुक्त उच्यते ॥**

भावार्थः—जो समस्त पदार्थसंबंधानें व्यवहार करीत असतां, जसा दुसऱ्यांसाठीं काम करीत असतां मनुष्य उद्विग्न होत नाहीं, जसा थंड असतो, व ज्याचें मन पूर्णपणें तृप्त झालेलें असतें, त्याला जीवन्मुक्त ह्मणावें.

यांतलें इंगित हें कीं ज्ञानी आपण आत्मस्वरूपी आहे असा निश्चय करून, मायेशीं आपला संबंध बिलकुल नाहीं, हें नेहमीं ध्यानांत ठेवतो. असें झाल्यावर त्याला मायेपासून लाभही नाहीं व तोटाही नाहीं.

पंचदशींत ह्मटलें आहेः—

**मायामेघो जगन्नीरं वर्षत्वेष यथा तथा ।**
**चिदाकाशस्य नो हानिर्नवालाभ इति स्थितिः ॥**

भावार्थः—हा मायारूपी मेघ नीराप्रमाणें या जगताचा वर्षाव करो. त्यांत आकाशरूपी आत्म्याला लाभही नांहीं, व तोटाही नाहीं अशी खरी स्थिति आहे.

ज्याप्रमाणें कितीही ढगें येऊन मोठा पाऊस पडला, तरी आकाश जसेंच्या तसेंच राहतें, त्याप्रमाणें जग उत्पन्न होवो, अथवा नाश पावो, आत्मा जसाच्या तसा राहणार. असो. जिवन्मुक्ताचा आत्मा

जरी अमर असला तरी देह नाशिवंत असल्यामुळें तो नाश पावणार. देह पडल्यावर जिवन्मुक्ताला विदेह मुक्ति मिळून तो ब्रह्मस्वरूपीं लीन होतो.

वसिष्ठ ह्मणतातः—

**जीवन्मुक्तपदं त्यक्त्वा स्वदेहे कालसात्कृते ।**
**विशत्यदेहमुक्तत्वं पवनोऽस्पंदतामिव ॥**

भावार्थः—देहाचा अंत झाल्यावर जीवन्मुक्तीचें पद टाकून ( सिद्ध पुरुष ) विदेह मुक्तींत प्रवेश करतो. जसा वारा जागच्या जागीं स्वस्थ होतो तसा.







# परमार्थपर व्याख्यानमाला.

१

## सत्संग.

साधनचतुष्टयांच्या अभ्यासाला किती कष्ट करावे लागतात, व तो किती कठीण आहे हें सर्वांच्या लक्षांत आलें असेलच. या सृष्टींतील सर्व मोहक पदार्थांवरील आसक्ति सोडून देणें, मनाचा व इंद्रियांचा निग्रह करणें, आलेलीं सर्व दुःखें निमुटपणें सोसणें, हें फार धैर्याचें व निश्चयाचें काम आहे. साधनांचा अभ्यास करतांना महान महान ऋषीनांही अनेक वेळां हार खावी लागली आहे. मग विचाऱ्या आधुनिक सांसारिकांची काय कथा ?

ह्मणून येवढें साहसाचें काम आपल्या हातून कसें पार पडेल याबद्दल साशंक होऊन, "मोक्षप्राप्तीचा एखादा सुलभ उपाय आह्मास सांगा" अशी विनंती करणाऱ्या मुमुक्षूंनां तुकोबाराय उपदेश करतातः—

**करी मस्तक ठेंगणा । लागे संतांच्या चरणा ॥**

संतांस शरण जाऊन त्यांचे संगतींत काळ घालवावा, त्यांची सेवा करावी, ह्मणजे त्यांचे अनुग्रहानें मुमुक्षूचें कार्य सहज होईल, व त्याला येवढा सायास करण्याची आवश्यकता राहाणार नाहीं.

आचार्य ह्मणतातः—

**क्षणमपि सज्जनसंगतिरेका ।**
**भवति भवार्णवतरणे नौका ॥**

भावार्थः—सज्जनांची संगती जर एक क्षणही मिळाली तर ती एकटीच हा भवसागर तरून जाण्यास नौका होते.

संत संगतीचा महिमा इतका आहे कीं, त्याचें यथार्थ वर्णन करणें शक्य नाहीं. सत्संगें करून महापाप्यांचाही उद्धार होतो, अभाविकांला श्रद्धा उत्पन्न होऊन ते परमार्थसाधन करूं लागतात, व दुष्ट पुरुषांना उपरती होऊन ते कुमार्गाचा त्याग करतात, व सन्मार्गानें चालूं लागतात.

एकनाथ स्वामी ह्मणतातः—

**संतांचे संगती । पाप नुरे तें कल्पान्तीं ।। ऐसा संतांचा महिमा । नाहीं द्यावया उपमा ।। तीर्थव्रतजपदान । अवघें टाका ओंवाळून ।।**

त्याचप्रमाणेंः—

**संत सांगात घडे । ब्रह्म सायुज्यता जोडे।। मुक्ति लागती चरणीं । ब्रह्मज्ञान लोटांगणी ।। एका जनार्दनीं सांगात। घडतां होय देहातीत ।।**

सत्संगापासून जो उत्तम लाभ होतो त्याजबद्दल विचार करण्याचे पूर्वीं कोणत्याही संगतीपासून मनुष्यास काय लाभ किंवा हानी होते तें पाहिलें पाहिजे.

एका राजानें आपल्या प्रधानास प्रश्न केला कीं, मनुष्य सद्गुणी अथवा दुर्गुणी कशानें होतो ? प्रधानानें उत्तर दिलें "महाराज मुख्यत्वेंकरून बऱ्या वाईट संगतीच्या योगानें." राजा ह्मणाला असें कसें होईल ? मनुष्याचे अंगीं गुणदोष जन्मतःच उत्पन्न होतात व ते स्वभावतःच विकसित होतात. मग ते त्याच्या पूर्वजांपासून चालत आले ह्मणा, किंवा ते त्याच्या गतजन्मार्जित शुभाशुभकर्मा-

नुसार प्राप्त झाले असें ह्मणा. पहा चिंचेच्या झाडापासून चिंचच उत्पन्न होते. त्या झाडाला कधींतरी आंबे येतील काय? किंवा आंब्याच्या झाडाला चिंच लागली आहे असें कधींतरी होईल काय?

प्रधानानें उत्तर दिलें महाराज ह्मणतात तें बरेच अंशीं खरें आहे हें मी कबूल करतों. मनुष्याचा बराच स्वभाव निसर्ग सिद्धच असतो. तरी संगतीपासूनही त्याजवर पुष्कळ परिणाम होतो. संगतीमुळेंच मनुष्यास उच्चगति मिळते, अथवा अधोगतीसही जावें लागतें. फार तर काय त्याच निर्जीव वस्तूसही भिन्न भिन्न संगतीमुळें भिन्न भिन्न दशा प्राप्त होतात.

पहाः—

**संतप्तायसि संस्थितस्य पयसो नामापि न ज्ञायते।**
**मुक्ताकारतया तदेव नलिनीपत्रस्थितं राजते।**
**स्वात्यां सागरशुक्तिमध्यपतितं तज्जायते मौक्तिकं।**
**प्रायेणोत्तममध्यमाधमगुणाः संवासतो जायते॥**

भावार्थः—तापलेल्या लोखंडावर पडलेल्या पाण्याचें नांवसुद्धां राहात नाहीं. तेंच पाणी कमलाच्या पानावर पडलें तर त्याला मोत्यांचा आकार व शोभा येते. स्वाती नक्षत्रांत जर तेंच पाणी समुद्रांतील शिंपींत पडलें तर त्याचें मोतीं बनतें. सारांश उत्तम, मध्यम व कनिष्ट गूण बहुतकरून सहवासानेंच प्राप्त होतात.

राजा ह्मणाला "प्रधानजी, एवढ्यानें माझें समाधान व्हावयाचें नाहीं. कारण याच्या उलटही अनुभव जगामध्यें येतोच आहे. "कडू कारलें तुपांत तळलें, साखरेंत घोळलें, तरी कडू तें कडूच" ही ह्मण आपण विसरलांत काय? आणखी पहाः—

**असाधुः साधुर्वा भवति खलु जात्यैव पुरुषः।**
**न संगाद्दौर्जन्यं न च सुजनता कस्यचिदपि।**

**समाने संसर्गे मणिभुजगयोर्जन्मजनिते ।**
**मणिर्नाहेर्दोषान्स्पृशति न च सर्पो मणिगुणान् ॥**

भावार्थः—मनुष्य बरा किंवा वाईट जात्याच होतो. संगतीपासून कोणालाही दुर्जनता, अथवा भलेपणा येत नाहीं. जन्मापासून सर्पाचा व त्याचे मण्याचा सारखा निकट संबंध असूनही, सर्प मण्याचे गुण घेत नाहीं, व मणीही सर्पाचे दोषास शिवत नाहीं.

हें राजाचें उत्तर ऐकून प्रधान ह्मणाला, महाराजांनीं मला आज निरुत्तर केलें आहे, पण कांहीं दिवसांची मुदत यासंबंधानें मिळाल्यास महाराजांची खात्री करतां येईल. राजानें बरें ह्मटल्यावर ती गोष्ट तशीच राहिली.

पुढें कांहीं दिवसांनीं राजा पारधी मंडळी बरोबर घेऊन मृगयेस गेला. प्रधानही स्वारींत होता. तो अर्थातच राजाचे जवळच चालत होता. मृगया करीत असतां एके जनावराचा पाठलाग करीत राजा व प्रधान एकीकडे गेले, व बरोबरची मंडळी शिकारीच्या धामधुमींत दुसरीकडे चालती झाली. अशी चुकामूक झाल्यावर मृगयेच्या श्रमामुळें राजास फार तहान लागली. पण पाणी कोठें मिळेना. ह्मणून शोध करीत ते दोघे एका चोरांच्या छावणीकडे जाऊन पोहोंचले.

प्रधानानें आसपास पहातांच त्याला संशय आला, व तो ह्मणाला "महाराज येथून जलदी चलावें. येथें दगा दिसतो." पण राजास तृषेमुळें कांहीं सुचेना. येथें एकदाचें पाणी प्यावयास मिळेल या आशेनें तो तसाच पुढें जाऊं लागला. तों एका झाडास एक राघूचा पिंजरा टांगलेला त्याच्या दृष्टीस पडला. राघूनें राजास पाहातांच तो मोठ्यानें ओरडूं लागला, व "बांधो, पकडो, काटो," असें पुनः पुनः ह्मणूं

लागला. हें ऐकून राजाची खात्री झाली कीं, आतां येथें राहून उपयोग नाहीं. मग ते दोघेही तेथून हळूच चालते झाले.

पुढें कांहीं वेळ चालल्यावर त्यांना एक पायवाट सांपडली, व त्या वाटेनें ते एका पुण्याश्रमानजीक येऊन पोहोंचले. तेथेंही एका वृक्षास राघूचा पिंजरा टांगला होता. साशंक होऊन मागें पाऊल काढणार तों त्या पिंजऱ्यांतील राघूनें राजास पाहिलें, व मधुर स्वरानें बोलं लागला " यावें महाराज, बसावें, आपले येण्यानें हा आश्रम पवित्र झाला."

राजास हें ऐकून फार चमत्कार वाटला, आणि त्या राघूकडे पहात तो उभा राहिला. इतक्यांत राघूनें शिष्यांस हांक मारली व ह्मणाला " अतिथी आले आहेत त्यांचें नीट स्वागत करा." शिष्य मंडळी धांवत येऊन, त्या दोघांचेंही उत्तम आदरातिथ्य केलें, व राजास थंड पाणी प्यावयास दिलें, व उत्तम वनफळें खाण्यासाठीं पुढें ठेविलीं. क्षुधा तृषा शांत झाल्यावर राजानें त्या शिष्य मंडळीस सर्व वृत्तांत सांगितला आणि प्रश्न केला कीं, या दोन राघूंत हा फरक कसा? शिष्य ह्मणाला, " या राघूवर आमचे गुरूंची कृपा आहे. त्यालाच आपण विचारावें ह्मणजे तोच उत्तर देईल." राजानें राघूस प्रश्न करतांच, तो राघू उत्तर देतो:—

**गवाशनानां स शृणोति वाक्यमहं तु राजन्मुनिसत्तमानां ।**
**न तस्य दोषो न च मद्गुणो वा संसर्गजा दोषगुणा भवंति ॥**

भावार्थः—हे राजा त्याला गोमांस भक्षण करणाराचे बोल ऐकावे लागतात. पण मला श्रेष्ठ मुनींचे शब्द ऐकावयास मिळतात. यांत त्याचा दोषही नाहीं, व माझा गुणही नाहीं. कारण गुण किंवा दोष संगतीनें उत्पन्न होतात.

हें ऐकून राजाचें समाधान झालें व प्रधानाचें बोलणें त्यानें मान्य केलें. असो.

संगतीनें नफा तोटा काय होतो, हें आपण पाहिलें. आतां संत खरोखर कोणास ह्मणावें, संत कसे असतात, त्यांस कसें ओळखावें, या सर्व गोष्टींसंबंधानें विचार केला पाहिजे. साधु किंवा संत ही अत्युच्च संज्ञा औपचारिक रीतीनें सर्वांना देण्यांत येते. व कांहीं लोक तर दुसऱ्यानें ह्मणण्याची वाट न पाहतां आपणासच साधू ह्मणवून घेतात. पण खरे संत अथवा साधू कोण ?

या प्रश्नाचें उत्तर समर्थ दासबोधांत देतातः—

**जो जाणेल भगवंत। तया नाम ह्मणिजे संत। जो शाश्वत आणि अशाश्वत। निवाडा करी ॥ जो जनामध्यें वागे। परि जनावेगळी गोष्ट सांगे। ज्याचे अंतरीं ज्ञान जागे। तोचि साधु ॥ जाणिजे परमात्मा निर्गुण। तयासीचि ह्मणिजे ज्ञान। त्यावेगळें तें अज्ञान। सर्व कांहीं ॥**

याप्रमाणें पूर्ण ज्ञान होऊन ज्यांना ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे, त्यांनाच संत ही पदवी शोभते. अशा महात्म्यांस सिद्ध पुरुषही ह्मणण्याचा प्रघात आहे. या अनुभवी साधुपुरुषांचा महिमा अगाध आहे. त्यांची स्वतःची निष्ठा निर्गुण ब्रह्मावर बसून ते स्वतः ब्रह्मानंदांत निमग्न असतात, इतकेंच नव्हे, तर इतर जनांवर अनुग्रह करून त्यांसही आपल्या योग्यतेसच चढवून घेण्याचें सामर्थ्य त्यांचे अंगीं असतें.

समर्थ संतांची स्तुति करितातः—

**आतां वंदीन संतसज्जन। जे परमार्थ अधिष्ठान। जयांचेनि गुह्यज्ञान। प्रगटे जगीं ॥ जे वस्तू परम दुर्लभ। जयाचा अल-**

**भ्य लाभ । तेचि होय परम सुलभ । सत्संगें करोनि ॥ सोळा कळापूर्ण शशी । तो दाखवूं शकेना वस्तूशीं । तीव्र आदित्य कळाराशी । तोही दाखवीना ॥**

सूर्याच्या उजेडानें या जगांतील सर्व वस्तू दिसतात. पण परब्रह्माला सूर्य प्रकाशित करित नाहीं, व दुसरा कोणताही तेजोमय पदार्थ प्रकाशित करूं शकत नाहीं. ह्मणून त्यांच्या उजेडानें सद्वस्तू पहातां येत नाहीं.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यं गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥**

भावार्थः—त्याला सूर्य प्रकाशित करून दाखवूं शकत नाहीं, चंद्रही नाहीं, व अग्नीही नाहीं. जें प्राप्त झाल्यावर पुनर्जन्म नाहीं, तेंच माझें श्रेष्ठ स्थान.

सद्वस्तू पहाण्याचे कामीं या सर्व तेजोमय पदार्थांचा तिळमात्रही उपयोग होत नाहीं, इतकेंच नाहीं तर, दुसरे कोणतेही साधनानें ती दिसण्यासारखी नाहीं. पण अशी सूक्ष्म वस्तूही हे संत आपल्या शिष्याचे अनुभवास आणून देतात.

समर्थ ह्मणतातः—

**वेदें प्रकाशिलें सर्वही । वेदरहित कांहीं नाहीं । तो वेद कोणासही । दाखवूं शकेना ॥ तेचि वस्तू सत्संगें । स्वानुभवें कळों लागे । त्यांचा महिमा वचनीं सांगे । ऐसा कवण ॥ महाराजे चक्रवर्ती । झाले आहेत पुढती होती । परि कोणी सायुज्य मुक्ती । देणार नाहीं ॥ जें त्रैलोक्यीं नाहीं दान ।**

**तेचि करिती संतसज्जन । तयां संतांचें महिमान । काय ह्मणोनि सांगावें ॥**

वेद अनेक वेळ वाचले, अथवा पाठ केले, तरी गुरू उपदेशाशिवाय नुसते वेद वाचून साधक कृतार्थ होणार नाहीं. ह्मणून ज्यांच्या अनुग्रहानें सद्वस्तू प्राप्त होते, त्यांची महती काय वर्णावी. मनुष्य कितीही विद्वान् असला, मोठा पंडित असला, शास्त्रज्ञ असला, वैदिक असला तरी तो अनुभवी सिद्ध पुरुषांची बरोबरी कधींही करूं शकणार नाहीं.

तुकोबा ह्मणतातः—

**संतांचा महिमा तो बहू दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ बहू दुधड झाली जरी म्हैसगाय। तरि होइल काय कामधेनू ॥ तुका ह्मणे अंगें व्हावें तें आपण। तरिच महिमान येईल कळों ॥**

साधकास सत्संगांत राहून अपरोक्षानुभूतीची अमोल्य देणगी त्यांच्या अनुग्रहानें प्राप्त करून घ्यावयाची असते. खऱ्या साधकास याशिवाय दुसरी कोणतीच अपेक्षा नसते. पण निरिच्छ न झालेल्या सांसारिकांस सत्संगापासून व्यवहारदशेंत उपयुक्त असे लाभ होतातच. व अशा संबंधानेंही सत्संगाची बरोबरी कोणाच्यानेंही करवणार नाहीं.

**कल्पद्रुमः कल्पितमेव सूते सा कामधुक्कामितमेव दोग्धि ।**
**चिंतामणिश्चिंतितमेव दत्ते सतां हि संगः सकलं प्रसूते ॥**

भावार्थः—ज्या वस्तूची कल्पना करावी तीच वस्तू कल्पवृक्ष देतो. कामधेनू इच्छिलेलेंच प्रसवते. चिंतामणी जें चिंतावें तेंच देणार. पण संतांच्या संगतीनें सर्व कांहीं मिळतें.

सत्संगतींत राहून तुच्छ ऐहिक भोग प्राप्त करून घेणें ह्मणजे चिंतामणि मिळाल्यावर चिंध्या मागण्यासारखें मूर्खपणाचें कृत्य आहे. खरा साधक यांत लुब्ध न होतां कृतकृत्य होण्याचाच यत्न करील. असो.

खरे संत कोणास ह्मणावें हें ध्यानांत आलें. त्यांचा महिमा अगाध आहे हेंही समजलें. पण अमुक एक पुरुष संत आहे किंवा नाहीं हें ओळखावें कसें हा महत्वाचा प्रश्न शिल्लक राहिला आहे. लोक ज्यांस साधु ह्मणतात असे, व आपणास साधु ह्मणविणारे असे असंख्य पुरुष आहेत. पण यांतील खरा अनुभवी सिद्ध कोण याचा निश्चय कसा करावा ? ज्यांस ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे तेच खरे साधु हें सर्वांस कबूल आहे. पण कोणास खरा अनुभव प्राप्त झाला आहे व कोणास नाहीं, हें बिचाऱ्या साधकानें कसें ठरवावें ?

समर्थ ह्मणतातः—

**ज्ञानी ओळखावा ज्ञानेश्वरें । योगी ओळखावा योगेश्वरें ॥**

हें खरें, पण ज्याला अजून ज्ञान झालें नाहीं, त्यानें ज्ञानदाता सद्गुरु कसा ओळखावा ? याचें उत्तर येवढेंच देतां येतें कीं, साधकांनीं खरे संतांस ओळखावयाचीं लक्षणें ह्मणजे, त्या संतांचें शुद्ध आचरण, त्यांचे ठायीं असलेला कामादि विकारांचा अभाव, व त्यांचे अंगीं असलेले अनेक सद्गुण, हींच होत. याशिवाय साधकदशेंत तरी आपली खात्री करून घेण्यास अन्य साधन नाहीं.

समर्थ ह्मणतातः—

**अंतरीं गेलिया अमृत । बाहेरी काया लखलखीत । अंतरीं स्थिती बाणतां संत । लक्षणें कैसीं ॥ झालें आत्मज्ञान बरवें । हें कैसेनि पां जाणावें । ह्मणोनि बोलिलीं स्वभावें । साधु लक्षणें ॥ राज्यीं बसतां अवलीळा । अंगीं बाणे राज्यकळा । स्वरूपीं**

लागतां जिव्हाळा । लक्षणें बाणती ॥ स्वरूपीं बांधता कल्पना। तेथें कैंची उरेल कामना। या लागीं साधुजना। कामचि नाहीं ॥

पण काय हो, असें असलें तर सर्वसंगपरित्याग करून भगवें वस्त्र परिधान करणारास साधू ह्मणतां येईल. पण मग जनकादिकांची काय वाट? त्यांना तर राज्यश्री भोगावयाची. ती ते इच्छेशिवाय कशी भोगीत असत? याचें उत्तर असें आहे कीं, जीवन्मुक्त स्थिति जरी सुदैवानें प्राप्त झाली, तरी प्रारब्धाचा नाश होत नाहीं. देह पडेपर्यंत प्रारब्धप्राप्त सुखदुःख भोगलेंच पाहिजे. त्याशिवाय सुटका नाहीं. तरी पण हे ज्ञानी पुरुष विरक्त असल्यामुळें सुखोपभोग कंटाळूनच घेतात.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहे:—

**प्रारब्धकर्मप्राबल्याद्भोगेष्विच्छा भवेद्यदि ।**
**क्लिश्यन्नेव तदाप्येष भुक्ते विष्टिगृहीतवत् ॥**

भावार्थ:—प्रारब्धकर्माच्या प्राबल्यामुळें जरी भोगांची इच्छा झाली तरी हा (ज्ञानी) वेठीस धरलेल्या मनुष्याप्रमाणें त्रासूनच भोग घेतो.

प्रारब्धाप्रमाणें मनुष्य श्रीमंत असला, पुत्रदारादिकांनीं परिवृत्त असून संसार करीत असला, तरी तो सिद्ध नाहीं असें समजूं नये. त्याला जर खरें ज्ञान झालें आहे तर तो सिद्ध आहेच. अशा पुरुषाला प्रारब्धप्राप्त संसार टाकून देतां येत नाहीं. ह्मणूनच राजा गोपीचंदावर अनुग्रह झाल्यावर त्याचे गुरू जालंदरनाथ यांनीं त्याला प्रथम भिक्षा मागून तीर्थाटन करण्यास पाठविलें. नंतर तेथून परत आल्यावर त्याच्या वैराग्याविषयीं खात्री होऊन गुरूंनीं त्याला आज्ञा केली कीं, "तुझे प्रारब्धांत राज्यभोग आहेत, ते तुजसाठीं कोण भोगणार? यास्तव जा आणि माझ्या आज्ञेनें राज्यकारभार चालीव." बिचारा गोपीचंद

राजा निरुपाय होऊन राज्यांत परत गेला, आणि खिन्न मनानें राज्योपभोग भोगूं लागला.

त्याचप्रमाणें:—

**भुंजाना वा अपि बुधाः श्रद्धावंतः कुटुंबिनः ।**
**नाद्यापि कर्म नश्छिन्नमिति क्लिश्यति संततं ॥**

भावार्थः—श्रद्धावंत ज्ञानी सांसारिक असल्यामुळें (प्रारब्धप्राप्त) भोग भोगींत असतांही आमचें कर्म अजून नष्ट झालें नाहीं ह्मणून कष्टी होतात.

वाहावा! ज्ञान्यालाही क्लेश आहेतच तर. मग ज्ञान्यांत आणि अज्ञान्यांत फरक तो काय? सर्व क्लेश नाहींसे करण्या करतां तर इतकी खटपट.

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहे:—

**नायं क्लेशोऽत्र संसारतापः किंतु विरक्तता ।**
**भ्रांतिज्ञाननिदानो हि तापः सांसारिकः स्मृतः ॥**

भावार्थः—हा क्लेश संसारसंबंधानें ताप नव्हे, तर संसारावरील वैराग्य असें समजावें. कारण संसारसंबंधी खरा ताप हा भ्रांतीपासून उत्पन्न होतो असें सांगतात.

संसार खरा आहे, त्यांतच कायतें श्रेय आहे, मला यांतील सुख पाहिजे, दुःख नको, मी यांतच धन्य होईन, असें मानणाऱ्या संसारिकांस संसारांतील दुःखापासून खरा ताप होतो. ज्ञान्यास तसा ताप बिलकुल नसतो. फक्त विरक्त असल्यामुळें त्याला भोग मनापासून आवडत नाहींत, व त्यांचा कंटाळा येतो. असो. पण हा कंटाळा करून व्यवहारांत काय उपयोग?

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**विवेकेन परिक्लिश्यन्नल्पभोगेन तृप्यति ।**
**अन्यथाऽनंतभोगेऽपि नैव तृप्यति कर्हिंचित् ॥**

भावार्थः—विवेकानें खिन्न होत असल्यामुळें तो थोड्या भोगानेंच तृप्त होतो. नाहीं तर अनंत भोग भोगूनही मनुष्य कधीं तृप्त होत नाहीं.

याप्रमाणें श्रीमंत असो अथवा दरिद्री असो, खऱ्या ज्ञानी पुरुषानें कामाचा ह्मणजे इच्छेचा त्याग केलेला असतो. त्याचप्रमाणें त्यानें क्रोध, मोह मत्सरादि षड्रिपूंचें दमन करून या सर्व दुष्ट विकारांपासून तो मुक्त असतो.

एकनाथ स्वामी ह्मणतातः—

**धन जयासि मृत्तिका । तोचि जगीं साधू देखा ॥**
**ज्यासि नाहीं लोभ आशा । तोचि प्रिय जगदीशा ॥**
**निवारिले क्रोधकाम । तोचि जाणा आत्माराम ॥**

ज्याप्रमाणें साधूचे अंगीं विरक्ति असून ते दुष्टविकाररहित असतात, त्याचप्रमाणें त्यांचे अंगीं शांति, क्षमा, दया वगैरे अनेक सद्गुण असतात. या तीनही लक्षणांचें नामदेवांनीं थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहेः—

**देखिलिया धन मृत्तिकेसमान । नवविध रत्नें जैसे धोंडे ॥**
**कामक्रोध दोघे घातले बाहेरी । शांतिक्षमा घरीं राबवीत ॥**
**तोचि संतसाधू ओळखावा निका। येर ते आइका मायाबद्ध ॥**

साधूंचे अंगीं जे अनेक सद्गुण असतात, त्यावरूनही यांची ओळख, विचारवान साधकास पटण्यासारखी आहे. संतांचे सद्गुण अनेक असल्यामुळें त्या सर्वांचें वर्णन या व्याख्यानांत करणें शक्य नाहीं.

ह्मणून साधकांस व इतर सर्व जगास सुखदायक व कल्याणप्रद अशा कांहीं गुणांचा येथें विचार केला आहे.

( १ ) स्वार्थत्याग व भूतदया:—सर्व सद्गुणांत भूतदया ही श्रेष्ठ मानिली आहे. ज्या विरक्त महात्म्यांना आपला कोणताच स्वार्थ साधावयाचा राहिला नाहीं, त्यांच्या अंत:करणांत अर्थातच भूतदया विकास पावते. भूतदया व स्वार्थत्याग हे सद्गुण एकीकडे वास करून एकमेकांचें पुष्टीकरण करतात.

सत्पुरुषांस स्वत: कोणतेही ऐहिक सुखाची अपेक्षा जरी नसते, तरी ते दुसऱ्याकडे करुणार्द्र अंत:करणानें नेहेमीं पहात असतात. सर्व प्राणिमात्रांस सुख व्हावें, त्यांचीं सर्व दु:खें नाहींशीं व्हावीं, अशीच सत्पुरुषांची इच्छा असते, व ती इच्छा सफल करण्यासाठीं त्यांचा नेहेमीं यत्न सुरू असतो, व या कामीं स्वार्थत्याग करण्यासही ते कबूल असतात.

भर्तृहरी ह्मणतात:—

**तेऽमी सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थं परित्यज्य ये ।**

भावार्थ:—आपल्या स्वार्थाचा त्याग करूनही जे दुसऱ्याचा कार्यभाग साधून देतात, ते सत्पुरुष होत.

आतां ही दया करतांना चांगला मनुष्य पाहून त्याजवर मात्र उपकार करावयाचा, एखाद्या अधमावर नाहीं, असें मात्र समजूं नये. संतांस लहान थोर, किंवा उत्तमाधम हा भेद मुळींच करावयाचा नसतो. सर्वांवर ते सारखीच दया करतात.

पहा:—

**न हिं संहरते ज्योत्स्नां चंद्रश्चांडालवेश्मनि ।**
**निर्गुणेष्वपि सत्वेषु दयां कुर्वंति साधवः ।**

भावार्थः—चंद्र आपला उजेड चांडालाच्याही घरापासून परावृत्त करीत नाहीं. साधु पुरुष गुणहीन प्राण्यावरही दया करतात.

जगांतील स्वार्थपर मनुष्यांची प्रवृत्ति थोर थोर पुरुषांवरच उपकार करण्याची असते. कारण त्यांत आपला कांहीं तरी कार्यभाग साधेल अशी त्यांस आशा असते. गोरगरीबांस मदत करून काय उपयोग, असें ते समजत असतात.

अशा क्षुद्र अंतःकरणाच्या पुरुषांची निर्भत्सना जगन्नाथराय पंडित अन्योक्तिद्वारा करितातः—

**दीनानि प्रति परिहाय शुष्कशस्या–**
**न्यौदार्यं प्रकटयतो महीधरेषु ।**
**औन्नत्यं परममवाप्य दुर्मदस्य**
**ज्ञातोऽयं जलधर ते यथा विवेकः ॥**

भावार्थः—हे मेघा, सुकलेलीं व दीन झालेलीं अशीं जीं तृणें त्यांची उपेक्षा करून महीधर जे पर्वत (किंवा राजे) यांचेवर औदार्य दाखविणाऱ्या, व मोठी उन्नति प्राप्त होऊनही दुर्मद असलेल्या तुझी सदसद्विवेक शक्ति आह्मी समजून चुकलों.

गरीब व संकटांत असलेल्या याचकांस अव्हेरून, राजे लोकांकडे मोठमोठे नजराणे पाठविणाऱ्या आपमतलबी लोकांस लावून ही पंडितांची उक्ति आहे. असो.

संतांस हें दूषण बिलकुल लागू होत नाहीं. कारण त्यांची सर्व जगतावर सारखी दृष्टी असते, व त्यांस कोणताही स्वार्थ साधावयाचा नसतो.

ज्ञानोबाराय ह्मणतातः—

**उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें कांहींच नेणिजे ।**

वसुधा जेवीं ॥ कां रायाचा देह चाळूं । रंकापरौते गाळूं । ऐसें न ह्मणेचि कृपाळू । प्राण पैं गा ॥ गाईची तृषा हरूं । व्याघ्रा विष होवोनि मारूं । ऐसें नेणेचि करूं । तोय जैसें ॥ तैसी आघविया भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री । कृपेसि धात्री । आपण जो ॥

साधुपुरुष लहानथोरावर सारखी दया करतात इतकेंच नव्हे, तर जे आपला छल करतात, किंवा प्रत्यक्ष आपल्यावर प्रहार करतात, अथवा अनेक रीतींनें उपद्रव देतात, जे आपले शत्रू होऊन आपला घात करूं पहातात, अशांवर सुद्धां संत उपकारच करीत असतात.

जगन्नाथराय पंडित ह्मणतात:—

**पाटीर तव पटीयान्कः परिपाटीमिमामुरीकर्तुं ।**
**यत्पिंशतामपि नृणां पिष्टोऽपि तनोषि परिमलैस्तुष्टिं ॥**

भावार्थ:—हे चंदना ! तुझे घांसून पिष्ट करणारालाही, तुला घांशीत असतां, तूं सुवासानें संतुष्ट करतोस, हा तुझा उत्तम कित्ता गिरवण्यास कोण समर्थ आहे.

आपणास उपद्रव करून नाश करण्यासही प्रवृत्त होणारावर साधु पुरुष कशी दया करतात, हें श्रेष्ठ भगवद्भक्त, व सत्वशील अंबरीष राजाच्या चरित्रावरून कळून येईल.

अंबरीष हा राजा उदार, सत्यवचनी, व सदाचरणी असून निःसीम भगवद्भक्त होता. त्यानें अनेक व्रतें वगैरे करून विष्णूस संतुष्ट केलें होतें. तो नेहेमीं एकादशीस कडक उपोषण करून द्वादशीस ब्राह्मण-भोजन झाल्यावर अन्न घेत असे. एके दिवशीं ब्राह्मण जेवावयास बसले असून द्वादशी फार थोडी उरली असतां अवचित दुर्वास ऋषी तेथें येऊन पोहोंचले. ऋषींचा राजानें फार सत्कार करून त्यांस आग्रहानें जेवाव-

यास बोलाविलें. ऋषींनीं आमंत्रण कबूल करून नदीची वाट धरली, व तेथेंच स्नान संध्यादिक नित्य कृत्य आटोपण्यांत बराच काळ काढला. इकडे द्वादशीचा काल संपत आल्यामुळें राजास संकट पडलें. पारणें न केलें तर व्रतभंगाचा दोष पदरीं लागतो, व केलें तर अतिथीचा अपमान होतो, अशी दोहींकडून त्या विचाऱ्याला अडचण दिसूं लागली. ह्मणून त्यानें हात जोडून विप्रसभेस विनंती केली कीं, "महाराज, या प्रसंगीं म्यां काय करावें?" ब्राह्मणांनीं लगेच उत्तर दिलें कीं, राजानें संकल्प सोडून तीर्थाचें ग्रहण केलें तर व्रताची पूर्णता होऊन, ऋषीचाही अपमान होणार नाहीं.

पंत ह्मणतातः—

**अशन न जल पानें होय पीतां हि पाणी ।**
**अनशन हि नव्हेचि स्पष्ट हे वेदवाणी ।**
**श्रुतिस अनुसरे जो त्यासि कोणी न दापी ।**
**ह्मणुनि मुनिमतें तो तोय राजा तदा पी ॥**

सर्व ब्राह्मणांच्या आज्ञेनें राजानें तीर्थ प्राशन केल्यावर दुर्वास ऋषी स्नान वगैरे करून हळू हळू चालत राजसभेस परत आले. त्यांना अंतर्दृष्टीनें सभेंतील सर्व वर्तमान कळून फार राग आला, व विचार न करतां त्या क्रोधांध ऋषीनें राजास, तुला दहा गर्भवास सोसावे लागतील असा भयंकर शाप दिला.

तिळभरही न डगमगतां त्या शांत राजानें हात जोडून नम्र वाणीनें उत्तर दिलें कीं, "महाराज, मीं अगदीं निरपराधी असल्यामुळें आपला शाप मला बाधणार नाहीं. त्याचें संकट देवाला पडेल."

यावर जास्त चवताळून दुर्वासानें आपली जटा सोडून भूमीवर आपटली. तोंच तिच्या मधून एक भयंकर कृत्या उत्पन्न झाली. तिला

राजाचा वध करण्याची आज्ञा दुर्वासानें देतांच ती राजाचे अंगावर धांवली. पण तो धीरवीर किंचितहि हालला नाहीं. तो तसाच स्थिर उभा राहिला, आणि शस्त्र वगैरे कांहीं न उचलतां त्या कृत्येकडे शांतपणानें पाहूं लागला.

इतक्यांत एक दिव्यतेज तेथें एकदम प्रगट झालें. तें वर्तुळाकृति असून एकसारखें गरगर फिरत होतें. त्यानें एका क्षणांत त्या कृत्येचा नाश करून, भगवद्भक्ताचा उपमर्द करणाऱ्या त्या ऋषीचे अंगावर धांव घेतली.

सुदर्शन अंगावर येत आहे असें पाहून ऋषीचें धैर्य नष्ट झालें, व त्यांनीं जीव बचावण्याकरतां तेथून शीघ्र पलायन केलें. पण पाठीं लागलेलें सुदर्शन त्याला सोडीना. तपोबलानें दुर्वास वाऱ्यापेक्षांही जास्त वेगानें पळत सुटला. पण पाठीं विष्णूचें शस्त्र आहेच. हें पाहून दुर्वास इंद्रास शरण गेला, व अभय मागूं लागला. इंद्र ह्मणाला "महर्षे, विष्णूचें शस्त्र निवारण्याचें सामर्थ्य मजकडे नाहीं. मला आपली फार दया येते. पण माझा निरुपाय आहे."

दुर्वास ऋषी तेथून पळत पळत सत्यलोकास गेले, व "सुदर्शना-पासून माझी मुक्तता करा" अशी ब्रह्मदेवाची विनंति केली. ब्रह्मदेवा-नेंही इंद्राप्रमाणेंच उत्तर दिलें.

हताश होऊन दुर्वास ऋषींनीं तेथूनही पळ काढला, व थेट कैला-सास जाऊन शंकरास साष्टांग नमस्कार घालून त्यांची स्तुति आरं-भिली. नंतर तुजवांचून आतां मला कोणी त्राता राहिला नाहीं. तूं तरी मला या सुदर्शनापासून सोडीव अशी दीन वाणीनें प्रार्थना केली. शंकरानें ऋषीपासून झालेला सर्व वृत्तांत ऐकून घेतला, व उत्तर दिलें, " बाबारे या कामीं सर्व अपराध तुजकडेच येऊं पहातो.

अशा कामीं विष्णूशीं विरोध करणें उचित नाहीं. तूं ज्या विष्णूचा अपमान केलास त्यालाच तूं शरण जा. तोच तुझें रक्षण करील."

लज्जित व निराश होऊन अखेर ऋषी वैकुंठास जाऊन त्यांनीं विष्णूचे पाय घट्ट धरले, व ह्मणाले, माझा मोठा अपराध तर झालाच आहे, पण आतां दयाळू होऊन जीवदान द्यावें. पहा शरण आलेल्याचें सत्पुरुष अवश्य रक्षण करतात.

पंत ह्मणतातः—

**येती शरण जे त्यांचें करिती संत रक्षण ।**
**जाणते न पडों देती या व्रतीं अंतर क्षण ।**

ह्मणून "शरणांगतांचें रक्षण करण्याचें आपलें ब्रीद संभाळावें."

विष्णूनें दुर्वासास उठविलें, व ह्मणाला " महर्षे, आपण ह्मणतां तें सर्व खरें आहे. पण मी सर्वस्वी माझे भक्तांचे आधीन असल्यामुळें या कामीं क्षमा करणें मजकडे रहात नाहीं. यास्तव मजवर विश्वास ठेऊन तूं माझ्या श्रेष्ठ भक्तालाच शरण जा. तो तुला या संकटांतून अवश्य सोडवील, यांत कांहीं संदेह नाहीं."

दुर्वास ऋषी खिन्न होऊन वैकुंठाहून परतले व आपला जीव वांचवावा ह्मणून निरुपाय होऊन त्यांनीं राजाचे सभेंत पुनः प्रवेश केला. तों राजा दुर्वासाची वाट पाहात उपोशित उभा होता. त्याला दुर्वासानें लज्जित होऊन गद्गद स्वरानें आपली झालेली दुर्दशा निवेदन करतांच त्या दयाळू राजास गहिंवर आला, व त्यानें लागलीच करुण स्वरानें सुदर्शनाची स्तुती आरंभिली व बिचाऱ्या ऋषीस सोडून दे अशी विनंती केली.

आपला ज्यानें विनाकारण इतका उपमर्द केला, ज्यानें आपणास भयंकर शाप दिला, ज्यानें आपला प्राण घेण्याचा यत्न केला, त्या

दुर्वासासही संकटांत पाहिल्याबरोबर त्या थोर व दयाळू महात्म्याचें अंतःकरण कळवळलें. पण यांत नवल तें काय?

पंत ह्मणतातः—

**वरि दिसे मृदु मौक्तिक पोवळें। परि न लेश तदंतर कोवळें ॥**
**न तुळवे विधु अंकित तो मळें। सरस साधुमनें शुचि कोमलें॥**

राजानें सुदर्शनाची प्रार्थना केल्यामुळें त्याचा वेग कमी झाला. तरी दुर्वासासभोंवतीं तें घिरट्या घालीत राहिलेंच. तेव्हां ऋषीची सुटका व्हावी ह्मणून राजानें एकामागें एक आपण केलेले सुकृताचें पुण्य अर्पण केलें. त्या तेजस्वी शस्त्राचा वेग तर बराच कमी झाला, पण तें आपला हट्ट सोडीना. तेव्हां राजा ह्मणाला "हे चक्रा, तूं विष्णुभक्त आहेस, तसा मीही जर असेन, व माझी भक्ति जर विष्णूला मान्य असेल, तर तुलाही माझें वचन मान्य केलें पाहिजे. तुझा रागाचा आवेश जर तुला आवरत नसेल तर माझे शिरावर आघात कर, पण कृपा करून त्या गरीब ऋषीला सोडून दे."

हें ऐकल्याबरोबर सुदर्शनानें दुर्वासास सोडलें, आणि लगेच गुप्त झालें. राजाचें थोर मन व औदार्य पाहून दुर्वासाचा सर्व गर्व निःशेष गेला, व तो कृतज्ञबुद्धीनें राजाचे पायां पडावयास धांवला. राजानें त्याला वर उचलून धरलें, व आपणच त्याला नमस्कार घालून ह्मणाला, "महाराज, आपणास मजकरतां फार श्रम सोसावे लागले, व इतका वेळपर्यंत उपासही काढावा लागला, याबद्दल मला क्षमा केली पाहिजे. आपण आतां क्षुधा शांत करावी, व नंतर मीही अन्नाचें सेवन करीन."

हें ऐकून दुर्वासऋषी फार लज्जित झाले, व त्यांनीं राजाची मनःपूर्वक स्तुती केली, आणि नंतर भोजन करून राजास आशिर्वाद दिला, व सत्यलोकीं गमन केलें. आतां सांगावयाचें इतकेंच राहिलें

कीं, भक्तकैवारी श्रीविष्णूनें आपण स्वतः दहा अवतार घेऊन आपले उदार व निर्दोषी भक्ताला शापाचा त्रास लागूं दिला नाहीं.

यास्तव शत्रूवरही उपकार करतो तोच साधू. मित्रावर तर कोणीही उपकार करील. पण प्रत्यक्ष शत्रूवर उपकार करणारे पुरुष विरळा.

**उपकारिषु यः साधुः साधुत्वे तस्य को गुणः ।**
**अपकारिषु यः साधुः स साधुः सद्भिरुच्यते ॥**

भावार्थः—आपल्यावर उपकार करणाराकडे जो साधुत्वानें वागतो त्याच्या साधुत्वांत काय महत्व आहे? पण अपकार करणाराशींही जो साधुत्वानें वागतो त्यालाच सत्पुरुष साधु असें ह्मणतात.

संतांची सर्वत्र समदृष्टि असल्यामुळें त्यांचें वर्तन शत्रूमित्रांकडे सारखेंच असतें. ते दोघांवरही सारखेच उपकार करतात.

ज्ञानेश्वर ह्मणतात:—

**जो खांडावया घाव घाली। कां लावणी जेणें केली। दोघांसि एकचि साउली। वृक्ष जैसा॥ नातरी इक्षुदंडू। पाळितया गोडू। गाळितया कडू। नोहेचि जैसा॥**

याप्रमाणें साधू लहान थोर, बरे वाईट, शत्रू मित्र, या सर्वांवर अनेक उपकार करतातच; पण त्यांच्या श्रेष्ठत्वाचें मुख्य लक्षण हेंच कीं, दुसऱ्यावर आपण कितीही उपकार केले तरी त्याबद्दल ते स्वतः एक शब्दही कोणाकडे बोलत नाहींत. आपलीं सत्कृत्यें जाहीर होऊन आपली कीर्ति वाढावी अशी त्यांस बिलकुल इच्छा नसते. उलट आपण जीं पुण्य कर्में करावयाचीं तीं गुप्त ठेवण्याबद्दलच त्यांचा प्रयत्न असतो. पण दुसऱ्यांनीं त्यांच्यावर जर एखादा लहानसाही उपकार केला तर त्याबद्दल मात्र ते भर सभेंत बोलतात, व उपकार करणाराची स्तुति करून, त्याचे आभार मानतात.

भर्तृहरी ह्मणतातः—

**प्रदानं प्रच्छन्नं गृहमुपगते संभ्रमविधिः ।**
**प्रियं कृत्वा मौनं सदसि कथनं चाप्युपकृतेः ॥**

भावार्थः—दान तर फार, पण गुप्त करावयाचें. घरीं आलेल्याचें उत्तम स्वागत करावयाचें. दुसऱ्याचें प्रिय केल्यावर मौन धरावयाचें. पण दुसऱ्यांनीं आपल्यावर उपकार केला तर तो मात्र सभेंत प्रकट करावयाचा.

( २ ) शांतिः—आतां शत्रूंवर उपकार करण्यापर्यंत ज्यांची मज्जल गेली त्या सत्पुरुषाचे अंगीं शांति असते हें सांगावयास नकोच. साधूस दुसऱ्यानें कितीही उपद्रव केला तरी त्याचें मन शांतच राहातें. त्यांना कोणीही विनाकारण छळलें तरी ते क्रोधास वश होत नाहींत. आपला उपमर्द करणारा अज्ञ आहे, त्याला कांहीं कळत नसल्यामुळेंच त्यानें अपराध केला असें मानून ते त्याला कोणताही प्रतीकार करित नाहींत, व आपल्यास झालेला त्रास निमुटपणें सोसतात.

या शांतीबद्दल उत्कृष्ट उदाहरण प्रसिद्ध सत्पुरुष एकनाथस्वामी यांच्या संबंधी एका कथानकांत मिळतें. ती गोष्ट ऐकण्यासारखी आहे. एकनाथस्वामींस कधींही राग येत नसे, हें पाहून कांहीं टवाळ मंडळींनीं साधूंची परिक्षा करण्याचा निश्चय केला, आणि एका गरजू नीच मनुष्यास असें सांगितलें कीं, तूं कसेंही करून एकदां स्वामींस राग येईल असें कर, ह्मणजे आह्मी तुला मोठें बक्षीस देऊं.

त्या पामरानें द्रव्याच्या लालचीनें ती गोष्ट कबूल केली, आणि महाराज नदीवरून स्नान करून येत आहेत अशी संधी पाहून आपण पान खात महाराजांचे घरीं जावयाचे रस्त्यावर उभा राहिला, व महाराज जवळून चालले असतां निर्भीडपणानें त्यांचे अंगावर थुंकला.

कांहींएक न बोलतां एकनाथ स्वामी नदीवर परत गेले, आणि पुनः स्नान करून घराकडे चालले. तो नीच मनुष्य पान खाऊन पुनः त्यांचे अंगावर थुंकला. महाराज पुनः निमूटपणें स्नानास गेले. याप्रमाणें त्या सत्पुरुषास पन्नास वेळा स्नान करावें लागलें, तरी ते शेवटपर्यंत शांतवृत्तींतच होते. त्यांस मुळींच क्रोध येत नाहीं असें पाहून त्या नरपशूस फार आश्चर्य वाटलें, व आपण केलेल्या अति नीच कृत्याबद्दल पश्चात्तापही झाला.

त्यानें महाराजांचे पाय घट्ट धरिले आणि ह्मणाला " महाराज, मी आपला फार उपमर्द केला. पण केलेल्या कृत्याबद्दल मला आतां पश्चात्ताप झाला आहे. ह्मणून महाराजांनीं मला क्षमा केली पाहिजे." स्वामी विचारतात " क्षमा रे बाबा कशाची ? " तो मनुष्य ह्मणाला " मी दुष्टपणानें आपले अंगावर थुंकलों याबद्दलची. " स्वामी ह्मणाले, " बाप्पा, तुझे कृपेनें आज मला पन्नास स्नानांचें पुण्य मिळालें, हा तुझा मजवर उलट मोठा उपकारच झाला. " हें ऐकून तो नीच मनुष्य फार लज्जित झाला, आणि त्याला उपरति होऊन स्वामींच्या चरणांवर त्यानें लोटांगण घातलें, व या दीनाचा उद्धार करावा ह्मणून प्रार्थना केली. स्वामींनींही सत्पुरुषांचे ब्रीदाप्रमाणें त्याजवर अनुग्रह केला.

( ३ ) क्षमाः—कोणी कितीही उपमर्द केला तरी सत्पुरुष जें शांत वृत्तीचें अवलंबन करतात तें क्षमा या सद्गुणाच्या जोरावर. क्षमाशील पुरुषापुढें दुर्जनांचें कांहीं चालत नाहीं.

**क्षमाशस्त्रं करे यस्य दुर्जनः किं करिष्यति ।**
**अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति ॥**

भावार्थः—क्षमा हें शस्त्र ज्याचे हातांत आहे त्याला दुर्जन काय करणार ? अग्नी जर तृण नाहीं अशा ठिकाणीं पडला तर तो आपेआप शांत होतो.

भर्तृहरी ह्मणतातः—

**प्रदानं प्रच्छन्नं गृहमुपगते संभ्रमविधिः ।**
**प्रियं कृत्वा मौनं सदसि कथनं चाप्युपकृतेः ॥**

भावार्थः—दान तर फार, पण गुप्त करावयाचें. घरीं आलेल्याचें उत्तम स्वागत करावयाचें. दुसऱ्याचें प्रिय केल्यावर मौन धरावयाचें. पण दुसऱ्यांनीं आपल्यावर उपकार केला तर तो मात्र सभेंत प्रकट करावयाचा.

( २ ) शांतिः—आतां शत्रूंवर उपकार करण्यापर्यंत ज्यांची मजल गेली त्या सत्पुरुषाचे अंगीं शांति असते हें सांगावयास नकोच. साधूस दुसऱ्यानें कितीही उपद्रव केला तरी त्याचें मन शांतच राहातें. त्यांना कोणीही विनाकारण छळलें तरी ते क्रोधास वश होत नाहींत. आपला उपमर्द करणारा अज्ञ आहे, त्याला कांहीं कळत नसल्या-मुळेंच त्यानें अपराध केला असें मानून ते त्याला कोणताही प्रतीकार करित नाहींत, व आपल्यास झालेला त्रास निमुटपणें सोसतात.

या शांतीबद्दल उत्कृष्ट उदाहरण प्रसिद्ध सत्पुरुष एकनाथस्वामी यांच्या संबंधी एका कथानकांत मिळतें. ती गोष्ट ऐकण्यासारखी आहे. एकनाथस्वामींस कधींही राग येत नसे, हें पाहून कांहीं टवाळ मंडळींनीं साधूंची परिक्षा करण्याचा निश्चय केला, आणि एका गरजू नीच मनुष्यास असें सांगितलें कीं, तूं कसेंही करून एकदां स्वामींस राग येईल असें कर, ह्मणजे आह्मी तुला मोठें बक्षीस देऊं.

त्या पामरानें द्रव्याच्या लालचीनें ती गोष्ट कबूल केली, आणि महाराज नदीवरून स्नान करून येत आहेत अशी संधी पाहून आपण पान खात महाराजांचे घरीं जावयाचे रस्त्यावर उभा राहिला, व महाराज जवळून चालले असतां निर्भीडपणानें त्यांचे अंगावर थुंकला.

कांहींएक न बोलतां एकनाथ स्वामी नदीवर परत गेले, आणि पुनः स्नान करून घराकडे चालले. तो नीच मनुष्य पान खाऊन पुनः त्यांचे अंगावर थुंकला. महाराज पुनः निमूटपणें स्नानास गेले. याप्रमाणें त्या सत्पुरुषास पन्नास वेळा स्नान करावें लागलें, तरी ते शेवटपर्यंत शांतवृत्तींतच होते. त्यांस मुळींच क्रोध येत नाहीं असें पाहून त्या नरपशूस फार आश्चर्य वाटलें, व आपण केलेल्या अति नीच कृत्याबद्दल पश्चात्तापही झाला.

त्यानें महाराजांचे पाय घट्ट धरिले आणि ह्मणाला " महाराज, मी आपला फार उपमर्द केला. पण केलेल्या कृत्याबद्दल मला आतां पश्चात्ताप झाला आहे. ह्मणून महाराजांनीं मला क्षमा केली पाहिजे." स्वामी विचारतात " क्षमा रे बाबा कशाची ? " तो मनुष्य ह्मणाला " मी दुष्टपणानें आपले अंगावर थुंकलों याबद्दलची. " स्वामी ह्मणाले, " बाप्पा, तुझे कृपेनें आज मला पन्नास स्नानांचें पुण्य मिळालें, हा तुझा मजवर उलट मोठा उपकारच झाला. " हें ऐकून तो नीच मनुष्य फार लज्जित झाला, आणि त्याला उपरति होऊन स्वामींच्या चरणांवर त्यानें लोटांगण घातलें, व या दीनाचा उद्धार करावा ह्मणून प्रार्थना केली. स्वामींनींही सत्पुरुषांचे ब्रीदाप्रमाणें त्याजवर अनुग्रह केला.

( ३ ) क्षमाः—कोणी कितीही उपमर्द केला तरी सत्पुरुष जें शांत वृत्तीचें अवलंबन करतात तें क्षमा या सद्गुणाच्या जोरावर. क्षमाशील पुरुषापुढें दुर्जनांचें कांहीं चालत नाहीं.

**क्षमाशस्त्रं करे यस्य दुर्जनः किं करिष्यति ।**
**अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति ॥**

भावार्थः—क्षमा हें शस्त्र ज्याचे हातांत आहे त्याला दुर्जन काय करणार ? अग्नी जर तृण नाहीं अशा ठिकाणीं पडला तर तो आपेआप शांत होतो.

( ४ ) समरसता:–साधूंवर कितीही विपत्ति येऊन पडली, त्यांची कितीही दुर्दशा झाली तरी त्यांच्या हृदयाचा चांगुलपणा कायम रहातो.

**आदिमध्यनिधनेषु सौहृदं सज्जने भवति नेतरे जने ।**
**छेदतापननिघर्षताडनैर्नान्यभावमुपयाति कांचनं ।।**

भावार्थ:—आदि, मध्य व अंत स्थितींत हृदयाचा चांगुलपणा एक सज्जनांतच दिसतो. इतर जनांत तो असत नाहीं. तोडलें, तापविलें, घांसलें किंवा ठोकलें तरी सोनें चोखपणा सोडीत नाहीं.

सज्जनांस कितीही छळलें, कितीही वाईट रीतीनें वागविलें, त्यांची कितीही दुर्दशा केली तरी ते आपलें सौजन्य सोडीत नाहींत.

**विगृहीतः पदाक्रांतः भूयोभूयोपि खंडितः ।**
**माधुर्यमेवावहते सुश्लोक इव सज्जनः ।।**

भावार्थ:—जसे एखाद्या उत्तम श्लोकाचे तुकडे पाडले, पदच्छेद केला, विग्रह केला, तरी त्यांतील माधुर्यच प्रगट होतें, त्याप्रमाणें सज्जनांशीं विग्रह केला, पायांखालीं तुडविलें, त्यांचा मानभंग केला तरी ते आपलें सौजन्य कायम ठेवतात.

( ५ ) सद्वर्तन:—सज्जनांस ओळखण्याची आणखी एक उत्तम खूण ह्मटली तर त्यांचें न्यायास अनुसरून वर्तन हें होय. कसाहीं प्रसंग येऊन अंगावर पडला तरी सज्जन कुनीतीचा स्वीकार करीत नाहींत. सर्वकाल न्यायानें चालणेंच त्यांना अभिमत असतें. जीं संकटें येतील, जीं दुःखें भोगावयास भाग पडतील, तीं सर्व निमूटपणें सोसण्याची त्यांची तयारी असते, पण प्राणाचा घात होण्याचा जरी प्रसंग आला तरी कुमार्गानें ते कधींही चालणार नाहींत.

भर्तृहरी ह्मणतात:—

**प्रिया न्याय्यावृत्तिर्मलिनमसुभंगेऽप्यसुकरं ।**

भावार्थः—न्यायानें चालणें त्यांना प्रिय असतें, व प्राणावर संकट आलें तरी त्यांच्यानें नीच काम करवत नाहीं.

साधू अत्यंत धैर्यवान असल्यामुळें ते कशाची पर्वा न करतां सन्मार्गाचेंच अवलंबन करतात.

भर्तृहरी ह्मणतातः—

**निंदंतु नीतिनिपुणा यदि वा स्तुवंतु ।**
**लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टं ।**
**अद्यैव वा मरणमस्तु युगांतरे वा ।**
**न्याय्यात्पथात्प्रविचलंति पदं न धीराः ॥**

भावार्थः—नीतीकोविद लोक निंदा करोत अथवा स्तुति करोत, लक्ष्मी स्वेच्छेनें येवो अथवा जावो, मरण आज असो किंवा युगांतरानें असो, धैर्यवान पुरुष न्यायाचा मार्ग सोडून एक पाऊलही टाकीत नाहींत.

( ६ ) नम्रताः—संतांच्या अपार गुणांचें वर्णन करीत बसलें तर व्याख्यान फार वाढेल, ह्मणून वर निर्दिष्ट केलेल्या थोडे पण अत्युत्तम गुणांची ओळख ठेवून खऱ्या संतांची निवड करावी. पण संतांच्या सद्गुणाविषयीं सांगावयाचें एक राहिलें तें हेंच कीं, अनेक सद्गुण अंगीं असोन संतांस त्यांचा गर्व मुळींच नसतो. नम्रता हा सद्गुण संतांच्या इतर सद्गुणांस विशेष शोभा आणतो.

भर्तृहरी ह्मणतातः—

**नम्रत्वेनोन्नमंतः परगुणनुतिभिः स्वान्गुणान्ख्यापयंतः ।**

भावार्थः—ते ( सज्जन ) नम्रत्वानें आपली उन्नति करून घेतात. दुसऱ्यांच्या गुणांची प्रशंसा करून ( नकळत ) आपले गुण प्रगट करतात.

हे सर्व सद्गुण ज्याच्या अंगीं वास करतात त्यालाच साधू ह्मणावें; मग त्याचा वेष कसाही असो, त्याचा आश्रम कोणताही असो, तो व्यावहारिक दृष्ट्या कोणत्याही उच्च किंवा निकृष्ट स्थितींत असो; हे सद्गुण ज्यांचे अंगीं दिसतात त्या पुरुषाला ज्ञानप्राप्ति झाली आहे असें समजावें. सद्गुणी पुरुषाची जर अजून साक्षात्कारापर्यंत मजल गेलेली नसली, तर ही गोष्ट तो प्रांजळपणानें कबूल करून साधकास आपले नादीं कधींही लावणार नाही. ह्मणून सद्गुणी पुरुषाच्या अनुसंधानानें साधकास कधींही धोका नसतो.

पण या जगांत सर्वांनां नम्रता व सत्याचें अवलंबन हीं पसंत नसतात. अंगीं सद्गुण नाहींत, ज्ञान नाहीं, अंतःकरण तर प्रबल मनोविकारांनीं भरलेलें, अशी स्थिति असूनहीं कित्येकांस उगीच वेष धारण करून स्वतःस साधू ह्मणवून, दुसऱ्यास आपल्या नादीं लावण्यांत प्रौढी वाटते असें निर्लज्जपणाचें वर्तन करणारे अर्थातच साधू नव्हत.

नामदेव ह्मणतातः—

**गोसावीपणाचा दाखविती वेष । नाहीं निदिध्यास हरिनामीं ॥**
**वरिवरी आर्त दाविती झगमग । अंतरीं तो संग विषयाचा ॥**
**व्यर्थ लोकांपुढें हालविती मान । केलें विटंबन संसाराचें ॥**

खरे साधू विरळा. पण हे वेषधारी साधू मात्र जिकडे तिकडे नजरेस पडतात. हे तऱ्हेतऱ्हेचीं सोंगें घेऊन बतावणी करतात. पण ती वर वर मात्र असते. अंतःकरणांत खरी विरक्ति नसल्यामुळें हे स्वतः अज्ञानांत मग्न झालेले असतात, मग यांजकडून दुसऱ्यांचा उद्धार कसा व्हावा?

रंगनाथ स्वामी त्यांच्या योगवासिष्ठांत ह्मणतातः—

**एक बहूदक कुटीचक वनचर । एक पर्वतवासी कंथाधर ।**

**एक भगवे एक दिगंबर। नाना वेषधर जे असती ॥ एक माळमुद्रा धरिती। एक जटाजूट वाढविती। एक जटी द्विजटी त्रिजटी असती। बहु देखिजती उदासपणें ॥ एक ते परिव्राजक संन्यासी। एक बोलिजती कर्मसंन्यासी। एक दंडी त्रिदंडी ऐसी। नाना वेष विटंबना ॥ इतुकीयातें लोक भावना। सज्जन ह्मणतसे गा सज्ञाना। ते भेटलिया भवभावना। छेदूं अज्ञाना काय होय ॥**

आतां रंगनाथ स्वामींनीं निर्दिष्ट केलेल्या वेषधाऱ्यांपैकीं सर्वच लोकांस फसविणारे भोंदू आहेत असें समजूं नये. या मालिकेंतील बरेच पुरुष खऱ्या भावानें आपण साधु आहों, व आपला मार्ग मोक्षदायक आहे, असेंच समजतात. पण त्यांचा हा समज चुकीचा असल्यामुळें, त्यांजवर विश्वास ठेवणाऱ्या बिचाऱ्या भाविक लोकांचें अनहित होतें. यासाठीं रंगनाथ स्वामींचा त्यांच्यावर कटाक्ष आहे.

आचार्यही याचप्रमाणें सूचना करतातः—

**जटिलो मुंडितलुंचितकेशः। काषायांबरबहुकृतवेषः॥**
**पश्यन्नपि न च पश्यति लोकः। उदरनिमित्तं कृतबहुशोकः॥**

भावार्थः—जटाधारी किंवा केशांचें मुंडन केलेला, किंवा केशलोच केलेला, भगवें वस्त्र नेसलेला, वेषधारी असतो. लोक डोळे उघडे असूनही पहात नाहींत. हा सर्व उगाच पोटासाठीं सायास.

परंतु ज्यांस खरें ज्ञान झालेलें आहे त्यांचा वेष वर निर्दिष्ट केलेले वेषांपैकीं एखादा असला तरी चालेल, अथवा सांसारिकांच्या वेषांपैकीं कोणताही असला तरी हरकत नाहीं. मुमुक्षूस फक्त ज्ञानाशीं कर्तव्य आहे. खरा अनुभविक ज्ञानी दुसऱ्यास मोक्षाची खरी वाट दाखवूं

शकतो, ह्मणूनच त्याला सद्गुरु ह्मणतां येईल. ज्यांच्याकडे खरें संशयरहित ज्ञान नाहीं त्यांनीं कांहीं केलें तरी ते साधू नव्हत.

तुकोबाराय ह्मणतातः—

**नव्हती ते संत करितां कवित्व । संतांचे ते आप्त नव्हती संत ॥**
**नव्हती ते संत धरितां भोपळा । पांघुरतां वाकळ नव्हती संत ॥**
**नव्हती ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराणें नव्हती संत ॥**
**नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥**
**नव्हती संत करितां तप तीर्थाटण । सेविलिया वन नव्हती संत ॥**
**नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्म उधळणें नव्हती संत ॥**
**तुका ह्मणें नाहीं निरसितां संदेह । तोंवरी हे अवघे सांसारिक ॥**

जे सद्भावानें कीर्तन, तप, तीर्थाटण वगैरे सत्कर्में करतात, ते पुण्यवान पुरुष असतात, यांत संशय नाहीं. पण जोंपर्यंत त्यांना निःसंदेह ब्रह्मज्ञान स्वानुभवानें झालें नाहीं, तोंपर्यंत त्यांना मोक्षदायक संतांची संज्ञा उचित नाहीं.

आतां ज्ञान तर नाहींच, पण खरी विरक्तीही ज्यांना झाली नाहीं, त्यांनीं निःस्पृहाचा वेष धरला तर लोक कांहीं वेळपर्यंत कदाचित् फसतील, पण अखेर खरी स्थिति प्रगट होऊन, त्या वेषधाऱ्याची फटफजीती होते.

**आशावसानाः सततमात्मगुह्यप्रकाशकाः ।**
**परीहासपदं लोके यांति नूनं शुकादृते ॥**

भावार्थः—शुकाखेरीज जे इतर पुरुष दिगंबर होऊन आपलें गुह्य शरीर उघडें करतात, त्यांचें खरोखर लोकांत हंसें होतें, कारण त्यांनीं आशेचें अवसान ह्मणजे नाश केलेला नसतो, व ते आत्मज्ञानाचें रहस्य प्रकट करूं शकत नाहींत.

ह्मणून लोकांत आपली फजीती होऊं नये अशी ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं खरी विरक्ति प्राप्त झाल्याशिवाय हे वेश उगीच धारण करूं नयेत. त्यांनीं गृहस्थाश्रमांतच राहून यथाशक्ति परमार्थसाधन करावें. जो आशेंत गुंतलेला आहे त्यानें गृहाचा पुत्रदारादिकांचा त्याग करून काय उपयोग ?

तुकोबाराय ह्मणतातः—

**आशा हे समूळ खंडोनि टाकावी। तेव्हांचि गोसावी व्हावें त्यानें ॥**
**नाहीं तरी सुखें असावें संसारीं। फजीती दुसरी करों नये ॥**

असो. येथपर्यंत साधू कोणाला ह्मणावें, साधूंना कसें ओळखावें, खरे साधू कोण, नुसते वेषधारी साधू कोण, वगैरे प्रश्नांचा विचार झाला. आतां संतांच्या संगतीपासून काय लाभ होतो तें पाहिलें पाहिजे. साधूचा सहवास सर्वथैव कल्याणप्रद आहे. कारण त्यापासून मनुष्याचें संसारांत व परमार्थांत अनेक रीतीनें हित होतें. संसारांत देखील सत्संगतीनें काय लाभ होतो तो पहा.

भर्तृहरी ह्मणतातः—

**जाड्यं धियो हरति सिंचति वाचि सत्यं।**
**मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति।**
**चेतः प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिं।**
**सत्संगतिः कथय किं न करोति पुंसां ॥**

भावार्थः—सत्संगती बुद्धीचा जडपणा दूर करते, वाचेवर सत्याचें सेचन करते, मान वाढविते, पापाचा नाश करते, मनास प्रसन्नता आणते, आणि कीर्ति ( दाही ) दिशांत पसरवते. याप्रमाणें सत्संगतीपासून कोणता लाभ होत नाहीं तें सांग.

मनुष्याचा ताप हरण करून त्याचें कल्याण करणाऱ्या या जगांत अनेक वस्तू आहेत. पण सत्संगाबरोबर त्यांची तुलना होऊं शकत नाहीं.

**गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पद्रुमस्तथा ।**
**पापं तापं च दैन्यं च हरेत्साधुसमागमः ॥**

भावार्थः—गंगा पाप नाहींसें करते. चंद्र तापाचें हरण करतो. कल्पवृक्ष दैन्यापासून मुक्त करतो. पण एकटा सत्संग पाप, ताप, व दैन्य यांचें हरण करील.

याप्रमाणें संसारांतही सत्संगानें अतिशय लाभ होतो. आतां परमार्थांत तर यासारखें दुसरें उत्तम साधन कोणतेंच नाहीं.

वसिष्ठ ह्मणतातः—

**विशेषेण महाबाहो संसारोत्तरणे नृणां ।**
**सर्वत्रोपकरोतीह साधुः साधुसमागमः ॥**

भावार्थः—हे महाबाहो रामचंद्रा ! मनुष्यास संसार तरून जाण्याचे कामीं विशेषेंकरून हा उत्तम साधुसमागमच सर्व प्रकारें उपयोगी आहे.

या साधुसमागमाचा महिमा अगाध आहे. यानें मनुष्याची दुष्ट बुद्धि जाऊन त्याचे अंगीं सुशीलता येते. त्याच्या पापवासना नाहींशा होऊन त्याची सन्मार्गाकडे प्रवृत्ति होते. शिवाय तो आपलीं सर्व दुःखें विसरून जातो. त्याला कशाचें भय रहात नाहीं व तो आपले ठायीं संतुष्ट असतो. यदा कदाचित् प्रारब्धवशात् त्याला दैन्य दशा प्राप्त झाली तरी त्याचा खेद न करतां त्याचें मन आनंदीच असतें, व मृत्युसमय आला तरी तो खिन्न होत नाहीं.

वसिष्ठ ह्मणतातः—

**शून्यमाकीर्णतामेति मृत्युरप्युत्सवायते ।**
**आपत्संपदिवाभाति विद्वज्जनसमागमे ॥**

भावार्थः—ज्ञानी पुरुषाच्या संगतीनें, शून्य प्रदेश भरलेले दिसतात, मृत्यू आला तरी महोत्सवासारखा आनंद होतो, व दारिद्र्य संपत्तीसारखें दिसतें.

ज्याला हा साधुसमागम प्राप्त झाला त्याला जपतपादि साधनांच्या खटपटींत पडण्याची जरूर नाहीं. त्यानें यज्ञयागादिक न केले तरी तो कृतार्थ व्हावयाचाच. त्याला अशा गौण साधनांशीं काय करावयाचें आहे ?

वसिष्ठ ह्मणतातः—

**यः स्नातः शीतसितया साधुसंगमगंगया ।**
**किं तस्य दानैः किं तीर्थैः किं तपोभिः किमध्वरैः ॥**

भावार्थः—ज्यानें स्वच्छ व शीतल अशा साधुसमागमरूप गंगेंत स्नान केलें आहे, त्याला तप, दान, तीर्थं व यज्ञ, यांच्यांशीं काय करावयाचें आहे ?

यासाठीं साधकानें साधूंस शरण जाऊन सर्वभावें करून त्यांची सेवा करावी. कारण त्यांची कृपा झाली तर साधकाचें संसारबंधन तुटून तो कृतकृत्य होतो.

वसिष्ठ ह्मणतातः—

**विच्छिन्नग्रंथयस्तज्ज्ञाः साधवः सर्वसंमताः ।**
**सर्वोपायेन संसेव्यास्ते ह्युपाया भवांबुधौ ॥**

भावार्थः—ज्यांच्या ( हृदयाच्या ) ग्रंथी तुटल्या आहेत, ज्यांना खरें तत्वज्ञान झालें आहे, अशा सर्वमान्य साधूंची सर्व प्रकारें सेवा करावी. कारण हा भवसागर तरून जाण्याचे कामीं ते साधनीभूत आहेत.

वसिष्ठ ह्मणतातः—

**महानुभावसंपर्कात्संसारार्णवलंघने ।**
**युक्तिः संप्राप्यते राम दृढानौरिव नाविकात् ।**

भावार्थः—हे रामा ! जशी एखाद्या नावाड्यापासून समुद्र तरण्याकरितां मजबूत नौका मिळते, तशी महापुरुषाशीं गांठ पडली तर हा भवसागर तरून जाण्याची युक्ति सांपडते.

असा उपयुक्त व कल्याणकारक सत्संग अवश्य प्राप्त करून घेण्याची इच्छा साधकास सहज व्हावयाचीच. परंतु हे साधु असतात कोठें, त्यांची भेट कशी होईल, त्यांचा शोध कसा करावा, त्यांना धुंडीत कोठें जावें, इत्यादिक प्रश्न उत्पन्न होणें साहजिक आहे.

आतां परमार्थांत तरी असा नियम आहे कीं शुद्ध भावानें कोणताही प्रयत्न केला, व थोडक्यांत निराश न होतां दृढनिश्चयानें तो प्रयत्न चालू ठेवला तर आगे ना मागें फलसिद्धि अवश्य व्हावयाचीच. या नियमाप्रमाणें जो अनन्यभावानें संतांचें अन्वेषण करील त्याला सत्संगतीचा लाभ प्राप्त होईल यांत संशय नाहीं.

या जगांत सर्व तऱ्हेचे पदार्थ आहेत पण ज्याला ज्याचा ध्यास आहे त्याला तेच पदार्थ सर्वत्र दिसतात, कारण त्याची दृष्टी अन्य वस्तूंकडे जावयाची नाहीं. ह्मणून विषयी पुरुषास सर्वत्र विलासाचीं आणि विषयोपभोगाचींच साधनें दिसतात. पण जो खरा विरक्त आहे, व जो सद्भावानें मोक्षप्राप्तीचे प्रयत्नास लागला आहे, त्याला सर्वत्र मोक्षप्राप्तीचींच साधनें दिसावयाचीं. त्याचें लक्ष अन्य ठिकाणीं जावयाचें नाहीं.

आपण चालून आलेल्या मार्गाचें वर्णन रंभा करतेः—

**मार्गेमार्गे नूतनं चूतखंडं खंडेखंडे कोकिलानां विरावः ।**
**रावेरावे मानिनीमानभंगो भंगेभंगे मन्मथः पंचबाणः ॥**

भावार्थः—मार्गांत ठिकठिकाणीं नवा बहार आलेल्या आंबराई आहेत. प्रत्येक आंबराईंत कोकिलांचा शब्द ऐकूं येतो. कोकिलांच्या त्या शब्दाबरोबर मानिनी स्त्रियांचा मानभंग होतो. मानाचा भंग झाला कीं पांचही बाण घेऊन काम देव तयार आहेच.

पहा त्या सुंदर अप्सरेचें मन सदोदित शृंगारांत गुंतलें असल्या-मुळें, तिला स्त्रीपुरुषांच्या विलासांतील प्रमेयाशिवाय दुसरें कांहींच दिसत नव्हतें. रूपवती स्त्रिया व गुलहौसी तरुण यांचें परस्पर प्रेम, त्यांचे विलास, त्यांचे प्रणयकलह, त्यांचे विनोद, या शिवाय त्या बापडीस दुसरा कोणताही विचार सुचत नव्हता. सर्वकाल शृंगारांत मग्न झालेल्या देवांगनेला, या जगांत विषयोपभोगाहून व्यतिरिक्त कांहीं श्रेष्ठ कर्तव्य आहे, हें कसें समजावें ?

आतां ज्या रस्त्यानें रंभा तपोवनाला आली, त्याच रस्त्यानें पूर्वीं शुकमहाराजही आले होते. रंभेनें केलेलें रस्त्याच्या शोभेचें वर्णन ऐकून त्यांना परम आश्चर्य वाटलें. त्या विरक्त महात्म्यांची दृष्टी केवळ परमार्थाकडेच असल्यामुळें त्यांना यांतील कांहींच दिसलें नाहीं. ते आपला अनुभव रंभेस सांगतातः—

**मार्गेमार्गे निर्मलं ब्रह्मवृंदं । वृंदेवृंदे तत्वचिंतानुवादः ।**
**वादेवादे जायते तत्वबोधो । बोधेबोधे सच्चिदानंदभासः ॥**

भावार्थः—मार्गांत जिकडे तिकडे निर्मल ब्राह्मणांचे थवे आहेत. त्या थव्यांत तत्वज्ञानाची चर्चा चालली आहे. अशी चर्चा झाली ह्मणजे तत्वबोध होतो. बोध झाला कीं सच्चिदानंद ब्रह्म भासूं लागतें.

त्या महात्म्यास सुंदर स्त्रिया दिसल्या नाहींत. फुललेल्या पुष्पांची शोभा पुढें भासत असतांही तिकडे त्याचें लक्ष वेधलें नाहीं. वसंत ऋतूनें विकसित झालेली वनश्री त्याला मोहित करूं शकली नाहीं.

विषयोपभोगाच्या कोणत्याही वस्तूंकडे त्याचें निर्मल मन धांव घेत गेलें नाहीं. किंबहुना हे सर्व पदार्थ त्याला असून नसून सारखेच होते. ते आहेत किंवा नाहींत याबद्दल त्यानें तिळमात्रही विचार केला नाहीं. कारण त्याचें लक्ष अन्य विषयांकडे होतें. त्याला जिकडे तिकडे फक्त साधुपुरुषांचेच समुदाय दिसले. जो तो परमार्थसाधन करीत आहे असा त्याचा ग्रह झाला. कारण तो स्वतः अत्यंत विरक्त व परमार्थसाधनांत मग्न असल्यामुळें त्याला तत्वचिंतनाशिवाय दुसरें सर्व तुच्छ वाटत होतें. हा रंभाशुक संवाद मुमुक्षूनें ध्यानांत ठेवण्या-सारखा आहे. तेंच मनोहर उपवन रंभेस कसें भासलें, व शुकास कसें दिसलें याबद्दल मुमुक्षूनें विचार करावा, ह्मणजे त्याला आपले कर्त-व्यतेबद्दल उत्तम बोध होईल. असो.

श्री शुकमहाराजांच्या अनुभवाप्रमाणें सत्पुरुष सर्वत्र आहेत, त्यांचे भेटीसाठीं सायास करण्याची जरूरी नाहीं, असेंच ठरतें. पण या कलियुगांत तरी साधूंचे समुदाय इतके मोठे नसतात. वेषधारी साधु पाहिजे तितके सांपडतील. पण खऱ्या अनुभवी साधूची गांठ महद्भाग्याशिवाय पडावयाची नाहीं.

तुकोबाराय ह्मणतातः—

**कल्पतरु रुया नव्हती बाभुळा । पुरविती फळा इच्छिलिया ॥**
**उदंड त्या गाई ह्मैशी आणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनू ॥**
**तुका ह्मणे देव दाखवील दृष्टी । तया सवें भेटी थोर पुण्य ॥**

धोंडे, गारगोट्या, वगैरे अल्प मोलाचे पदार्थ हवे तितके मिळ-तात, पण हिरा, पाच, माणिक, यांसारखीं रत्नें मात्र महत्प्रयासानें व महत्भाग्यानें हातास लागतात. त्याचप्रमाणें ढोंगी व वेषधारी पुरुष सर्वत्र नजरेस पडतात. तरी खऱ्या संतांचें दर्शन महत्पुण्याशिवाय

होत नाहीं. पण ज्या भाग्यवान साधकास असे संत भेटतात, त्याला कृतार्थ व्हावयास विलंब लागत नाहीं.

अनुभवी साधूंची संख्या फारच अल्प आहे याजबद्दल मतभेद नाहीं.

भर्तृहरी ह्मणतात:—

**मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णाः ।**
**त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः पूरयंतः ।**
**परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यं ।**
**निजहृदि विकसंतः संति संतः कियंतः ॥**

भावार्थः—मनांत, वाचेंत, देहांत पुण्यरूपी अमृतानें भरलेले, तीनही भुवनांना उपकारांच्या परंपरेनें भरून टाकणारे, दुसऱ्यांचे गुण परमाणू इतके लहान असले तरी, त्यांला आपले अंतःकरणांत विकसित करून पर्वता येवढे मानणारे, असे सत्पुरुष या जगतांत किती आहेत?

फारच थोडे असें दुःखानें कबूल करावें लागतें. आतां नुसते पुण्यवान व सदाचरणी पुरुष इतके थोडे, तर अनुभवी सिद्ध याहीपेक्षां विरळा सांपडणार हें उघड आहे.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्वतः ॥**

भावार्थः—हजारों लोकांत एखादा कोणी सिद्धी मिळविण्यासाठीं यत्न करतो, व अशा सिद्धीसाठीं यत्न करणारांपैकीं एखादाच मला तत्वतः जाणतो.

आतां वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें अनुभवी संत फारच थोडे आहेत ही गोष्ट जरी खरी आहे, तरी असे पुरुष पृथ्वीवर बिलकुल नाहींतच, असा मात्र साधकानें आपला समज करून घेऊं नये. कारण अधिकारी साधकांचा उद्धार व्हावा, ही इच्छा दयाळू परमेश्वरास नेहमीं असतेच. व यासाठींच खऱ्या योग्यतेस चढलेल्या मुमुक्षूंवर अनुग्रह करून त्यांस कृतार्थ करण्याच्या उद्देशानें, या भूतलावर सर्वकाल सिद्धमहात्म्यांचे अवतार होत असतात.

आचार्य ह्मणतातः—

**शांतो महान्तो निवसंति संता वसंतवल्लोकहितं चरंतः ।**
**तीर्णाः स्वयं भीमभवार्णवं जना न हेतुनान्यानपि तारयंतः ॥**

भावार्थः—शांत व थोर असे संत या लोकीं आहेत. ते वसंतऋतूप्रमाणें सर्वांचें कल्याण करीत असतात. ते स्वतः हा संसारसागर तरून गेले असून, कांहीं अपेक्षा न करतां दुसऱ्यांस देखील तारतात.

महात्मे सर्व जगाचें दुःख पाहून मनांत कळवळतात, व त्यांस दीन प्राण्यांचें दुःख नाहींसे करावें ही इच्छा सहजच होते. ते सर्वत्रांवर शक्य तो उपकार करतात यांत नवल नाहीं, कारण तें या सत्पुरुषांचें ब्रीदच आहे.

आचार्य ह्मणतातः—

**अयं स्वभावः स्वतएव यत्परश्रमापनोदप्रवणं महात्मनां ।**
**सुधांशुरेषः स्वयमर्ककर्कशप्रभाभितप्तामवति क्षितिं किल ॥**

भावार्थः—दुसऱ्याचे कष्ट आपण होऊन नाहींसे करणें, हा महापुरुषांचा स्वाभावच आहे. सूर्याच्या तीव्र किरणांनीं तापलेल्या जमीनीस चंद्र हा आपण होऊन थंड करतोच.

ही गोष्ट खरी, तरी संतांची भेट पूर्वपुण्याईशिवाय होणार नाहीं. सत्संगासारखें अमोल्य साधन हातीं सांपडणें, व त्याच्या सामर्थ्यानें आपला उद्धार करून घेणें हें महद्भाग्यच समजलें पाहिजे. असा अपूर्व लाभ जन्मोजन्मींच्या सुकृतावांचून कसा मिळावा ?

**गंगेवाघविनाशिनी जनमनःसंतोषसच्चंद्रिका ।**
**तीक्ष्णांशोरपि सत्प्रभेव जगदज्ञानांधकारापहा ।**
**छायेवाखिलतापनाशनकरी स्वर्धेनुवत्कामदा ।**
**पुण्यैरेव हि लभ्यते सुकृतिभिः सत्संगतिर्दुर्लभा ॥**

भावार्थः—गंगेसारखी पापांचें क्षालन करणारी, जनांच्या मनाला चंद्राप्रमाणें संतोष देणारी, सूर्याच्या उत्तम तेजाप्रमाणें जगाच्या अज्ञानरूपी अंधकाराला नाहींसा करणारी, छायेप्रमाणें सर्व तापांचें हरण करणारी, आणि कामधेनुवत् इच्छित फल देणारी, अशी जी सत्संगति, तीं पुण्यवान प्राण्यांना पूर्व सुकृतामुळेंच मिळते.

शिवाय ईश्वरानुग्रहाचीही या कामीं अपेक्षा असते. कारण मोक्षासारखें महत्कार्य ईश्वरकृपेशिवाय साधतां येणार नाहीं.

आचार्य ह्मणतातः—

**दुर्लभं त्रयमेवैतद्देवानुग्रहहेतुकं ।**
**मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुषसंश्रयः ॥**

भावार्थः—मनुष्यत्व, मुमुक्षुत्व व महापुरुषांचा आश्रय, हीं तीनही दुर्लभ आहेत, व तीं प्राप्त होण्यास ईश्वराच्या कृपेची आवश्यकता आहे.

खऱ्या अनुभवी व मोक्षदायक संतांची भेट ईश्वरकृपेशिवाय होणार नाहीं, असें जर असलें, तर हा अलभ्य लाभ होईपर्यंत साधकानें काय करावें ? त्यानें अनन्यभावानें ईश्वराची उपासना करावी हें

सांगावयास नकोच. कारण ईश्वरास प्रसन्न करून घेतलें ह्मणजे सद्गुरु मिळण्यास अवकाश लागत नाहीं.

शिवाय ज्याला खरी ब्रह्मजिज्ञासा झाली आहे, त्यानें शास्त्राचें अवलोकन करून परोक्षज्ञान संपादन करावें. तसेंच शमदमादि साधनांचा शक्य तो अभ्यास करावा, होईल तितका विचार करावा व अनेक रीतीनें आपला शिष्यत्वाचा अधिकार वाढवावा.

हें सर्व ठीक आहे. पण सर्वांत सोपें असें वाखाणलेलें जें सत्संगरूपी साधन तें कोणतें? सिद्ध महात्म्यांची तर भेटही दुर्मिळ, मग मुमुक्षूनें कोणत्या संतांचे संगतींत रहावें, ह्मणजे त्यांची परमार्थांत शीघ्र प्रगति होईल?

याचें उत्तर असें आहे कीं, संत ही संज्ञा वास्तवीकरीतीनें अनुभवी सिद्धांसच देणें जरी उचित आहे, तरी ज्यांनीं कुमार्ग सोडून सन्मार्गाकडे पाऊल टाकलें, ज्यांनीं विरक्त होऊन शमदमादि साधनांचा अभ्यास सुरू केला, ज्यांना परोक्षज्ञान पूर्णपणें अवगत झालें आहे, व ज्यांची प्रगति परमार्थांत बरीच झाली आहे, अशा पुण्यवान साधकांसही संत ह्मटलें तर हरकत नाहीं, व अशा संतांच्या संगतीनेंही मुमुक्षूस अनेक रीतीनें परमार्थांत सहाय्य होण्याचा संभव आहे.

पण यावर अशी शंका निघते कीं, अपरोक्ष ब्रह्मज्ञान तर साधकाचा अंतिम हेतू आहे, व तें प्राप्त करून देण्यास अनुभवी मनुष्याचे सहाय्याची उपयुक्तता उघड दिसते. या कामीं जर नुसत्या साधकदशेंत असलेल्या मुमुक्षूंनीं एकमेकांस मदत करण्याचें आरंभिलें तर तें आंधळ्यानें आंधळ्यास रस्ता दाखविण्याप्रमाणें घातक होणार नाहीं काय? असें केलें तर कदाचित रस्ता दाखविणारा व त्या रस्त्यानें जाणारा हे दोघेही खरा मार्ग सोडून एखाद्या खड्ड्यांत पडण्याचा संभव आहे.

व्यवहारांत स्वतः अपूर्ति माहिती असलेल्या मनुष्यानें दुसऱ्यास शिकविणें अपकारकारक होण्याचा संभव असतो. पण परमार्थांत अशी भीति नसते. कारण जो प्रेमळ अंतःकरणानें व एकनिष्ठेनें आपली उन्नति होण्यासाठीं यत्न करतो, त्याला परमेश्वर स्वतः सहाय्यकारी होतो. आस्तिक मुमुक्षूंना योग्य दिशेकडे वळवून त्यांना सर्व रीतीनें प्रोत्साहन देण्याचें व त्यांचें रक्षण करण्याचें ब्रीद दयाळू परमेश्वरानें घेतलें आहे. ह्मणून जे त्याचे निःसीम भक्त असून, परमार्थाच्या साधनास लागले आहेत, अशा सत्पुरुषांचा पाठीराखा परमेश्वर आहे.

गीतेंत श्रीकृष्ण ह्मणतातः—

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजंते मां बुधाभावसमन्विताः ॥**

भावार्थः—मी सर्वांचें उत्पत्तिस्थान, मजपासून सर्वांची प्रवृत्ति होते, असें जाणून सुज्ञ पुरुष माझी भक्ति करतात.

हे उत्तम ईश्वरभक्त एकांतांत राहून ईश्वराची सेवा करीत नाहींत. ते एकत्र जमून, भजन कीर्तन वगैरे करून ईश्वराची सेवा करतात. या भक्तमेळ्यांत जे पुढारी असून, ज्यांची परमार्थांत बरीच प्रगति झाली आहे, असे सत्पुरुष इतर जनसमूहास उपदेश करतात, व त्यांना भक्तीचा व परमार्थाचा मार्ग दाखवितात; व त्याचप्रमाणें आपआपसांत परमार्थचर्चा करतात, व एकमेकांस सहाय्य करतात, व एकमेकांची भक्ति आणि ज्ञान वाढवितात.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतातः—

**मच्चित्तामद्गतप्राणा बोधयंतः परस्परं ।**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥**

भावार्थः—मजकडे आपलें चित्त लावून, आपला प्राण मजवर ठेऊन, ते एकमेकांस बोध करतात, व माझें कीर्तन करून आनंदानें आपला काळ घालवितात.

हे सर्व भक्त अद्यापी सिद्धदशेस आले नसून, एकमेकांस सहाय्य केल्यामुळें, आणि ईश्वराची भक्ति एकत्र मिळून केल्यामुळें त्या सर्वांस फायदा होतो, व ईश्वर त्या सर्वांवर संतुष्ट होऊन त्यांना ज्ञान देतो.

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकं ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥**

भावार्थः—सतत निष्ठा ठेवून व प्रीतिपूर्वक ते माझी भक्ति करतात, ह्मणून मी त्यांना खरें ज्ञान देतों, व त्याच्या योगानें ते मजजवळ येऊन पोहोंचतात.

भक्तांची कींव येऊन परमेश्वर त्यांस कसें ज्ञान देतो ? परमेश्वर तर सगुणरूपधारी नाहीं. मग तो एक एक भक्तासाठीं निरनिराळा अवतार घेऊन त्यांना उपदेश करतो काय ?

श्रीकृष्ण ह्मणतातः—

**तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥**

भावार्थः—त्यांजवर कृपा करण्याकरतां त्यांच्या अंतःकरणांत वास करून मी त्यांचा अज्ञानरूपी अंधकार प्रकाशमान ज्ञानदीपानें नाहींसा करतों.

ज्यांना सद्गुरूची भेट झाली नाहीं, पण जे ईश्वराचे पूर्ण अनुग्रहास पात्र झाले आहेत अशा भक्तांस ईश्वर स्वतः गुरू होऊन त्यांच्याच अंतःकरणांत स्फूर्तिरूपानें ज्ञान प्रगट करतो, व त्यांना कृतार्थ करतो.

यावरून श्रद्धावान व भक्तिमान साधकांची खात्री होईल कीं, त्यांनीं ईश्वरभक्ति करून, एकमेकांस उपदेश करणें, हें, अंधांनीं अंधांस वाट दाखविल्याप्रमाणें मूर्खपणाचें काम होणार नाहीं. कारण सर्व मुमुक्षूंची काळजी वाहणारा, सर्वज्ञ व सर्वशक्तिमान परमेश्वर त्यांना सहाय्य करून अखेर ज्ञानही देण्यास तयार आहे. त्यांनीं एकनिष्ठेनें भक्ति केली, व भजन कीर्तन करून साधनांचा अभ्यास सुरू ठेविला, ह्मणजे पुढील सर्व काळजी ईश्वरास लागली. त्यांनीं ईश्वरावर विश्वास ठेवून निर्भय असावें.

याप्रमाणें प्रेमळ भक्तांच्या संगतीनें मुमुक्षूंस सहाय्य होतें, व त्यांचा अभ्यास सुगम होऊन अखेर त्यांना ज्ञान प्राप्त होतें हें ठरलें. आतां ज्यांची निर्गुणावर निष्ठा बसली आहे, असे सद्गुणी व सद्वर्तन करणारे साधकांची संगतीही श्रेयस्कर आहे. या साधकांनींही एकत्र जमून एकमेकांस मदत केली तर त्यांत सर्वांचें कल्याण आहे. या साधकांनीं एकमेकांच्या सहाय्यानें आपला ज्ञानाभ्यास वाढवावा.

**तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनं ।**
**एतदेकपरत्वं च ज्ञानाभ्यासं विदुर्बुधाः ॥**

भावार्थः—निर्गुणब्रह्माचें चिंतन, त्याजसंबंधानें चर्चा आणि कीर्तन, व एकमेकांस बोध करणें, व सर्वदा निर्गुणब्रह्मनिष्ठ असणें, याला ज्ञानी पुरुष ज्ञानाभ्यास ह्मणतात.

आतां या ज्ञानाभ्यासाच्या प्रत्येक अंगापासून काय लाभ साधकांस होतो तें पाहिलें पाहिजे. प्रथम चिंतनाचें फल काय, या प्रश्नाचें उत्तर एकनाथ स्वामी देतातः—

**चिंतनें नासतसे चिंता । चिंतनें सर्व काम ये हाता । चिंतनें मोक्ष सायुज्यता । घर शोधीतसे ॥ ऐसें चिंतनाचें महिमान ।**

तारिले अधम खळजन । चिंतनें समाधान । प्राणिमात्रां होतसे ॥ चिंतनें तुटे आधिव्याधी । चिंतनें तुटतसे उपाधी । चिंतनें होय सर्व सिद्धि । एका जनार्दनाचे चरणीं ॥

कोणत्याही विषयाचें मनन सत्यान्वेषणबुद्धीनें, व सदंतःकरणानें केलें तर त्यापासून ज्ञानाची वृद्धि होते, असा अनुभव व्यवहारांतही आहे. त्याचप्रमाणें सर्व शंकांचें निरसन करून ज्ञानवृद्धि करण्यास मनन हें साधन परमार्थांतही आहेच.

आतां कीर्तनाचा महिमा केवढा आहे, हें एकनाथ स्वामी सांगतातः—

> योगी शिणती साधनीं । पावन होती ते कीर्तनीं ॥
> अष्टांग धूम्रपान । तया श्रेष्ठ हें साधन ॥
> समाधी उन्मनी । कीर्तनीं पावन हे दोनी ॥
> चौदेहासीं अतीत । कीर्तनीं होती ते मुक्त ॥
> कीर्तनछंद निशिदिनीं । एका शरण जनार्दनीं ॥

कीर्तनाच्या योगानें श्रद्धायुक्त वक्ता व श्रोता हे दोघेही पावन होतात. दोघांचीही परमार्थांत प्रगति होते, व अखेर दोघेही मुक्त होतात.

आतां साधकांनीं परस्परांस बोध करणें, हें सर्वांस सारखें हितावह आहे, हें सांगावयास नको. ज्याला जितकें समजलें तितकें त्यानें इतरांस समजवावें; व इतरांस समजलेलें आपण प्रांजलबुद्धीनें शिकावें. असें केलें ह्मणजे सर्व साधकांच्या ज्ञानांत भर पडत जाईल, व त्यांची उन्नति होत जाईल. याप्रमाणें जे साधक एकमेकांच्या संगतीचा लाभ घेतात, त्यांचा इष्ट हेतू लौकरच सिद्धीस जातो.

ह्मणून सर्व मुमुक्षूंनीं आपला वेळ सत्संगांत घालवावा. ही सत्संगती जर सुदैवानें अनुभवी सिद्ध गुरूंची मिळाली, तर त्यांचा

कार्यभाग सर्वोत्कृष्टच साधला असें समजावें. पण कर्मधर्मसंयोगानें अशा महत्म्यांची भेट जरी झाली नाहीं, तरी खिन्न न होतां, मुमुक्षूंनीं प्रेमळ, सद्गुणी, सदाचारी व श्रद्धावंत साधकांसच संत मानून त्यांचे संगतींत सर्वकाळ रहावें, ह्मणजे त्यांतच त्यांचें कल्याण होईल; व त्यांची परमार्थांत प्रगति होऊन अखेर ते मुक्तीचे अधिकारी होतील.







# परमार्थपर व्याख्यानमाला.

६

## उपदेश व श्रवण, मनन, आणि निदिध्यास.

सत्संगापासून मुमुक्षूंस, व इतर जनांसही अनेक रीतीनें लाभ होतो, हें मागील व्याख्यानांत व्यक्त झालेंच आहे; आणि यासाठींच सर्व साधनांत सत्संग हें साधन श्रेष्ठ मानलें आहे. सत्संगापासून, मुमुक्षूनें स्वतः कांहींएक न करतांही, त्याजवर बराच इष्ट परिणाम घडतो, याचें कारण संतांचे अंगीं असलेलें सामर्थ्य हें होय.

आपल्या पुरातन ग्रंथांतून साधूंच्या अंगीं एक अपूर्व शक्ति असल्याबद्दलचीं वर्णनें आढळतांत. ती शक्ति अशी कीं, सत्पुरुषाजवळ कोणताही प्राणी आला ह्मणजे, त्या प्राण्याचे अंगीं असलेला दुष्ट स्वभाव जाऊन, तो शांत स्वभावाचा होतो, हिंस्रपशूही आपला नैसर्गिक क्रूरपणा सोडून अगदीं निरुपद्रवी व सौम्यस्वभावाचे होतात, व जे नेहेमीं त्यांचे भक्ष्यस्थांनीं पडावयाचे, असे प्राणी समोर दिसत असतांही, त्यांचा वध करून आपली क्षुधा शांत करावी, अशी इच्छा त्या हिंस्रपशूंस होत नाहीं.

विश्वामित्र ऋषीच्या तपोवनांत शिरल्यावर, अतिशय आश्चर्य वाटण्यासारखा देखावा हरिश्चंद्र राजाचे नजरेस पडला. त्याचें वर्णन मुक्तेश्वर कवीनें केलें आहे.

**प्रवेश करितां तये वनीं । राजा आश्चर्य देखे नयनीं । धेनु-व्याघ्र एके स्थानीं । एकमेकां चाटिती ॥ नकुल-सर्प क्रीडती सुखें । मार्जारीस्तना लागती मूषकें । सिंह-करी करीत कौतुकें । वनामाजीं विचरती ॥ निर्वैर श्वापदांचे गण । देखोनि रायाचें विस्मित मन ।**

महात्म्यांचे सांनिध्याचा परिणाम पशुपक्षादिकांवरच होतो असें नाहीं. तर वनस्पती, झाडेंझुडपें, व निर्जीव पदार्थांवरही होतो, असा पूर्वींचे लोकांचा समज होता. निदान कांहीं कवींनीं तरी या प्रकारचें वर्णन केलें आहे. वासिष्ठ ऋषीच्या धेनूचें रक्षण करण्याकारितां तिचे मागून वनांत दिलीप राजानें प्रवेश करतांच काय झालें तें पहा.

कालिदास ह्मणतातः—

**शशाम वृष्ट्यापि विना दवाग्निः । आसीद्विशेषा फलपुष्पवृद्धिः ।**
**ऊनं न सत्वेष्वधिको बबाधे । तस्मिन्वने गोप्तरि गाहमाने ॥**

भावार्थः—रक्षण करणाऱ्या त्या राजानें प्रवेश करतांच, पर्जन्य पडल्याशिवाय वणवा विझाला, फळें व फुलें यांची फार वृद्धि झाली, व प्राण्यामध्यें जो बलवान तो अशक्तांस त्रास देईनासा झाला.

या वर्णनावर आधुनिक विद्वानांची श्रद्धा बसणें अर्थात् अशक्य असेंच समजलें पाहिजे. पण यांत वरीच अतिशयोक्ति आहे, असें जरी कबूल केलें, तरी मनुष्यप्राण्याच्या सहवासानें अनेक हिंस्र प्राणी, व इतर क्रूर आणि मदोन्मत्त प्राणी अगदीं माणसाळतात, व सौम्य व निरुपद्रवी होतात हा अनुभव प्रत्यक्ष येतो. जे दुष्ट पशू वनामध्यें स्वतंत्र असतांना जवळ कोणासही येऊं देत नाहींत, आलाच तर त्यावर हल्ला करून त्याला ठार मारतात, अगर घायाळ करतात, तेच माणसाळल्यावर एखादें लहान, व अशक्त मूल जरी जवळ गेलें,

तरी त्यास इजा करित नाहींत; इतकेंच नव्हे, तर उलट आनंद व प्रेम व्यक्त करतात. हा प्रभाव मनुष्याचे संगतीचा व शिक्षणाचाच ना?

प्रस्तुत प्रसंगीं एवढेंच मानलें तर पुरे कीं, साधूंच्या संगतीनें दुष्ट मनुष्यांचेही विचार बदलून त्यांचे अंगीं सौजन्य येतें. तसेंच सत्संगतींत असलेल्या मनुष्याचें मन हळूहळू विषयांकडून वळून परमार्थाकडे लागतें. हा इष्ट परिणाम केवळ साधुसमागमानें मनुष्याचे वृत्तींत फेरफार झाल्यामुळेंच होतो, असें ह्मणावें लागतें.

सोयरोबा ह्मणतातः—

**साधूनां दर्शनं पुण्यं वैराग्यलाभदं शुभं ।**

भावार्थः—साधूंचें दर्शन पावन करणारें, वैराग्याचा लाभ देणारें, व कल्याणकारक आहे.

संतांच्या दर्शनानें जर इतका लाभ होतो, तर जो सत्संगतींत वास करतो, व विशेषतः ज्याच्यावर संत कृपा करतात, त्याचें कल्याण होतें यांत काय नवल?

निळोबा ह्मणतातः—

**संतीं जया हातीं धरिलें । ब्रह्म सनातन ते पावले ॥**
**आणिकां दुर्लभ जें साधनें । यांच्या प्राप्त अवलोकनें ॥**
**फळ अनपेक्ष पावती । प्राणीयांचिये संगती ॥**
**निळा ह्मणे कल्पतरू । सामान्य दाते हे ईश्वरू ॥**

साधूंच्या सहवासानें मनुष्याचे चित्तांत आपोआप फरक होऊन त्याची श्रद्धा वाढते, व तो धर्माकडे जास्त वळतो, इतकें तर युरोप खंडांतील लोकही कबूल करतात.

एक आंग्ल कवी ह्मणतोः—

And fools, who came to scoff, remained to pray.

भावार्थः—जे मूर्ख लोक निर्भत्सना करावयास येत, ते प्रार्थना करण्यास रहात असत.

याप्रमाणें सत्संगतीचा प्रभाव तर आहेच, व मुमुक्षूनें स्वतः जरी कांहीं केलें नाहीं, तरी सत्संगतीपासून त्याला कांहीं तरी लाभ होईलच. पण कांहीं न करतां उगीच स्वस्थ बसणें हें मुमुक्षूस शोभणार नाहीं. त्याला मोक्ष मिळविण्याची जर खरी इच्छा असली, तर त्यानें स्वतः दीर्घ प्रयत्न केला पाहिजे, आणि आपली उन्नति करून घेतली पाहिजे.

सत्संगापासून पूर्णपणें लाभ करून घेण्यासाठीं मुमुक्षूनें काय काय केलें पाहिजे, इकडे आतां लक्ष देणें अवश्य आहे. मोक्षाचें प्रत्यक्ष साधन ज्ञानच आहे, व तें ज्ञान अनुभवी संतांकडूनच मिळणें शक्य आहे, ह्मणून सत्संगाचा लाभ झाल्यावर मुमुक्षूनें प्रथम ज्ञानप्राप्तीसाठींच यत्न केला पाहिजे. आतां हें ज्ञान कसें मिळवावें, या प्रश्नाचें उत्तर श्रीकृष्ण गीतेंत देतातः—

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः ॥**

भावार्थः—तें ज्ञान तूं शरण येऊन नमन केलेंस, सेवा केलीस, व नंतर प्रश्न केलास ह्मणजे तत्वदर्शी ज्ञानी तुला उपदेशरूपानें देतील.

या भगवद्वचनाचा आतां नीट विचार झाला पाहिजे. प्रथम भगवान ह्मणतात कीं, तें ज्ञान तुला संतांच्या उपदेशानें मिळेल. पण ज्ञानदाते संत अनुभवी ब्रह्मवेत्तेच असले पाहिजेत. इतरांस स्वतः साक्षात्कार झाला नसल्यामुळें, त्यांचा उपदेश कामीं पडणार नाहीं.

एकनाथ स्वामी ह्मणतातः—

**संतवचनें साधे मुक्ती । संतवचनें ब्रह्मस्थिती । कर्माकर्मांची शांती । संतवचनें ॥ संतवचनें ब्रह्मप्राप्ती । संत-**

**वचनें सायुज्यमुक्ती । ब्रह्मादि पदें येती । संतवचनें समोर ॥ संतवचनें सर्व सिद्धी । संतवचनें समाधी । संतवचनें उपाधी । एका जनार्दनीं तुटतसे ॥**

म्हणून मुमुक्षूला ज्ञानप्राप्तीसाठीं खऱ्या अनुभवी संतांच्या उपदेशाची आवश्यकता आहे. आतां हा उपदेश संतांची कृपा झाल्याशिवाय मिळणार नाहीं. म्हणून मुमुक्षूनें प्रथम त्यांना अनन्यभावानें शरण जाऊन, त्यांचे पाय वंदावे. हाच मोक्षदायक ज्ञान संपादन करण्याचा उत्तम उपाय आहे.

भागवतांत रहूगण राजास जडभरत सांगतात:—

**रहूगणैतत्तपसा न याति न चेज्यया निर्वपणाद्गृहाद्वा । न छंदसा नैव जलाग्निसूर्यैर्विना महत्पादरजोभिषेचनं ॥**

भावार्थ:—रहूगणा ! हें अज्ञान तपानें जात नाहीं, यागानें नाहीं, संन्यास घेऊन घराबाहेर गेल्यानें नाहीं, जल, अग्नी किंवा सूर्य यांच्या आराधनानें नाहीं. महात्म्यांच्या पादरजानें अभिषेचन झाल्याशिवाय तें नष्ट होणार नाहीं.

अज्ञान गेल्याशिवाय साक्षात्कार कसा व्हावा ? म्हणून सत्पुरुषांस शरण जाऊन त्यांचे पाय धरले पाहिजेत.

तुकोबाराय म्हणतात:—

**सद्गुरूवांचूनीं सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं त्यांचे ॥ आपणा सारिखे करिती तात्काळ । नाहीं काळ वेळ तया लागीं ॥ लोह-परिसाची न साहे उपमा । सद्गुरु महिमा अगाधचि ॥**

हें नमन नुसतें बाह्यात्काराचें नसावें. मुमुक्षूनें संतांविषयीं अति पूज्यबुद्धि मनांत धरून त्यांस अनन्यभावानें शरण गेलें पाहिजे. पण

इतक्यानेंच सर्व काम झालें नाहीं. शरण जाऊन एकदांच नमन करून मुमुक्षूचें कर्तव्य संपलें नाहीं. श्रीकृष्णांनीं अर्जुनास संतांची सेवा कर असा उपदेश केला आहे.

कारणः—

**महत्सेवां द्वारमाहुर्विमुक्तेः ।**

भावार्थः—महापुरुषांची सेवा हें मुक्तीचें द्वार आहे, असें ह्मणतात.

परंतु सेवाधर्म हा सर्वांत नीच आहे. त्यास अज्ञ, व दारिद्र्यानें पीडित लोकही कंटाळतात. मग व्यावहारिकदृष्ट्या अर्जुनासारखे राज्यश्री भोगीत असलेल्या पुरुषांनीं संतांची सेवा कां करावी ? त्या-सेवेशिवाय भागत नाहीं काय? त्या सेवेपासून असे काय फायदे व्हावयाचे आहेत ? याचें उत्तर असें आहे कीं:—

**यथोपश्रियमाणस्य भगवंतं विभावसुं ।**
**शीतं भयं तमश्चेति साधूनां सेवनात्तथा ॥**

भावार्थः—जसें सूर्याचा आश्रय केला ह्मणजे शीत, भय, आणि अंधःकार हीं तीन्हीं नाहींशीं होतात, त्याचप्रमाणें साधूंची सेवा केली ह्मणजे होतें.

वाहवा ! अर्जुनासारख्यास उत्तम शालजोडयांची वाण होती काय? त्या क्षत्रियवीरास कोणाचें भय होतें ? त्याला अंधःकाराचा नाश करण्या करतां उत्तम दीप मिळत नव्हते काय ? मग त्याला शीत, भय, व अंधःकारापासून दुसरा त्राता कशास पाहिजे होता ?

साधूंच्या सेवेपासून मिळणारे लाभ लौकिक नव्हत. साधूसेवे-पासून पारमार्थिक लाभ होतात. साधूंच्या सेवेनें, दया, क्षमा वगैरे सद्गुणांच्या अभावामुळें होणारें हृदयाचें शैत्य नाहींसें होतें, व अंतः-करणांत अनेक सद्गुण उदित होऊन विकास पावतात. त्याचप्रमाणें

अत्यंत उद्वेग उत्पन्न करणारें भवरोगाचें भयही नाहींसें होतें. या भवभयापुढें शूरवीरही निस्तेज होतात, व हें भय साधुपुरुषाशिवाय दुसरे कोणासही दूर करतां येणार नाहीं. आतां संतांचे सेवेनें नाहींसा होणारा अंधकार, सामान्य रात्रीचा अंधकार नव्हे, तर मायेच्या प्रभावानें उत्पन्न होणारा, जो मूल अज्ञानरूपी अंधकार तो समजावा. या अंधकाराचा नाशही सत्पुरुषावांचून दुसरा कोणी करूं शकणार नाहीं.

सूर्य सर्व जग प्रकाशित करतो. सूर्याच्या उजेडानें जगांतील सर्व क्रिया चालतात. तरी तो सत्पुरुषांची बरोबरी करूं शकणार नाहीं.

कारण भगवान ह्मणतातः—

**संतो दिशंति चक्षूंषि वहिरर्कः समुत्थितः ।**
**देवता बांधवाः सन्तः सन्त आत्माहमेवच ॥**

भावार्थः—सूर्य बाहेर उगवतो, पण संत ( अंतर ) दृष्टि देतात. संत हे बांधव होत, देवता होत, संत हे मी आत्माच आहेत असें समजावें.

संतांचा महिमा सूर्यापेक्षांही जास्त आहे, कारण सूर्य फक्त या बाह्य अंधकाराचा नाश करून जग प्रकाशमय करतो, तरी त्या प्रकाशाचा अंधास काय उपयोग? पण हे संत एकतर अज्ञानांधकाराचा नाश करतात, व शिवाय त्यांच्या कृपेनें मुमुक्षूंस दिव्य अंतर्दृष्टि मिळून आत्मसाक्षात्कार होतो.

शिवाय या संसारसागरांत बुडून भय पावलेल्या प्राण्यांस संतांसारखा अन्य त्राता कोणी नाहीं.

**निमज्जोन्मज्जतां घोरे भवाब्धौ परमायनं ।**
**संतो ब्रह्मविदः शांता नौर्दृढेवाप्सु मज्जतां ॥**

भावार्थ:—जशी एखादी मजबूत होडी पाण्यांत बुडणाराला तरणोपाय होते, त्याप्रमाणें या भवसागरांत बुडणारे प्राण्यांना शांत व ब्रह्म जाणणारे संत हेच उत्तम तरणोपाय होतात.

ह्मणून या संतांची सेवा करणें, हें मुमुक्षूंचें आदिकर्तव्य होय. पण याजवर अशी शंका निघते कीं, संतांच्या अंगीं असणाऱ्या अनेक सद्गुणांत लीनता व दया हे आहेत. मग मुमुक्षू शरण येऊन चरणावर मस्तक ठेवल्याबरोबर त्याजवर दया न करतां, त्याजकडून सेवा करून घेणें संतांस कसें शोभेल ? नुसतें नमनही स्वीकारणें त्यांना कठीण वाटणार, मग सेवा घेणें तर एकीकडेच राहिलें. शिष्याकडून जे सेवा घेतात, व जे त्यांस सेवा करा, असें आग्रहानें सांगतात, ते संतच नव्हत.

श्री विठोबा नामदेवास सांगतात:—

**आपण न सांगती आपुलें गुज । पुढीलासि ह्मणती न कळे तुज । ऐसें संदेहकरणीचें भोज । वाटे तया ।। शिष्य करितां उल्हासती । शिष्य होई ह्मणोनि उपदेशिती । नानापरी बोधिती । सेवेलागीं ।। शिष्य करिती बहुवस । त्यांच्या सेवेची करिती आस । जो न भजे त्यास । शिव्या–शाप देताती ।। ज्ञानगर्वाचा महिमा बरवा । श्रीगुरु ऐसा अखंड भावा । शिष्य समुदाय देखोनि गर्वा । थोरिवेचा मानिती ।।**

उपदेशाच्या नांवानें तर शून्याकार, पण उगीच शिष्यांकडून यथेच्छ सेवा मात्र करून घ्यावयाची, त्यांचा समुदाय पाहून गर्वास चढून आपणास थोर मानावयाचें, व सद्गुरु असें ह्मणून घ्यावयाचें, असें ज्यांचें आचरण आहे, ते संतच नाहींत हें उघड ठरतें. आतां संतांचें आचरण कसें असतें तें पहा.

नामदेवास विठोबा ह्मणतातः—

**असो बहु ऐसें कथन । परि सद्गुरु कृपाघन । त्यांचें ऐका महिमान । सावध चित्तें ॥ ज्यासी गुरुत्वाचें नाहीं काज । शिष्य भजतां वाटे लाज । उदास वृत्ती सहज । निर्मळ भोळा ॥ निंदास्तुती समान । बोलतांही कठिण वचन । कधीं न होती क्रोधायमान । कवणाही वरी ॥ शिष्य करितांही आळस चित्तीं । केलिया ही सर्वस्व निरोपिती । कांहीं थोराव नाहींच चित्तीं । महत्वाचा ॥ ऐसा साधु भेटेल तुज । तरी मीचि होवोनी पावसी मज । जाईल सर्व संदेह आज । आपेआप नाम्या ॥**

खरोखर ह्मटलें ह्मणजे, ब्रह्म जाणणाऱ्या ब्राह्मणानें आपली स्तुति किंवा सन्मान करून घेऊं नये, कारण त्याजपासून अहंकाराचा उगम होऊन बद्धपणा अंगीं जडण्याची भीती असते.

मनु ह्मणतातः—

**सन्मानाद्ब्राह्मणो नित्यमुद्विजेत विषादिव ।**
**अमृतस्येव चाकांक्षेदवमानस्य सर्वदा ॥**

भावार्थः—जो खरा ( ब्रह्म जाणणारा ) ब्राह्मण आहे त्यानें नित्य सन्मानाचा विषाप्रमाणें उद्वेग मानला पाहिजे, व अपमानाची अमृताप्रमाणें आवड धरली पाहिजे.

याचा मतलब एवढाच कीं, अपमानानें अहंकाराचा नाश होऊन लीनता अंगीं येते. पण सन्मानानें अहंकार वृद्धिंगत होऊन मनुष्यास गर्व येतो, व तो पुनः मायेच्या गोत्यांत सांपडून बद्ध होतो. जे खरे संत आहेत, ते लीनतेचेंच अवलंबन करून, सर्वदा सावध रहातात, व आपले जीवन्मुक्तस्थितींत व्यत्यय येऊं देत नाहींत. मुमुक्षूंनीं अशाच संतांचा उपदेश घेतला पाहिजे.

तुकोबाराय ह्मणतातः—

शिष्याची जो न घे सेवा । मानी देवासारिखें ॥
त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥
त्यांचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभाव ॥
तुका ह्मणे सत्य सांगें । येोत रागें येती ते ॥

सारांश खऱ्या संतांस सन्मानाची मुळींच जरूर नसते, व आपली सेवा कोणीही करावी, अशी त्यांची इच्छा बिलकूल नसते. ते अनुग्रह करावयास नेहेमीं तयार असतात. पण त्यांचा उपदेश शिष्य पूर्ण अधिकारी असला तरच तात्काल फलद्रूप होऊन, शिष्य कृतार्थ होतो.

पण जर शिष्यास अजून योग्य अधिकार प्राप्त झाला नसला तर त्यानें भगवंताचे उपदेशाप्रमाणें आपले कल्याणाकरतां संतांची सेवा अवश्य करावी, ह्मणजे त्याची योग्यता वाढत जाईल, व अखेर तो मुक्तीचा अधिकारी होईल. शिष्याचें कल्याण व्हावें ह्मणून त्यानें केलेली सेवा संत निरुपायास्तव मान्य करतात. पण ते आपण होऊन कोणासही नीच किंवा त्रासदायक काम करावयास सांगत नाहींत. इतकेंच नव्हे तर शिष्यानें फार कष्ट केले तर ते बिचारे संत दुःखी होतात.

आतां शिष्य व गुरू या दोघांसही भूषणावह पुढील प्रकारची सेवा होईल. पूज्यबुद्धीनें, व प्रेमळ अंतःकरणानें गुरूची आज्ञा सदैव पाळणें यासारखी उत्तम सेवा दुसरी नाहीं. पण खरे गुरू शिष्यास स्वार्थबुद्धीनें आपले स्वतःचे सुखासाठीं कोणतेंही काम कर असें कधींही सांगावयाचे नाहींत. त्यांची नजर शिष्याचे कल्याणाकडेच नेहेमीं असावयाची, व ते शिष्यास हितावह होतील अशाच आज्ञा करतील. उदाहरणार्थ शिष्य शीघ्रकोपी असला, अथवा लोभी असला, तर बाप्पा माझे आज्ञेनें तूं क्रोध व लोभ सोडून दे, हेंच

ते शिष्यास सांगणार. अथवा तूं शमदमादिकांचा अभ्यास अमुक रीतीनें करीत जा, व त्यांत व्यत्यय पडूं देऊं नको असाच शिष्यास हुकूम फर्माविणार. सारांश विरक्त व निस्पृह साधु आपले स्वार्थाकडे अथवा सुखाकडे लक्ष न देतां, अनपेक्ष बुद्धीनें शिष्याचें कल्याण करण्याच्या उद्देशानें त्याला सन्मार्गाकडे वळवून त्याचें चित्त शुद्ध करतील, व अखेर त्याजवर अनुग्रह करतील.

आतां आज्ञाधारक सेवकांवर व भक्तांवर प्रसन्न होणें हा सर्व देह धारण करणाऱ्या विभूतींचा धर्मच आहे. संतांची सर्वत्र समदृष्टि जरी असली तरी अशा शिष्यांविषयीं त्यांस विशेष कळकळ वाटणें स्वाभाविकच आहे. सर्वशक्तिमान व निष्पक्षपातीं ईश्वरही प्रत्यक्ष काय बोलतो तें पहाः—

**समोहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहं ॥**

भावार्थः—मी सर्वभूतांचे ठायीं सारखा आहें, माझा कोणी आवडता नाहीं, व मी कोणाचा द्वेष करीत नाहीं. परंतु जे मला भक्तिपुरःसर भजतात, ते माझे ठायीं वास करतात, व मी त्यांचे ठायीं वास करतों.

असें जर न्यायी व दयाळू ईश्वर स्वतः कबूल करतो, तर मनुष्यमात्राची काय कथा? व सेवा करणाऱ्या शिष्यांवर संतांची मर्जी प्रसन्न झाली तर काय नवल? अशा शिष्यांवर जर त्यांनीं आनंदानें व उत्साहानें अनुग्रह केला तर तेंही उचितच होईल.

शिष्यानें आपलें हित साधण्याकरितां संतांची सेवा, त्यांचे आज्ञेची वाट न पाहातां, केली पाहिजे.

ज्ञानेश्वर महाराज ह्मणतातः—

**तें गा ज्ञान पैं बरवें । जरि मनीं आथि आणावें । तरि संतांतें**

**भजावें । सर्वस्वेंसी ॥ जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारिवंटा । तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ॥ तरी तनुमनजीवें । चरणासी लागावें । आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥**

गुरूची सेवा केली ह्मणजे शिष्याचा अधिकार वाढत जातो, आणि गुरूंनीं केलेला उपदेश फलद्रूप होतो. एरवीं सेवेवांचूनही दयाळू सद्गुरूंची कृपा झाली, व उपदेश शिष्यास मिळाला तरी, अनुभव होणें कठीण आहे.

ज्ञानेश्वर ह्मणतातः—

**गायधड जोडे गोमटी । ते तैंचि पय दे किरीटी । जैं जाणिजे हातवटी । सांजवणीची ॥ तैसा सद्गुरू प्रसन्न होय । शिष्य विद्याही कीर लाहे । परि ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥**

ह्मणून गुरुशिष्यसांप्रदायानें चालत आलेल्या मार्गानें शिष्यानें गुरूची सेवा करीत जावी. पण काय हो ! हे तुमचे संत सदासर्वदा ब्रह्मानंदांतच निमग्न असणार. त्यांचें मन अद्वैतांत लीन असतें. द्वैताकडे ते पहातसुद्धां नाहींत. मग शिष्यानें कितीही सेवा केली तरी त्या बिचाऱ्याची दाद कशी लागावी ? संत शरण आलेल्याचा अव्हेर कधींही करणार नाहींत. केवल आत्मसुखानुभवांत तल्लीन होऊन योग्य अधिकार असलेल्या शिष्याची उपेक्षा जर ते करतील, तर त्यांच्या ब्रीदास हानी येईल.

वसिष्ठ ह्मणतातः—

**ज्ञानिनामपि चित्तं चेत्केवलात्मसुखोदितं ।**
**सत्वाः संसारदुःखार्ताः कं यांति शरणं तदा ॥**

भावार्थः—जर ज्ञान्याचेंही चित्त केवल आत्मसुखांतच गुंतून राहिलें, तर संसारदुःखानें व्याकुळ झालेल्या प्राण्यांनीं कोणाला शरण जावें ?

पण संत दयाळू असतातच, आणि अनेक श्रम सोसून आपण संपादन केलेल्या ज्ञानाचा उपदेश ते सच्छिष्यास करावयास तयार असतात. तसें त्यांनीं न केलें तर त्यांजकडे दोष येईल. पण अत्युच्च स्थितीस पावलेले साधू दोषास वश होणार नाहींत.

विश्वामित्र ऋषी वसिष्ठांस सुचवितातः—

**तज्ज्ञानं स च शास्त्रार्थस्तद्विज्ञानमखंडितं ।**
**सच्छिष्याय विरक्ताय साधो यदुपदिष्यते ॥**

भावार्थः—हे साधो, जें विरक्त व उत्तम शिष्यास उपदेशरूपानें दिलें जातें, तेंच खरें ज्ञान, तोच खरा शास्त्रार्थ, व तेंच अखंडित विज्ञान होय.

शिवाय ज्यांनीं या सर्व संसारबंधापासून आपली सुटका करून घेतली, जे जीवन्मुक्त स्थितींत आपला काल घालवितात, त्यांना अज्ञान जीवांस ज्ञान देऊन त्यांचा उद्धार करणें एवढेंच कर्तव्य राहिलें असतें, याशिवाय दुसरें तें कांहीं करूं इच्छीत नाहींत. अज्ञास बोध करण्याचे पूर्वीं त्यानें आपली स्तुति किंवा सेवा करावी अशी संतांची अपेक्षा नसते. त्यानें जरी संतांची उघड निंदा केली, तरी त्यास बोध व्हावा हीच इच्छा मनांत धरून ते त्याबद्दल कळकळीनें यत्नही करतात. संतांस स्तुतीचा हर्ष नाहीं, व निंदेचा राग नाहीं. ते समदृष्टीनें सर्व जगताचें कल्याण इच्छितात, व त्याबद्दल झटतात.

पंचदशींत तृप्तिदीपांत म्हटलें आहेः—

**अधिक्षिप्तस्ताडितो वा बालेन स्वपिता तदा ।**
**न क्लिश्नाति न कुप्येत बालं प्रत्युत लालयेत् ॥**
**निंदितः स्तूयमानो वा विद्वानज्ञैर्न निंदति ।**
**न स्तौति किंतु तेषां स्याद्यथा बोधस्तथाचरेत् ॥**

येनायं नटनेनात्र बुध्यते कार्यमेव तत् ।
अज्ञप्रबोधान्नैवान्यत् कार्यमस्त्यत्र तद्विदः ॥

भावार्थः—अगदीं लहान (स्तनपान करणाऱ्या) बालकानें जरी आपले पित्याचा अपमान केला किंवा त्याला मारलें, तरी तो पिता कष्टी होत नाहीं किंवा रागावत नाहीं, तर उलट त्या बालकाचे लाड करतो.

त्याचप्रमाणें अज्ञमनुष्यांनीं ज्ञानी पुरुषाची निंदा किंवा स्तुति केली, तरी तो उलट त्यांची निंदा किंवा स्तुती करीत नाहीं, पण त्यांना ज्याच्या योगानें बोध होईल, असें आपलें आचरण ठेवतो.

ज्या नटनानें या अज्ञ मनुष्यास बोध होईल, तें ज्ञान्यानें जरूर केलें पाहिजे. कारण अज्ञांना बोध करण्याशिवाय तत्वज्ञांना दुसरें कर्तव्यच नसतें.

असो. ज्ञानी पुरुषानें अज्ञास बोध करावा, असें जरी असलें, तरी ज्ञानी पुरुष सर्वांवर एकाच वेळेस अनुग्रह करतात असें नाहीं. कांहीं भाग्यवान प्राण्यावर ते लौकर कृपा करतात; पण इतरांनीं बराच वेळ सेवा केली तरी उपदेशाला ठिकाण नसतें. मग त्या बिचाऱ्या मुमुक्षूनें काय करावें? तो निराश व खिन्न झाला तर त्यांत काय नवल?

याचें उत्तर असें आहे कीं, उपदेश व्हावयास वेळ लागला तरी मुमुक्षूनें आपलें धैर्य खचूं देऊं नये, व संतांस उगीच दूषण लावूं नये. गुरूची आपणावर अवकृपा आहे, असें न समजतां, आपला अजून असावा तसा अधिकार नाहीं, व ह्मणूनच अनुग्रह होत नाहीं असा त्यानें निश्चय करावा, व आपली चित्तशुद्धि वगैरे करण्याचा प्रयत्न त्यानें नेटानें सुरू करावा. उगीच रंजीस होऊन त्यानें सत्संगतीचा त्याग करूं नये. कारण सत्संगतींत प्रत्यक्ष उपदेश न मिळाला तरी, अनेक फायदे आहेत.

भर्तृहरी ह्मणतातः—

**उपचरितव्याः संता यद्यपि वितरंति नैकमुपदेशं ।**
**यास्तेषां स्वैरकथास्ता एव भवन्ति शास्त्राणि ॥**

भावार्थः—संत जरी एकही उपदेशाचें वाक्य बोलत नसले, तरीही त्यांजजवळ जात असावें; कारण त्यांच्या ज्या सहज गोष्टी, त्याच शास्त्रें होतात.

ह्मणून प्रत्यक्ष जरी उपदेश झाला नाहीं, तरी अनायासानें त्याला शास्त्रांतील विषय कळों लागतील, कारण संतांच्या कथा वियषोपभोगाविषयीं कधीं नसावयाच्या. त्या कथांत अद्वैतशास्त्रांतील कोणत्या तरी तत्वांचींच चर्चा असणार. ह्मणून त्यांच्या श्रवणानेंही मुमुक्षूस परोक्ष तत्वज्ञानाचा लाभ व्हावयाचाच. शिवाय संतांचा अनुग्रह झाला तर, प्रत्यक्ष उपदेशाचीही आवश्यकता असतेच, असें नाहीं. कान फुंकल्याशिवायही ते शिष्याला कृतार्थ करूं शकतात.

भर्तृहरी ह्मणतातः—

**बुद्धेरगोचरतया न गिरां प्रचारो**
**दूरे गुरु प्रथितवस्तुकथावतारः ।**
**तत्वं क्रमेण ननु सत्करुणावदाते**
**श्रद्धावतां हृदि पदं स्वयमादधाति ॥**

भावार्थः—तत्व, हें बुद्धीस गोचर नसल्यामुळें, तेथें वाचेचा उपयोग नाहीं. गुरूचा ब्रह्मज्ञानासंबंधी उपदेश तर दूरच राहिला. सत्पुरुषांच्या करुणेनें ज्यांचें मन शुद्ध झालें आहे, व जे श्रद्धावंत आहेत, अशा शिष्यांच्या अंतःकरणांत तत्वज्ञान खरोखर आपणच हळू हळू प्रवेश करतें.

ह्मणून मुमुक्षूनें संतांस अवश्य शरण जावें, त्यांचें वंदन करावें

व त्यांची एकनिष्ठपणानें सेवा करावी, ह्मणजे तो आगे किंवा मागें कृतार्थ होईलच होईल, यांत संशय नाहीं.

समर्थ ह्मणतातः—

**जो संतांसि शरण गेला । तो संतचि होऊनि ठेला । इतर जनां उपेगा आला । कनवाळूपणें ॥ ऐसें संतांचें महिमान । संतसंगें होतें ज्ञान । सत्संगापरतें साधन । आणिक नाहीं ॥**

ईश्वरप्राप्तीकरतां किंवा ब्रह्मसाक्षात्काराकरतां सत्संगापेक्षां दुसरें श्रेष्ठ साधन नाहीं.

भागवतांत श्रीकृष्ण ह्मणतातः—

**न रोधयति मां योगो न सांख्यं धर्म एव च ।**
**न स्वाध्यायतपस्त्याग इष्टापूर्तिर्न दक्षिणा ॥**
**व्रतानि यज्ञछंदांसि तीर्थानि नियमायमाः ।**
**यथावरुंधे सत्संगः सर्वसंगापहो हि मां ॥**

भावार्थः—ज्याप्रमाणें सर्व संगापासून सोडविणाऱ्या सत्संगानें मी वश होतों, त्याप्रमाणें मी योगानें वश होत नाहीं; सांख्यानें नाहीं; धर्मानें नाहीं; स्वाध्यायानें नाहीं; तप, त्याग, इष्टापूर्ति, दक्षिणा, व्रतें, वेदाध्ययन, तीर्थें, यमनियम, या कोणत्याही गोष्टींनीं मी तसा वश होत नाहीं.

सत्संगाची महति सांगावी तितकी थोडीच. असो. ज्ञानप्राप्तीसाठीं साधकानें काय करावें, याबद्दल श्रीकृष्णांनीं अर्जुनास ज्या सूचना केल्या, त्यांपैकीं अजून एक शिल्लक आहे. मुमुक्षूच्या कार्यभागांतलि "परिप्रश्न" हा महत्वाचा होय. कारण उपदेश जो संतांनीं करावयाचा, तो शिष्याची जिज्ञासा समजल्याशिवाय करूं नये, असा

नियम आहे. शिष्यास काय पाहिजे, तो सांसारिक किंवा मुमुक्षू आहे, हें शिष्यानें विनंति केल्याशिवाय गुरूस तरी कसें कळावें ?

पण शिष्यास गुरूविषयीं अति पूज्यबुद्धि असल्यामुळें, व त्याला गुरूपुढें मी धीटपणानें बोललों तर गुरूची बेअदबी केल्यासारखें होईल काय, अशी भीती असल्यामुळें, त्यानें गुरूस प्रश्न कसा करावा ? शिष्यानें सर्वदा गुरूपुढें विनयानेंच बोललें पाहिजे. पण गुरूची भीड वाटते, ह्मणून आपली जिज्ञासा नम्रपणें गुरूला कळविण्यांत त्यानें माघार घेऊं नये. प्रश्न करणें हा शिष्याचा धर्म आहे, व शिष्यांनीं प्रश्न करावे अशी सद्गुरूंचीही इच्छा असते. सद्गुरू जें सांगतील त्यासंबंधानेंही, जे अनेक संशय मनांत येतात, ते सर्व प्रांजळपणें प्रगट करून, शिष्यानें आपलें समाधान करून घेतलें पाहिजे; नाहीं तर त्याचा कार्यभाग साधणार नाहीं, व तो उगीच दोषास पात्र होईल.

ज्ञानेश्वर ह्मणतात:—

**वाढितयापुढें भुकेला। उपरोधें ह्मणे धाला। तें तोचि पीडे आपला। आणि दोषही तयाचा ॥ तैसा सर्वज्ञ श्रीगुरू। भेटलिया आत्मनिर्धारू। न पुसिजे जैं आभारू। धरूनियां ॥ तें आपणपेंचि वंचे। आणि पापही वंचनाचें। आपणयाचि साचें। चुकविलें तेणें ॥**

ह्मणून गुरूची लटकी भीड न धरतां शिष्यानें ब्रह्मज्ञानासंबंधानें गुरूला अवश्य प्रश्न करावे. पण ते प्रश्न कोणते, याचा विचार आतां कर्तव्य आहे. अशा प्रसंगीं काय काय विचारावें हें आचार्यांनीं सुचविलें आहे.

आचार्य ह्मणतात:—

**को नाम बंधः कथमेष आगतः कथं प्रतिष्ठास्य कथं विमोक्षः ।**
**कोऽसावनात्मा परमः क आत्मा तयोर्विवेकः कथमेतदुच्यतां ॥**

भावार्थः—बंध कोणता? हा कसा झाला? हा दृढ होतो कसा? याजपासून आपली सुटका कशी करून घ्यावी? अनात्मा हा कोण? परमात्मा कोण? व त्यांचा विवेक कसा करावा? हें सर्व मला सांगावें.

शिष्य अनेक असल्यामुळें त्याच विषयासंबंधानें त्यांची प्रश्नमालिका निरनिराळी असते. योगवासिष्ठांत दैत्यांचा राजा व उदारांचा शिरोमणी जो बली, त्यानें आपले गुरू शुक्राचार्य, यांस केलेले प्रश्न पहा.

बली ह्मणतो:—

**किमिहास्तीह किंमात्रमिदं किंमयमेव च ।**
**कस्त्वं कोहं क एते वा लोका इति वदाशु मे ॥**

भावार्थः—येथें कोणती वस्तू आहे? हें जग कशाचें बनलें आहे? याचें उपादान काय? तूं कोण? मी कोण? व हे लोक कोण? हें मला लौकर सांग.

शुक्राचार्यांनीं या प्रश्नांचीं उत्तरेंही त्याच तऱ्हेनें दिलीं आहेत.

शुक्राचार्य ह्मणतात:—

**चिदिहास्तीह चिन्मात्रमिदं चिन्मयमेव च ।**
**चित्त्वं चिदहमेते वा लोकाश्चिदिति संग्रहः ॥**

भावार्थः—येथें चिद्वस्तू आहे. हें सर्व जगत् चिन्मात्र व चिन्मयच आहे. तूं चित् आहेस, मीही चित् आहें, व हे लोकही चिद्वस्तूच आहेत, असें समज.

वरील प्रश्न व त्यांचीं उत्तरें यांत "सर्वं खल्विदं ब्रह्म" या श्रुतिवाक्याचाच विस्तार केलेला आहे. त्याचप्रमाणें "तत्त्वमसि" इत्यादि महावाक्यें आहेतच. पण हीं हजारों वेळ वाचून व ऐकूनही व्हावा

तसा खरा बोध होत नाहीं. याचें कारण येवढेंच कीं, ऐकणाराला अजून असावी तशी शुद्ध व तीव्र प्रज्ञा प्राप्त झाली नाहीं. उपदेश सफल व्हावयास शिष्याच्या प्रज्ञेची अपेक्षा आहे.

वसिष्ठ ह्मणतातः—

**उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनं ।**
**ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव केवला ॥**

भावार्थः—हे रामा! गुरूनें शिष्यास उपदेश करणें हा क्रम सांप्रदायाचें पालन करण्यापुरताच आहे. पण ज्ञानप्राप्तीचें खरें कारण केवळ शिष्याची शुद्ध बुद्धीच होय.

हें उघड समजण्यासारखें आहे. सद्वस्तूचें परोक्षज्ञान व्हावयास तीव्र बुद्धीची अपेक्षा आहे. मग अपरोक्ष ज्ञानास अति तीव्र व शुद्ध प्रज्ञा पाहिजे यांत काय नवल? साक्षात्कार ज्याचा त्यासच व्हावयाचा असतो हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

वसिष्ठ ह्मणतातः—

**न शास्त्रैर्नाऽपि गुरुणा दृश्यते परमेश्वरः ।**
**दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्वस्थया धिया ॥**

भावार्थः—परमेश्वर शास्त्रांनीं दिसत नाहीं, व गुरूच्या योगानेंही तो दिसत नाहीं. फक्त आपल्या सात्विकबुद्धीनेंच आत्मा आपला आपणास दिसावयाचा.

असेंच जर असलें, तर शास्त्रें वाचून, किंवा सद्गुरूस शरण जाऊन काय उपयोग? शास्त्राभ्यासांत दवडलेला वेळ, व त्याचप्रमाणें गुरूची सेवा करून मर्जी संपादन करण्यांत गेलेला वेळ सर्व व्यर्थच ह्मणावयाचा काय? असें नाहीं.

ज्याला पाण्यांत पोहण्याची इच्छा झाली आहे, त्यानें पुस्तकें वा-

चून त्यासंबंधी माहिती मिळविली, तर ती केवळ निरुपयोगी होणार नाहीं. त्याचप्रमाणें एखादा चांगला अनुभवी पोहणारा पाहून त्याजजवळ जाऊन आपल्यास पुस्तकें वाचून जें ज्ञान झालें, तें खरें किंवा चुकीचें, याजबद्दल निवाडा करून घेऊन, नंतर पोहण्याची विद्या त्याजकडून शिकणेंही रास्तच होईल. पण शेवटीं पुस्तकी, अथवा तोंडचें ज्ञान तसेंच राहिलें, तर काय उपयोग? पोहणारानें पाण्यांत उतरून पोहण्याचा अभ्यास स्वतः केला पाहिजे, ह्मणजे हळू हळू त्याला पोहतां येईल.

त्याचप्रमाणें शास्त्राभ्यासानें परोक्ष ब्रह्मज्ञान संपादन करून, तें गुरुमुखानें शुद्ध व संशयरहित करून घेतलें पाहिजे. नंतर गुरूची कृपा झाल्यावर, तें उपदेशित मार्गानें स्वतः अनुभवाच्या कसोटीस अभ्यासाच्या सहाय्यानें लावलें पाहिजे, तरच खरी ज्ञानप्राप्ति होईल.

आचार्य ह्मणतातः—

**तटस्थिता बोधयन्ति गुरवः श्रुतयस्तथा ।**
**प्रज्ञयैव तरेद्विद्वानीश्वरानुगृहीतया ॥**

भावार्थः—गुरू व श्रुति, तीरावर राहूनच बोध करतात. पण विद्वानाला ईश्वरानुग्रहानें उत्पन्न झालेले प्रज्ञेनेंच तरून जातां येतें.

ह्मणून शिष्याची प्रज्ञा अति शुद्ध व सात्विक झाली पाहिजे, तरच त्याची मजल साक्षात्कारापर्यंत जाईल. खरी प्रज्ञा उत्पन्न झाल्याशिवाय त्या बिचाऱ्याला काय दिसणार?

**यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किं ।**
**लोचनाभ्यां विहीनस्य दर्पणं किं करिष्यति ॥**

भावार्थः—ज्याला स्वतःची बुद्धि नाहीं त्याला शास्त्र काय करील? ज्याला डोळेच नाहींत त्याला आरशाचा काय उपयोग?

ह्मणून ही प्रज्ञा कशी उत्पन्न करावी, आणि वाढवावी, याचा विचार केला पाहिजे. या कामांत ईश्वरानुग्रहाची आवश्यकता असल्यामुळें, प्रथम ईश्वराची एकनिष्ठेनें उपासना साधकानें केली पाहिजे. नंतर शास्त्राभ्यास, व सद्गुरुमुखानें वारंवार चर्चा, व शंकांचें समाधान करून घेऊन मुमुक्षूनें आपली प्रज्ञा वाढविली पाहिजे. त्याचप्रमाणें शमदमादिक साधनांचाही अभ्यास केला पाहिजे.

वसिष्ठ ह्मणतातः—

**शास्त्रैः सज्जनसंपर्कपूर्वकैः सतपोदमैः ।**
**आदौ संसारमुक्त्यर्थं प्रज्ञामेवाभिवर्धयेत् ॥**

भावार्थः—सत्संगपूर्वक शास्त्राभ्यासानें, तप वा दमादिक साधनांनीं संसारांतून मुक्त होण्यासाठीं, आपली प्रज्ञाच वाढविली पाहिजे.

सत्संगांत राहून, गुरूच्या सहाय्यानें शास्त्राभ्यास करणें फारच हितावह आहे. हा अभ्यास नीट व पद्धतशीर रीतीनें करण्यास तीन साधनें आहेत, त्यांचा विचार आतां केला पाहिजे. या साधनत्रयीपैकीं पहिलें साधन श्रवण होय.

**श्रवणः**—व्यवहारांत देखील ज्या विषयाचें ज्ञान मनुष्यास नसतें त्या विषयासंबंधानें तज्ज्ञांनीं सांगितलेलें ऐकूनच, त्याला ज्ञान होतें. श्रवण अथवा वाचन याशिवाय ज्ञान संपादन करण्याचें दुसरें साधनच नाहीं. परमार्थांतही तशीच स्थिति आहे. शास्त्रें वाचून अथवा ज्ञानी पुरुषांनीं सांगितलेलें ऐकूनच ज्ञान व्हावयाचें. हें श्रवण सत्संगांत राहून, संतांच्या वचनाचें झालें तर फारच उत्तम.

समर्थ ह्मणतातः—

**ऐक परमार्थाचें साधन । जेणें घडे समाधान । तें तूं जाणगा श्रवण । निश्चयेसी ॥ सत्संगावरी श्रवण । तेणें कळे**

निरूपण । श्रवणें होइजे आपण । तदाकार ॥ ऐकिल्याविण कळेना । हें तो ठावुकें आहे जनां । या कारणें मूळ प्रयत्ना । श्रवण आधीं ॥ न देखतां दिनकर । पडे अवघाचि अंधकार । श्रवणेंविण प्रकार । तैसा होय ॥ नाना देश नाना मतें । भूमंडळीं असंख्यातें । सर्वांस श्रवणापरतें । साधनचि नाहीं ॥

या आद्य साधनाचा उपयोग सर्वत्र आहेच. पण परमार्थांत या श्रवणापासून काय काय लाभ होतात तें पहाः—

समर्थ ह्मणतातः—

श्रवणें आशंका फिटे । श्रवणें संशयो तुटे । श्रवण होतां पालटे । पूर्वगुण आपुला ॥ श्रवणें विचार कळे । श्रवणें ज्ञान हें प्रबळे । श्रवणें वस्तू निवळे । साधकासि ॥ प्रवृत्ति आणि निवृत्ति । श्रवणेंविण न घडे प्राप्ती । हे तो सकळांसी प्रतीती । प्रत्यक्ष आहे ॥ श्रवणें घडे उपरती । बद्धाचे मुमुक्षू होती । मुमुक्षूचे साधक अंतीं । नेमेसि चालती ॥ साधकांचे होती सिद्ध । अंगीं बाणतां प्रबोध । हें तों आहे प्रसिद्ध । सर्वांसि ठावुकें ॥

सर्व साधनांत पहिलें ज्ञानसाधन श्रवणच ह्मटलें पाहिजे. ज्यांना ह्मणून सद्वस्तूविषयीं ज्ञान संपादन करण्याची इच्छा आहे, त्यांना श्रवण केल्यावांचून गत्यंतर नाहीं. या साधनाच्या उपयुक्ततेबद्दल समर्थ समारोप करतातः—

श्रवणा ऐसें सार नाहीं । श्रवणें घडे सर्व कांहीं । भवनदीच्या प्रवाहीं । तरणोपाय श्रवणें ॥

आतां मुमुक्षूस अत्यंत समाधानकारक ही गोष्ट आहे कीं, श्रवण हें सर्व ज्ञानसाधनांत पहिलें व श्रेष्ठ असून, तें इतर सर्व साधनां-

पेक्षां फारच सुलभ आहे. परमार्थाचा सर्व पाया श्रवणावर उ
जातो. तरी हें साधन स्त्रियांस व आबालवृद्धांस सहज कामीं
व्यवहारांत श्रवणाचा अभ्यास अनायासानें सर्वांस होत असत
परमार्थांत या साधनाचा उपयोग करणें फार सोपें होतें. मग अ
साधन उपलब्ध असूनही परमार्थसिद्धि कां करून घेऊं नये?

ज्ञानदेव ह्मणतातः—

**जरि सावियाचि वैरी मरे । तरि कां बांधावे लागती ग्र
रोग जाय दुधेंसाखरे । तरि लिंब कां पियावा ॥
मनाचा मार न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां
मोक्ष असे आयता । श्रवणामाजी ॥**

ज्या मुमुक्षूंस अजून परोक्षज्ञानही झालें नाहीं, त्यांनीं
कीर्तनास जाऊन श्रवण करावें. अपरोक्षज्ञानाचा उपदेश
अनुभवी ज्ञानीच करूं शकतील, व ते तो उपदेश अधिकार
झालेल्या शिष्यालाच करतील. पण परोक्षज्ञान कोणत्याही
व बहुश्रुत वक्त्यापासून मिळूं शकतें, मग तो वक्ता सिद्ध अ
साधक असो. श्रोताही सन्मार्गानें चालत असला, व तो लक्ष
आणि श्रद्धायुक्त अंतःकरणानें ऐकत असला, तर तो परोक्ष
अधिकारी आहे असें मानण्यास हरकत नाहीं.

आतां कीर्तन करणारे सर्वत्र असतात. त्यांना हुडकावें
नाहीं. ते बिचारे सदा कीर्तन करण्यास तयार असतात, व श्रो
अपेक्षा करतात. वक्ता सन्मार्गानें चालणारा असला, तर
श्रद्धावंत श्रोते संतच ह्मणतात, व कीर्तनापुरतें त्याला संत
ण्यास हरकत नाहीं; कारण जरी तो सिद्ध नसला, तरी पर
देण्याचा अधिकार त्याच्याकडे आहेच. सदुपदेश करून जनांची

सन्मार्गाकडे करणें, व त्यांना हळू हळू परमार्थाची गोडी लावणें, हा स्तुत्य उद्योग हे कीर्तन करणारे संतही सर्वदा करीत असतात.

तुकोबाराय ह्मणतात:—

**संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥**
**काय वाणूं मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागवीती ॥**
**सहज बोलणें हित उपदेश । करुनि सायास शिकविती ॥**
**तुका ह्मणे वत्स धेनूचिया चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥**

कीर्तन करून सदुपदेशाच्या कथा सांगणारे जरी सर्वदा तयार असले तरी बऱ्याच प्रसंगीं श्रोतेमंडळीची उणीव असते. ह्मणून ते बिचारे सर्वदा लोकांस सांगत असतात कीं, सर्वांनीं कीर्तनास अवश्य जाऊन सदुपदेश ऐकावा.

**कीर्तनासी नर हो तुह्मि जागा । कीर्तनासी नर हो तुह्मि जागा । कीर्तनासी नर हो तुह्मि जागा । कीर्तनासि नर हो तुह्मि जागा ।**

याचा अर्थ असा आहे कीं, हे नर हो तुह्मीं कीर्तनास जात असावें; तेथें गेल्यावर निद्रेस वश न होतां जागावें; इतकेंच नव्हे तर यथाशक्ति ईश्वराचें नाम गावें; कारण नरजन्म ज्यांना लाभला आहे, तेच कीर्तनाला उत्तम जागा आहेत; इतर प्राण्यांना कीर्तनाचा काय उपयोग !

प्रथम तर कीर्तनास अनेकवार श्रोत्यांची उणीव, व शिवाय आले तेही सर्व जागतात असें नाहीं. कांहीं निद्रेला वश होऊन कीर्तनाचे लाभास मुकतात. मनुष्य जागा राहिला तर कांहीं तरी सदुपदेशाचे शब्द त्याचे कानीं पडतील, व त्याला अल्प स्वल्प तरी बोध होईल. पण तो जर निद्रासुखांत निमग्न झाला तर कीर्तनास जाऊन काय उपयोग ?

विशेष चमत्कार हा कीं कीर्तन वगैरे चाललें असतां नीज ही ठेवलेलीच. हा आश्चर्यकारक अनुभव जगांत सर्वत्र येतो. पाश्चिमात्य लोकांतही, देऊळांत उपदेश चालू असतां श्रोत्यांपैकीं कांहीं मंडळी निद्रानंदांत लीन होतात, हें उघडपणें कबूल करण्यांत येतें. त्यांतही वक्ता प्रेमळ व हुशार असून मित भाषण करणारा असला, तर त्याचा उपदेश बहुतेकांच्या कानीं पडण्याचा संभव असतो. पण तो जर नीरस व लांबलचक बोलणारा असला, तर बरीच श्रोते मंडळी निद्रा-वश व्हावयाची, यांत संशय नाहीं.

पण असें कां असावें, याचा सूक्ष्म विचार करून, एका कवीनें, याबद्दल जबाबदारी श्रीरामचंद्राकडेच येते, असें प्रतिपादन केलें आहे.

कवी ह्मणतातः—

**निद्राप्रियो यः स तु कुंभकर्णो हतः समीके रघुनंदनेन ।**
**अतोऽस्यपत्नी विधवा प्रजाता श्रोतुं समायाति कथापुराणं ॥**

भावार्थः—निद्रेचा प्रियकर जो कुंभकर्ण, त्याला रामचंद्रांनीं युद्धांत मारलें. ह्मणून त्याची पत्नी निद्रा ही विधवा होऊन कथा पुराणें ऐक-ण्यास जाते.

ही बाई आपल्या जन्माचें सार्थक करून घेण्यास कथापुराणास जात असेल. पण दुर्दैवानें हिच्या स्वाभाविक प्रभावामुळें कांहीं श्रोत्यांस अवसान सांवरत नाहीं, आणि ते नेत्र झांकून डुलक्या देऊं लागतात. असो.

आतां कीर्तनास जाऊन मनुष्य जागा तर राहिला, पण त्याचें मन संसारसंबंधी अनेक चिंतेंत गुंतून राहिलें, तर काय उपयोग? वक्ता काय बोलतो इकडे जर लक्ष दिलें नाहीं, तर श्रोत्याला बोध व्हावयास मार्गच नाहीं. ह्मणून श्रोत्यानें नेहेमीं सावधान असावें. जें

कानीं पडतें त्याचा लक्षपूर्वक विचार करावा, तरच श्रवणापासून लाभ होईल. श्रवण कसें करावें हें रामदासस्वामींनीं दासबोधांत सुचविलें आहे.

समर्थ ह्मणतात:—

**मनाच्या तोडोनि ओढी। श्रवणीं बसावें आवडी। सावधपणें घडीनें घडी। काळ सार्थक करावा॥ दुश्चितपणें न घडे श्रवण। दुश्चितपणें न घडे विवरण। दुश्चितपणें निरूपण। हातींचें जाय॥**

कारण कीर्तनास जाऊन आपलें मन कीर्तनाकडे न ठेवतां, मनुष्य जर अन्य विषयांचे चिंतनांत मग्न होईल, अथवा चिंता, भय, हर्ष, शोक इत्यादि विकारांचे तरंगांत गर्क होईल, तर त्याला वक्ता काय प्रतिपादन करीत आहे, हें कसें समजावें ?

ह्मणून कीर्तनास जाऊन आपलें मन एकाग्र ठेवून, सदुपदेश नित्य श्रवण केला ह्मणजे हळूहळू ज्ञान होऊं लागतें. तें होत चाललें ह्मणजे पूर्वीं जो मिथ्या पांडित्याचा अभिमान मनांत असतो, तो नाहींसा होऊं लागतो, व मुमुक्षू गर्वरहित होऊन त्याचे अंगीं लीनता येते.

भर्तृहरी ह्मणतात:—

**यदाऽकिंचिज्ज्ञोहं द्विप इव मदांधः समभवं।**
**तदा सर्वज्ञोऽस्मीत्यभव दवलिप्तं मम मनः।**
**यदा किंचित्किंचिद्बुधजनसकाशादवगतं।**
**तदा मूर्खोऽस्मीति ज्वर इव मदो मे विगलितः॥**

भावार्थ:—जेव्हां मला खरोखर कांहींच समजत नव्हतें, तेव्हां मीं हत्तीसारखा मदांध झालों होतों, आणि मी सर्वज्ञ आहें, या

गर्वानें माझें मन फुगलें होतें. पण जेव्हां ज्ञानी पुरुषांकडून मला थोडें थोडें समजूं लागलें, तेव्हां मी मूर्ख आहें, अशी माझी खात्री होऊन, एखाद्या ज्वराप्रमाणें माझा मद नाहींसा झाला.

आतां नेहमीं परमार्थाच्या कथा कानीं पडल्यामुळें मुख्य लाभ हा होतो कीं, श्रोत्याचें मन हळू हळू अनायासानें शुद्ध होत जातें, व त्याचा विषयाकडील ओढा कमी होतो.

**सततोदारवृत्तासु कथासु परिशीलितं ।**
**संपन्नं निर्मलं चेतो मोहपंकैर्न लिप्यते ॥**

भावार्थः—सदाचरणाच्या कथांत नेहेमीं रमलेलें अंतःकरण, स्वच्छ व संपन्न झाल्यामुळें, तें मोहपंकांनीं लिप्त होत नाहीं.

ज्ञान होण्यास ईश्वरानुग्रहाची आवश्यकता आहे, हें मागें सुचविलें आहे. आतां ईश्वराचे भक्तीचे नऊ प्रकार सांगितले आहेत, त्यांत श्रवण भक्ति पहिली आहे. ह्मणून मुमुक्षूनें भाविक अंतःकरणानें, आणि लक्षपूर्वक, निर्गुण तत्व प्रतिपादनाचें, अथवा ईश्वरगुणानुवादाचें श्रवण केलें, तर ईश्वरभक्ति केल्याचें श्रेय मिळून, परमेश्वर संतुष्ट होईल, आणि मुमुक्षूस सहाय्य करील. ईश्वराची भक्ति व्हावी या उद्देशानें श्रवण कशाचें करावें, याजबद्दल समर्थ सुचवितातः—

**प्रथम भजन ऐसें जाण । हरिकथा पुराणश्रवण । नाना अध्यात्मनिरूपण । ऐकत जावें ॥ कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धान्तमार्ग । योगमार्ग वैराग्यमार्ग ऐकत जावे ॥**

श्रवणापासून मुमुक्षूस परमार्थांत अत्यंत सहाय्य होतें, व ज्ञान संपादन करण्याचे कामीं श्रवण हें मोठें साधन आहे, हें अबाधित ठरतें. शिवाय नुसत्या श्रवणानेंच मुमुक्षू कृतार्थ झाल्याचींही उदाहरणें आढळतात. पण अर्थातच परमार्थसिद्धि नुसत्या श्रवणानें व्हावयास,

वक्ता व श्रोता हे दोघेही उत्तम असले पाहिजेत. यासंबंधानें परिक्षिती राजाची कथा ऐकण्यासारखी आहे.

हा राजा पुण्यवान व सत्वशील असतांही त्याचे हातून एक मोठा अन्याय झाला, व त्याचें प्रायश्चित्त त्या बिचाऱ्याला लागलेंच भोगावें लागलें. तो एकदां मृगया करतांना एका मृगाचे पाठीस लागला. मृग भयाभीत होऊन शमीक ऋषीचे आश्रमाकडे पळत गेला, व राजाची नजर चुकवून दिसेनासा झाला. इतक्यांत राजा आश्रमा नजीक येऊन पोहोंचला, आणि चहूंकडे पाहूं लागला.

राजाला मृग तर कोठेंच दिसेना, पण आश्रमानजीक एक ऋषी स्वस्थ बसलेला त्याचे नजरेस पडला. मृग कोठें गेला हें या ऋषीस माहीत असलेंच पाहिजे, असें वाटून, राजानें ऋषीस विचारलें, मृग कोठें गेला ? ऋषी ध्यानस्थ बसला होता. त्याला कांहीं ऐकूं आलें नाहीं, आणि अर्थातच त्यानें राजाला कांहीं उत्तरही दिलें नाहीं.

एवढा पुण्यवान आणि धर्मशील तो राजा, पण प्रारब्धवशात् त्याच्या बुद्धीला भ्रंश पडला, आणि मृगयेच्या ईर्षेस चढल्यामुळें हा ऋषी आपला बुद्धिपुरःसर अपमान करीत आहे, असें त्यास वाटलें. पुढें विचार न करतां, जवळच एक मृत सर्प पडलेला होता, तो राजानें उचलला, व ऋषी उगीच डोळे झांकून ढोंग करीत आहे असेंच मानून, तो मृत सर्प त्या ऋषीच्या गळ्यांत अडकाविला. नंतर राजा तेथून निघून गेला.

इकडे दुसरे ऋषी व ऋषिपुत्र, रानांतून परत येऊन हा चमत्कार पहात उभे राहिले. इतक्यांत शमिक ऋषीचा पुत्र शृंगी हाही वनांतून परत आला. ऋषी अद्याप ध्यानस्थ बसला होता, व तो मृतसर्प त्याचे गळ्याभोंवतीं लटकत होता. हें सर्व शृंगीच्या नजरेस पडतांच

त्याला अत्यंत क्रोध आला, व त्यानें मागें पुढें न पाहातां "ज्यानें माझे पित्याचा असा अपमान केला, तो सात दिवसांतच तक्षकदंश होऊन मरेल" असा क्रूर शाप दिला.

बिचारा शमिक ऋषी समाधि पुरी करून देहभानावर आल्यावर, हें सर्व वर्तमान त्याला समजलें. आपल्या पुत्रानें दिलेल्या शापाबद्दल फार वाईट वाटून, त्या शांत ऋषीनें, आपल्या पुत्रास बोलावून त्याला उपदेश केला "बाबा कोणी आपला कसाही अपराध केला, तरी आपण आपली शांती सोडूं नये. ऋषींस क्षमाच उचित आहे. पहा हा राजा स्वभावतः धर्मशील असून, तो प्रजेचें न्यायानें पालन करतो. त्याचे हातून हा अपराध चुकून घडला. ह्मणून त्यास असें घोर शासन अगदीं अयोग्य होय. असो, झालेले गोष्टीस आतां उपाय नाहीं. आतां हें वर्तमान लौकर राजास कळवावें, ह्मणजे त्या बिचाऱ्यास राहिलेल्या आयुष्याचे अवधींत, आपलें सार्थक करून घेतां येईल."

नंतर त्या सत्वशील ऋषीनें राजाकडे आपला एक शिष्य पाठवून त्याला शापाचें वर्तमान कळविलें, व राहिलेल्या आयुष्यांत आपलें जन्माचें सार्थक करून घे, अशी सूचनाही केली. राजानें शापाचें वर्तमान ऐकतांच तो गांगरून गेला, व त्याला कांहीं सुचेनासें झालें. सुदैवानें नारदऋषी तेथें आले, व राजाच्या चिंतेचें कारण ऐकून ह्मणाले "हे राजा, तूं काळजी करूं नकोस. झाले गोष्टीस उपाय तर नाहींच. पण तुला आपले जन्माचें सार्थक सहज करून घेतां येईल. श्रीशुकांच्या मुखानें तूं भागवत श्रवण कर, ह्मणजे तूं खात्रीनें कृतकृत्य होशील." इतकें सांगून नारदऋषी अंतर्धान पावले.

नंतर त्या पुण्यवान राजानें प्रेमळ अंतःकरणानें आणि एकनिष्ठेनें शुकांचें ध्यान करतांच ते प्रगट झाले, आणि ह्मणाले "हे राजा, तुझी

काय इच्छा आहे ? तूं माझें स्मरण कां केलेंस ?" राजानें ऋषीस साष्टांग नमस्कार घातला, आणि दीनवाणीनें ह्मणाला "महाराज ऋषीशापानें माझें आयुष्य सात दिवसच उरलें आहे. ह्मणून मीं आपणास शरण आलों आहें. आपण मजवर अनुग्रह करून भागवत पुराण मला ऐकवा, आणि माझा उद्धार करा."

श्रीशुकांनीं अवश्य ह्मणून भागवत सांगण्यास आरंभ केला. राजानें भागवत सात दिवसपर्यंत श्रद्धेनें व एकाग्रचित्तानें श्रवण केलें, व ईश्वरकृपेनें त्याला ज्ञान होऊन समाधी लागली. पुढें ऋषीच्या शापामुळें तो तक्षकदंशानें मरण तर पावलाच, पण त्याचा उद्धार होऊन त्याला मुक्ति मिळाली.

याप्रमाणें सद्भावानें, व एकाग्रचित्तानें श्रवण झालें, तर मुमुक्षूस अधिकाराप्रमाणें मुक्तीही मिळण्यास हरकत नाहीं. पण श्रवणाची आस्था असेल, तरच असें होईल ना ? ती आस्थाच जर नसली तर मनुष्याचें कल्याण कसें व्हावें ? आपला उद्धार करून घेण्यासाठीं श्रवणासारखें सोपें साधनही ज्यांस कबूल नाहीं, त्यांना अन्य उपाय कोणता ? श्रवणासारखी सुलभ गोष्ट ज्यांना अवघड वाटते, त्यांना शमदमादिक कठिण साधनांची खटपट कशी उरकेल? हें असो. पण जो सदुपदेश ऐकणारच नाहीं, त्याला, परमार्थ कसा साधावा, हेंही समजण्यास मार्ग नाहीं. मग कृतार्थ होणें तर दूरच राहिलें.

ज्ञानेश्वरमहाराज ह्मणतातः—

**अथवा ज्ञान कीर नोहे। परि ते चाड एकी जरी वाहे। तरि तेथ जिव्हाळा आहे। प्राप्तीचा पैं ॥ वाचूनि ज्ञानाची गोठी कायसी। परि ते आस्थाही न धरी मानसीं। तरि तो संशय-**

**हुताशीं । पडिला जाण ।। जें अमृतही परि नावडे । ऐसें सावियाचि अरोचक घडे । तेथ मरण आलें पुढें । ह्मणो येकीं ।।**

असा जो मनुष्य आहे, तो सच्छास्त्र श्रवण करण्यास अधिकारीच नाहीं, असें खास समजावें. असा मनुष्य आपण होऊन कीर्तनास येणार नाहीं, आणि जुलमानें त्याला कोणी कीर्तनास नेलेंच तर तो लक्ष देऊन ऐकणार नाहीं. अन्य कल्पना करीत असतां, दैववशात् कीर्तनाचे शब्द जर त्याचे कानीं पडलेच, तरी दुर्लक्षामुळें त्याला बोध होणें शक्य नाहीं. हें देखील शोचनीयच आहे. पण ज्या मूर्खाची मज्जल याही पुढें जाऊन, जर तो वक्त्याची, व परमार्थाची, अथवा ईश्वराची निंदा करूं लागला, तर त्याची उन्नति न होतां, उलट दोष पदरीं लागल्यामुळें, अवनतीच होईल.

ह्मणून अर्जुनास श्रीकृष्ण सांगतातः—

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाच न ।**
**न चाशुश्रषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ।।**

भावार्थः—हें ( गीता शास्त्र ) जो तप करीत नाहीं, जो भक्ति करीत नाहीं, ज्याची ऐकावयाची इच्छा नाहीं, अथवा जो माझा द्वेष करतो, अशा पुरुषास तूं सांगूं नकोस.

कारण अशा विचारहीन मनुष्यास या शास्त्राचा उपयाग हाण तर कठीणच, पण तो जर शास्त्राचा अथवा ईश्वराचा उपहास करूं लागला, तर त्याला आपण त्याचे अवनतीस एक कारण दिल्याप्रमाणें होईल. ह्मणून अशा श्रद्धाहीन मनुष्याच्या वाटेस जाऊं नये यांतच श्रेय आहे.

श्रवणाचा येथवर बराच विचार झाला; आतां श्रवणाचाच एक पोटभेद असें जें ग्रंथावलोकन, त्याजविषयीं विचार करूं.

या जगांत अनेक साधू पुरुष होऊन गेले, त्यांच्या उक्ति ग्रंथ-रूपानें अद्याप उपलब्ध आहेत. व त्यांचा लाभ मुमुक्षूस करून घेतां येतो. उत्तम ग्रंथांचें वाचन जर श्रद्धापूर्वक व एकाग्रचित्तानें झालें, तर त्यापासून प्रत्यक्ष त्या साधूंच्या उक्तींचें श्रवण केल्यासारखें होतें. लौकिक व्यवहारांतहि जसें कोणत्याही विषयावर तज्ज्ञांच्या मुखानें व्याख्यान ऐकून ज्ञान होतें, तसेंच त्या विषयावर लिहिलेले अनेक उत्तम ग्रंथ वाचूनही होतें. शिवाय ग्रंथ अनेकवार आपले सोईप्रमाणें वाचतां येतात, ही जास्त उपयुक्तता ग्रंथांचे अध्ययनांत आहे.

परमार्थांतही साधु पुरुषांचे प्रासादिक ग्रंथ वारंवार भक्तिपुरःसर वाचून ज्ञानाची वृद्धि होते. ह्मणून मुमुक्षूनेंही उत्तम ग्रंथांचें अध्ययन करीत जावें.

या विषयासंबंधानें समर्थांनीं दासबोधांत अनेक उपयुक्त सूचना केल्या आहेत. मुमुक्षूंनीं ग्रंथांची निवड कशी करावी, कोणते ग्रंथ त्याज्य आहेत, व कोणते अवश्य वाचावे, याचा निर्णयही त्यांनीं केला आहे.

समर्थ ह्मणतातः--

**ग्रंथ बहुत असती । नाना विधानें फलश्रुती । जेथें नुपजे विरक्ती । तो ग्रंथचि नव्हे ॥ मोक्षेंविण फलश्रुती । ते दुराशेची पोथी । ऐकतां ऐकतां पोटीं । दुराशा वाढे ॥**

तर मग ग्रंथ ही संज्ञा कोणत्या तऱ्हेच्या लेखास द्यावी ?

समर्थ उत्तर देतातः--

**जेणें परमार्थ वाढे । अंगीं अनुताप चढे । भक्ति साधन आवडे । तया नांव ग्रंथ ॥ जेणें होय उपरती । अवगुण अवघेची पालटती । जेणें चुके अधोगती । त्या नांव ग्रंथ ॥ जेणें ग्रंथें परत्र**

**साधन। जेणें ग्रंथें होय ज्ञान। जेणें होईजे पावन। त्या नांव ग्रंथ ॥ आतां असो हें बहुत। ऐकावा परमार्थ ग्रंथ। परमार्थ ग्रंथेंविण व्यर्थ। गाथा गोवी ॥**

मुमुक्षूंनीं वर निर्दिष्ट केलेले ग्रंथ नित्य लक्षपूर्वक वाचीत जावे, ह्मणजे हळू हळू त्यांना भक्ति, विरक्ति, ज्ञान वगैरे क्रमानें प्राप्त होतील.

पण ग्रंथ निवडण्याचे कामीं मुमुक्षूंनीं जरा काळजी घेतली पाहिजे. ग्रंथकारांचीं मतें भिन्न भिन्न असल्यामुळें, ग्रंथांत बराच विरोध असतो. एका ग्रंथांत प्रतिपादन केलेलीं तत्वें दुसऱ्यांत अमान्य केलेलीं असतात. यास्तव असे अनेक ग्रंथ वाचून मुमुक्षू संशयांत पडतो, आणि त्याचा होत चाललेला तत्वनिश्चय बिघडतो. ह्मणून समर्थ असें सुचवितात कीं मुमुक्षूनें अद्वैत प्रतिपादन करणारेच ग्रंथ वाचावे. ज्या ग्रंथानें अद्वैत निश्चय कायम राहील असे ग्रंथ मुमुक्षूस हितकर होतील. पण ज्यांत अद्वैतवादाचें खंडन केलें आहे असे ग्रंथ वाचले तर मुमुक्षू उगीच घोंटाळ्यांत पडेल.

समर्थ ह्मणतातः—

**एक वक्तृत्व श्रवणीं पडे। तेणें झालें समाधान मोडे। केला निश्चयो बिघडे। अकस्मात ॥ तें वक्तृत्व त्यागावें। जें मायिक स्वभावें। जेथें निश्चयाच्या नांवें। शून्याकार ॥ एक्या ग्रंथें निश्चयो केला। तो दुजयानें उडविला। तेथें संशयाचि वाढला। जन्मवरी ॥ जेथें संशयतुटती। होय आशंका निवृत्ती। अद्वैतग्रंथ परमार्थी। श्रवण करावे ॥**

जोंपर्यंत मुमुक्षूचें अंतःकरण अपक्व व संशयग्रस्त आहे, तोंपर्यंत त्यानें समर्थांनीं सुचविलेलेच ग्रंथ वाचावे. पण त्याला एकदां निश्चयपूर्वक अद्वैत ज्ञान झालें, ह्मणजे मग त्यानें कोणतेही परस्पर विरोधी ग्रंथ वाचले तरी तो गोंधळांत पडणार नाहीं.

आतां श्रुतींचें अध्ययन करणाऱ्या नवशिक्यास असें वाटतें कीं, भिन्न भिन्न श्रुती निरनिराळ्या तत्त्वांचें प्रतिपादन करीत असल्या-मुळें त्या परस्पर विरोधी आहेत. पण व्यासादिक महात्म्यांनीं केलेली श्रुतींची एकवाक्यता त्यानें अधिकारी गुरूच्या मुखानें जर समजाऊन घेतली, तर श्रुती परस्परविरोधी नाहींत, आणि त्या सर्वांचें तात्पर्य ब्रह्म व आपला आत्मा यांचें ऐक्य प्रतिपादन करण्यांत आहे, अशी त्याची खात्री होईल. द्वैत सर्व मायिक असून लटिकें आहे, व एक ब्रह्मच सत्य आहे, आणि आत्मा तें ब्रह्म, व ब्रह्म तो आत्मा, असें मुमुक्षूस खात्रीनें समजलें, ह्मणजे मुमुक्षूचें श्रवण व्हावें तसें झालें, असें ह्मणावें. पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**वेदांतानामशेषाणामादिमध्यावसानतः।**
**ब्रह्मात्मन्येव तात्पर्यमिति धीःश्रवणं भवेत् ॥**

भावार्थः—सर्व वेदांतांचें, आरंभ, मध्य, व अवसान यांहीं करून ब्रह्म व आत्मा यांच्या ऐक्यांतच तात्पर्य आहे, अशी बुद्धि होणें हेंच श्रवण होय.

अशा तऱ्हेचें खरें श्रवण झालें ह्मणजे मुमुक्षूचा कार्यभाग बराच साधला असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कांहीं अति तीव्र बुद्धीचे व उत्तम अधिकारास चढलेले साधक इतक्यानेंच कृतकृत्य होतात. पण बहु-तेक मुमुक्षूंचा इष्ट हेतू इतक्यानेंच सिद्ध होत नाहीं. त्यांना पुढच्या साधनांचा अभ्यास अवश्य केला पाहिजे. उपदेश झाल्यावर जीं साधनें मुमुक्षूनें अभ्यासावयाचीं, त्याची व्यवस्था आचार्यांनीं लावली आहे.

**ततः श्रुतिस्तन्मननं सतत्वध्यानं चिरं नित्यनिरंतरं मुनेः।**
**ततोऽविकल्पं परमेत्य विद्वानिहैव निर्वाणसुखं समृच्छति ॥**

भावार्थः—नंतर श्रवण, ऐकलेल्या तत्वांचें मनन, आणि फार वेळ नित्य, आणि निरंतर असें ध्यान ( निदिध्यासन ), अशीं झालीं ह्मणजे

तो विद्वान निर्विकल्प समाधींत लीन होऊन, या लोकींच निर्वाण-सुखाचा अनुभव घेतो.

**मनन**:—श्रवणाबद्दल बराच विचार झाला आहे. आतां दुसरें साधन जें मनन तें काय आहे तें पाहूं.

पंचदशींत तत्वविवेकांत ह्मटलें आहे:—

**युक्त्या संभावितत्वानुसंधानं मननं तु तत् ।**

भावार्थ:—वेदांतांत, जें श्रवण केलें, तें संभवतें, असें युक्तीनें त्याचें अनुसंधान करणें मनन होय.

मनन ह्मणजे काय आणि तें कसें करावें हें शिवगीतेंत श्रीशंकरांनीं सांगितलें आहे.

**लोहमण्यादिदृष्टांतयुक्तिभिर्यद्विचिंतनं ।**
**तदेव मननं प्राहुर्वाक्यार्थस्योपबृंहनं ॥**

भावार्थ:—लोहचुंबकाच्या वगैरे दृष्टांतांनीं व युक्तींनीं, जो विचार करणें, त्यालाच मनन असें ह्मणतात. तें वाक्याच्या अर्थाची फोड करणें होय.

नुसतें श्रवणच करीत गेलें, पण श्रवण केलेल्या तत्वांचा जर नीट विचार करून, तीं खरीं आहेत किंवा नाहींत, याजबद्दल युक्तीप्रयुक्तीनें आपली खात्री करून घेतली नाहीं, तर श्रवणाचें काय फल? ह्मणून ऐकिलेल्या तत्वांबद्दल नीट विचार केला पाहिजे. विचाराशिवाय ज्ञानप्राप्ति कशी व्हावी.

आचार्य ह्मणतात:—

**नोत्पद्यते विना ज्ञानं विचारेणान्यसाधनैः ।**
**यथा पदार्थभानं हि प्रकाशेन विना क्वचित् ॥**

भावार्थः—ज्याप्रमाणें प्रकाशाशिवाय वस्तूचें भान होत नाहीं, त्याप्रमाणेंच विचाराशिवाय अन्य साधनांनीं ज्ञान उत्पन्न होत नाहीं.

यासाठीं मनन केलेंच पाहिजे; तरच श्रवणाचें साफल्य होतें. जीं तत्वें नुसत्या श्रवणानें नीट समजत नाहींत तीं मननानें समजूं लागतात.

समर्थ ह्मणतात.

**श्रवणाचा विचार कळे। तरीच भाग्यश्री मवळे। मुख्य परमात्मा आकळे। स्वानुभवासि ॥ या नांव जाणावें मनन। अर्थालागीं सावधान।**

विचाराशिवाय समाधान होत नाहीं, याला मुख्य दृष्टांत हाच कीं, नुसतें अन्न खाल्याबरोबर त्या अन्नानें शरीराचें पोषण होत नाहीं. त्या अन्नावर पचनक्रिया उत्तमरीतीनें झाली पाहिजे तरच त्यापासून शरीरपोषक रस उत्पन्न होईल. व सर्व क्रिया नीट चालतील. त्याचप्रमाणें श्रवण केलेल्या तत्वांचा विचार केल्याशिवाय तीं नीट समजून त्यांजबद्दल खात्री होऊन, ती आपलीशीं होत नाहींत.

वेदांतांतील तत्वें समजण्यास फार कठीण असल्यामुळें, अनेक दृष्टांतांची व युक्तीप्रयुक्तींची योजना केल्याशिवाय मुमुक्षूची खात्री होत नाहीं. उदाहरणार्थ असें पहा कीं सगुण ब्रह्म ह्मणजे ईश्वर सर्व जगाचा चालक आहे, हें ऐकल्याबरोबर ही शंका उत्पन्न होते कीं, ईश्वरास हात पाय वगैरे नसल्यामुळें त्याला या जगांतील क्रिया कशा चालवितां येतील ? या शंकेच्या समाधानार्थ श्रीशंकरांनीं निर्दिष्ट केलेला लोहमणी अथवा लोहचुंबक, याचा दृष्टांत दिला आहे. जसा लोहचुंबक हात पाय वगैरे कांहीं नसतां लोखंडाचें आकर्षण करतो, व हें त्याच्या निसर्गसिद्धशक्तीच्या योगानें होतें, त्याच प्रमाणें ईश्वर आपल्या अपरिमित शक्तीनें हें सर्व जग चालवितो.

आतां "तत्त्वमसि" या सिद्धांत वाक्याच्या सत्याबद्दल मुमुक्षूंनीं युक्तीनें आपली खात्री कशी करून घ्यावी हें पाहूं. हें वाक्य प्रथमदर्शनीं अगदीं असंभवनीय दिसतें, व तें भ्रममूलक आहे असें पाश्चिमात्य द्वैतवादी निश्चयानें ह्मणतील. कारण तत्पदवाच्य सगुण ब्रह्म सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, सर्वैश्वर्यसंपन्न असें आहे, व जीव तर अल्पज्ञ अल्प शक्तिचा, असा प्रत्यक्ष दिसतो. मग यांचें ऐक्य कसें संभवतें? यासंबंधानें एक युक्ति मागें सुचविली आहेच, पण हा सिद्धांत फार महत्वाचा असल्यामुळें, विद्यारण्यस्वामींनीं तत्वविवेकांत निर्दिष्ट केलेली दुसरी युक्ति मुमुक्षुंनीं लक्षपूर्वक विचार करण्यासारखी आहे.

विद्यारण्यस्वामी ह्मणतात:—

शब्दस्पर्शादयो वेद्या वैचित्र्याज्जागरे पृथक् ।
ततो विभक्ता तत्संविदैकरूप्यान्न भिद्यते ॥
तथा स्वप्नेऽत्र वेद्यं तु न स्थिरं जागरे स्थिरं ।
तद्भेदोतस्तयोः संविदेकरूपा न भिद्यते ॥
सुप्तोत्थितस्य सौषुप्ततमोबोधो भवेत्स्मृतिः ।
साचावबुद्धविषयाऽवबुद्धं तत्तदा तमः ॥
सबोधो विषयाद्भिन्नो न बोधात्स्वप्नबोधवत् ।
एवं स्थानत्रयेप्येका संवित्तद्वद्दिनांतरे ॥
मासाब्दयुगकल्पेषु गतागम्येष्वनेकधा ।
नोदेति नास्तमेत्येका संविदेषा स्वयंप्रभा ॥
इयमात्मा परानंदः परप्रेमास्पदं यतः ।
मानभूवं हि भूयासमिति प्रेमात्मनीक्ष्यते ॥
तत्प्रेमात्मार्थमन्यत्र नैवमान्यार्थमात्मनि ।
अतस्तत्परमं तेन परमानंदतात्मनः ॥

इत्थं सच्चित्परानन्द आत्मा युक्त्या तथाविधं
परंब्रह्म तयोश्चैक्यं श्रुत्यंतेषूपदिष्यते ॥

भावार्थः—जागृत स्थितींत शब्द स्पर्शादिक ज्ञानाचे विषय जरी निरनिराळे असले, तरी त्यांजहून भिन्न असणारी त्यांची संवित् एकरूपच आहे, तिच्यांत भेद नाहींत. त्याचप्रमाणें स्वप्नांतील स्थिति आहे. स्वप्नांत ज्या वस्तूचें ज्ञान होतें त्या स्थिर नाहींत, व जागृतींतील वस्तू स्थिरस्थाई असतात,हाच या दोहोंतील भेद.परंतु या सर्व वस्तूंची संवित् एकच आहे. ती भिन्न होऊं शकत नाहीं. निजून उठलेल्या मनुष्याला निद्रावस्थेंतील तमाचें (अज्ञानाचें) जें ज्ञान होतें ती स्मृति असते. स्मृती पूर्वीं जाणलेल्या वस्तूंसंबंधानेंच व्हावयाची, ह्मणून निद्रावस्थेंत तमाचा बोध झाला होता असें ठरतें. हा बोध, त्याचा विषय जें तम, याहून जरी भिन्न असला तरी स्वप्न बोधाप्रमाणें इतर बोधाशीं अभिन्नच आहे. याप्रमाणें तीनही अवस्थांत संवित् एकच आहे, व त्याचप्रमाणें ही स्वयंप्रभा संवित्, गेलेले व पुढें येणारे जे भिन्न भिन्न दिवस, महिने, वर्षें, युगें व कल्प यांत उदयही पावत नाहीं, व अस्तासही जात नाहीं. ती तशीच कायम रहाते. हा संविद्रूपी आत्मा निरतिशय सुखरूप आहे; कारण तो अत्यंत प्रेमाचा विषय होतो. हें प्रेम असें आहे कीं, कोणासही आपण नसावें असें वाटत नाहीं, तर आपण सर्व काल असावें असेंच वाटतें. व हें प्रेम आपल्या स्वतःसाठीं दुसऱ्यावर असतें, दुसऱ्या करतां आपल्यावर असत नाहीं. ह्मणून तें सर्वोत्कृष्ट आहे; व त्यावरून आत्म्याचे ठायीं परमानंदरूपता सिद्ध होते. याप्रमाणें युक्तीनें आत्मा सच्चित् व परमानंदी सिद्ध होतो. परमात्माही तसाच आहे, व त्याचें ऐक्य वेदांतांत प्रतिपादन केलेलें आहे.

जीवात्मा व परमात्मा हे आपणास भिन्न भासतात, कारण त्यांचीं लक्षणें आपणास अत्यंत भिन्न दिसतात. पण युक्तीनें जर त्यांचीं

लक्षणें वस्तुतः सारखींच आहेत असें सिद्ध केलें, तर मग वेदांतांतील महावाक्यावर ज्यास्त विश्वास बसेल. ह्मणून विद्यारण्यस्वामींनीं वरील युक्ति लढविली आहे. ती युक्ति अशी आहे.

परमात्मा सच्चिदानंदरूपी आहे असें सर्वत्रांस माहीत आहे, व याबद्दल विशेष मतभेद नाहीं. आतां जीवात्माही त्याचप्रमाणें सच्चिदानंदरूपी आहे, हें जर दाखविलें तर श्रुतिवाक्यावर विश्वास बसण्यास ज्यास्त कारण होईल. यास्तव जीवात्मा कसा आहे तें पाहिलें पाहिजे.

शब्द, स्पर्शादि विषयांचे गुण, व स्वतः विषय हे सर्व जरी भिन्न असले, तरी त्यांचें ज्ञान भिन्न होत नाहीं. ह्मणून त्यांस जाणणारा जीवात्मा एकच आहे. आतां स्वप्नांत दिसणाऱ्या वस्तू क्षणिक आहेत, व जागृतींतील चिरकाल रहातात, पण या वस्तू जरी भिन्न असल्या तरी त्यांचें ज्ञान भिन्न नाहीं, व त्यांना जाणणाराही एकच आहे. निजून उठलेला मनुष्य, मला गाढ झोंप लागली होती, मला कांहीं एक समजलें नाहीं, मी सुखी होतों, किंवा निदान मला कांहीं त्रास नव्हता असें ह्मणतो. हें आठवणीनें ह्मणतो ह्मणून त्यावेळचा जाणाराही हाच. त्याच प्रमाणें स्वप्नाचीही आठवण जागृतींत असते, व एकानें अनुभवलेले स्वप्नाची व निद्रेची दुसऱ्यास आठवण होणें शक्य नाहीं, ह्मणून तीन अवस्थेंत जाणणारा एकच आत्मा आहे असें ठरतें. हा आत्मा बदलत नाहीं. अनेक दिवस व वर्षें गेलीं तरी जाणणारा आत्मा कायम असतो. शरीर बदललें, वाळलें, पुष्ट झालें, तरी आत्मा भिन्न होत नाहीं. ह्मणून एक जन्मांत आत्मा कायम राहातो.

त्याच प्रमाणें जन्मांतरांतही हा आत्मा बदलत नाहीं, ह्मणूनच त्याला गतजन्मीं केलेल्या सुकृतदुष्कृतांचें फल या जन्मीं भोगावें

लागतें. अशा रीतीनें विचार केला तर आत्मा नित्य सारखा राहातो हें ठरतें. ह्मणून तो सत् ह्मणजे त्रिकालाबाधित आहे. त्याचप्रमाणें तो चिद्रूप आहे, हें सांगावयास नको; कारण तो जाणणारा आहे, जड नव्हे. आतां ज्या अर्थीं सर्वांपेक्षां ज्याचा आत्मा त्याला जास्त आवडतो, व आपण असत् असावें हें सर्वांस वाटतें, त्या अर्थीं आत्मा आनंदरूप आहे हें ठरतें.

पण येथें अशी शंका निघते कीं, कांहीं लोक जीवास कंटाळून आत्मघात करतात, तेव्हां आत्मा अप्रिय असेंच ह्मणावें. अशा स्थितींत आत्मा प्रिय कसा होईल ?

पंचदशींत आत्मानंदांत ह्मटलें आहेः—

**रोगक्रोधाभिभूतानां मुमूर्षा वीक्षते क्वचित् ।**
**ततो द्वेषाद्भवेत्त्याज्य आत्मेति यदि तन्न हि ॥**

भावार्थः—रोग, क्रोध वगैरे विकारांनीं त्रस्त झालेल्या पुरुषाला मरणाची इच्छा होते ह्मणून आत्मा द्वेषामुळें त्याज्य होतो असें ह्मणूं नये.

कारणः—

**त्यक्तुं योग्यस्य देहस्य नात्मता त्यक्तुरेव सा ।**
**न त्यक्तुर्यस्ति स द्वेषस्त्याज्ये द्वेषे तु का क्षतिः ॥**

भावार्थः—त्याज्य करण्यास योग्य असा जो देह त्याला आत्मता नाहीं. ती आत्मता टाकणाराकडे आहे. जर त्याज्य वस्तूचा ( ह्मणजे देहाचा ) द्वेष केला तर काय बिघडतें ?

सारांश देहादिकांपासून असह्य वेदना किंवा दुःख झालें तर मनुष्य देह सोडण्यास तयार होतो. पण तो देहाचा द्वेष करतो, आत्म्याचा करित नाहीं. ह्मणून आत्मा अप्रिय ठरत नाहीं.

सारांश जीवात्माही सच्चिदानंदरूपी ठरतो. यावरून परमात्मा व जीवात्मा हे निदान सजातीय आहेत असें ठरतें. इतकें झाल्यावर

मुमुक्षूचा विश्वास श्रुतींवर बसून त्यांचें तादात्म्य आहे असा परोक्ष बोध व्हावयास विशेष अडचण पडत नाहीं. पण याबद्दल निःसंशय खात्री अपरोक्ष ज्ञानाशिवाय होणार नाहीं.

तरी साक्षात्कार होईपर्यंत परमात्मा व जीवात्मा यांच्या ऐक्याविषयीं बोध व्हावा ह्मणून कांहीं युक्त्या सुचविल्या आहेत.

परमात्मा व जीवात्मा हे दोनीही सच्चिद्रूपी असल्यामुळें एकजातीय तर निःसंशय आहेतच. पण ते एकच आहेत हें कशावरून ह्मणावें ? ते भिन्न असणें शक्य आहे, व अनेक कारणांनीं जास्त संभवनीयही आहे, असें साधकास वाटेल. ह्मणून त्यानें या दोहींच्या ऐक्याविषयीं क्रमाक्रमानें विचार करावा.

प्रथम आपण असें पाहूंया कीं, एका मोठ्या अग्निगोलकांतून जर अनेक ठिणग्या निघाल्या, तर त्या ठिणग्या अग्निगोलकाहून भिन्न होतील काय ? वस्तुतः ते अग्निकण पूर्वीं अभिन्न रूपानें अग्निगोलकांतच होते व अग्निगोलकापासून जरी ते निराळे पडले, तरी अंशरूपानें ते अग्निगोलकच आहेत, हें उघड दिसतें. त्याचप्रमाणें हे अनेक जीवात्मे ईश्वरापासून उत्पन्न झाल्यामुळें ते ईश्वराशीं अभिन्नच आहेत.

मुंडकोपनिषदांत ह्मटलें आहेः—

**यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिंगाः सहस्रशः प्रभवंते सरूपाः ।**
**तथाऽक्षराद्विविधाः सौम्यभावाः प्रजायंते तत्र चैवाऽपियंति॥**

भावार्थः—जसे प्रदीप्त केलेल्या अग्नींतून त्याजसारख्याच रूपाचे हजारों स्फुलिंग निघतात, त्याप्रमाणें अक्षरतत्वांतून अनेक जीव उत्पन्न होतात व त्यांतच पुनः लीन होतात.

आतां यापुढें असें पहावें कीं ज्या द्रव्यांत अग्नि व्यक्त होतो, तीं द्रव्यें कितीही भिन्न असलीं तरी त्यांतील अग्नि भिन्न भिन्न आहेत.

असें मानण्यास काय आधार आहे? तांबडें दिसेपर्यंत एका अग्नींत तापविलेलें लोखंड, तांबें, रुपें, इत्यादि धातूंचे गोळे जरी भिन्न भिन्न असले, तरी त्यांतील तेज व उष्णता भासविणारें तत्व एकच आहे असें विचाराअंतीं कळून येईल. या तत्वास आपण अग्नि ह्मणतों, व तें सर्वत्र एकच आहे. याचप्रमाणें जीव जरी भिन्न भिन्न असले तरी त्यांच्या मधील चैतन्य एकच आहे, असें कां मानूं नये?

या विचारसरणीवरून जीव व परमात्मा हे एकाच चैतन्याचे बनले आहेत असें समजण्यास मदत होते. आतां यासंबंधानें दुसरा एक उत्तम दृष्टांतही उपयोगी आहे. तो असा. आधुनिक तत्ववेत्त्यांचे शोधांप्रमाणें मनुष्याचें शरीर लाखों सूक्ष्म भागांचें बनलें आहे. हे सूक्ष्म भाग (Cells) स्वतः लहान जीव आहेत असें मानण्यास कारणें आहेत. त्या प्रत्येकास जन्म, वृद्धि, व नाश, हीं असतात. मात्र त्यांचा सर्व आयुष्यक्रम मनुष्याचे आयुष्याचे मानानें फारच अल्प असतो. या लहान जीवांचें एकीकरण होऊनच मनुष्य व इतर मोठे प्राणी हे समष्टीरूप जीव बनले आहेत. मनुष्य अथवा दुसरा समष्टीरूप जीव मेला कीं हे सर्व सूक्ष्मजीव मरतात. पण मनुष्य जिवंत असतां यांपैकीं हजारों जन्मतात व मरतात, तरी समष्टीजीव कायम रहातो. आतां हे लहान जीव मनुष्यापासून भिन्न कसे मानावे? मनुष्याचा देह तर यांचाच बनलेला असतो, ह्मणून हे मनुष्याशीं अभिन्नच आहेत असेंच मानावें लागतें. याचप्रमाणें सर्व जगतांतील जीव व्यष्टीरूप आहेत, व ईश्वर हा सर्वांचें समष्टीरूप आहे, असें समजण्यास काय हरकत आहे? सर्व जीव हे ईश्वराचेच अंश आहेत, व ईश्वराशीं वर दर्शविल्याप्रमाणें अभिन्न आहेत, अशी खात्री झाली कीं श्रीरामानुजाचार्यांच्या विशिष्टाद्वैत सिद्धांतापर्यंत मुमुक्षूची मजल पोहोंचली.

आतां याही पुढें असा विचार करावा कीं, मनुष्य जिवंत असतां त्याच्या शरीराचे हजारों सूक्ष्मभाग मरतात व त्यांच्या ऐवजीं हजारों नवे भाग उत्पन्न होतात, तरी तो मनुष्य कायम राहतो. शरीराचे जुने भाग नाहींसे होतात व नवे भाग त्यांचे ऐवजीं उत्पन्न होतात व याप्रमाणें होत होत सात वर्षांनीं शरीर अजीबात नवें बनतें. तरी तो मनुष्य प्राणी निराळा झाला असें कोणी ह्मणतो काय ? शरीर बदललें तरी तोच मनुष्यप्राणी कायम राहतो या तत्त्वावर सर्व व्यवहार चालू आहे. मनुष्याचे शरीरांत उघड उघड फेरफार झाला तरी बाल्यावस्थेंतील मनुष्य निराळा, तरुणावस्थेंतील निराळा, व वृद्धावस्थेंतील निराळा, असें कोणीही ह्मणत नाहीं. याचप्रमाणें जीव भिन्न भिन्न उपाधींमुळें भिन्न भासोत, तरी त्यांच्यांतील जीवनशक्ति अग्नीच्या उदाहरणाप्रमाणें एकच आहे असें मानण्यास काय हरकत आहे ?

जीवनशक्ति एक व अखंड असून, ती अनेक जीवांत वांटली आहे असें दिसतें, पण वस्तुतः ती एकच आहे. त्याचप्रमाणें चैतन्यही एक व अखंड असून जीवांत वांटल्याप्रमाणें दिसतें असें तत्व समजण्यास अशक्य नाहीं. आतां प्रत्येक प्राण्याचें चैतन्य निराळें आहे, असें जरी भासतें, व सुखदुःखाचा अनुभव ज्याचा त्याचा भिन्न आहे, हें जरी खरें आहेसें वाटतें, तरी तत्वदृष्ट्या हा भ्रम आहे. याला उत्तम दृष्टांत आकाशाचा. आकाश जरी वस्तुतः एक व अखंड आहे, तरी तें भिन्न भिन्न पदार्थांत वांटून जाऊन भिन्न झालें आहे असें वाटतें. घटांतील आकाशापेक्षां मठांतील आकाश मोठें, व या दोहोंपेक्षां महदाकाश असंख्यपट मोठें हें सर्वांस वाटतें. व एका घटांतील आकाशाहून दुसऱ्या घटांतील आकाश भिन्न आहे असेंही दिसतें. पण वस्तुतः आकाश एक व अखंड आहे अशी विचाराअंतीं खात्री होते. त्याचप्रमाणें भिन्न भिन्न जीव व ईश्वर यांतील चैतन्य एकच व अखंड

आहे, व त्या चैतन्यासच ब्रह्म ह्मणतात अशी मुमुक्षूनें आपली खात्री करावी.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतात:—

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितं ।**

भावार्थ:—ब्रह्म वस्तुत: अखंड असून भूतमात्रांत विभक्त झालें आहेसें भासतें.

अशा रीतीनें विचार केल्यास हळू हळू मुमुक्षूस जीवब्रह्मैक्य तत्वाचा बोध होत जाईल.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें युक्तीनें व दृष्टान्तानें अनेक शास्त्रांतील तत्वांचा विचार केला तर मुमुक्षूचा त्यांच्या सत्यतेबद्दल निश्चय होत जाईल. विचार करीत असतां अनेक शंका निघणार. पण त्या शंकां बद्दल मुमुक्षूनें आपलें समाधान स्वत: किंवा जाणते पुरुषांचे सहाय्यानें करून घेतलें पाहिजे. नाहीं तर संशय रहात जाईल व मुमुक्षूचें अकल्याण होईल.

श्रीकृष्ण गीतेंत ह्मणतात:—

**अज्ञश्चाश्रद्धधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥**

भावार्थ:—अज्ञ व श्रद्धाहीन असलेला, व संशयग्रस्त असा पुरुष नाश पावतो. संशयग्रस्त मनुष्याला इहपरलोकीं गति नाहीं, व सुखही नाहीं.

या संशयाचा नाश करण्याकरतां श्रवण व मनन हीं दोन्हीं साधनें चालू ठेविलीं पाहिजेत. तरच मुमुक्षू संशयरहित होऊन त्याची परमार्थांत प्रगति होत जाईल. नाहीं तर त्याला समाधान प्राप्त होणार नाहीं.

समर्थ ह्मणतात:—

**जेथें नाहीं श्रवणमनन । तेथें कैंचे समाधान ॥**

यासाठीं श्रवणमननासंबंधीं हयगय न करतां त्यांचा अभ्यास सतत चालू ठेवावा. या उत्तम साधनाबद्दल कंटाळा उत्पन्न होऊं देऊं नये.

**सेविलेंचि सेवावें अन्न। घेतलेंचि घ्यावें जीवन । तैसें श्रवण-मनन । केलेंचि करावें ॥**

श्रवण आणि मनन उत्तम रीतीनें झाल्यावर परोक्षज्ञान पूर्णपणें होतें. पण अपरोक्ष ज्ञान व्हावयास अजून पुढील साधनांची अपेक्षा रहाते. तें साधन निदिध्यासन होय.

निदिध्यासनः—आत्मसाक्षात्कार व्हावयास या निदिध्यासनाची अपेक्षा असते, ह्मणून मुमुक्षूंनीं या साधनाचा उत्तमरीतीनें अभ्यास केला पाहिजे. पण निदिध्यासन ह्मणजे काय?

आचार्य ह्मणतातः—

**नित्याभ्यासादृते प्राप्तिर्न भवेत्सच्चिदात्मनः ।**
**तस्माद्ब्रह्म निदिध्यासेज्जिज्ञासुः श्रेयसे चिरं ॥**

भावार्थः—नित्य अभ्यास केल्याशिवाय सच्चिद्रूपी आत्म्याची प्राप्ति होणार नाहीं, ह्मणून आपल्या कल्याणाकरतां ज्ञानाची इच्छा करणारानें ब्रह्माचें निदिध्यासन चिरकाल करावें.

निदिध्यासन ह्मणजे ब्रह्माचें ध्यान अथवा चिंतन. हें सतत करीत राहिलें पाहिजे, ह्मणजे ब्रह्माविषयीं दृढ भावना होऊन पुढें साक्षात्कार होतो.

समर्थ ह्मणतातः—

**निदिध्यासें समाधान होत असे ॥ बोलिल्याचा अर्थ कळे। तरीच समाधान निवळे । अकस्मात अंतरीं बोळे । निःसंदेह ॥**

हें निदिध्यासन कां करावें लागतें, असें विचारलें तर त्याचें उत्तर असें आहे कीं, मी ब्रह्म आहें अशी दृढ भावना होणें इष्ट आहे; कारण ही भावना झाल्याशिवाय साक्षात्कार होणें शक्य नाहीं. आतां या भावनेच्या आड मीं देह आहें, व हें जग सत्य आहे ही विपरीत भावना येते. त्यामुळें अद्वैतबुद्धि होऊं शकत नाहीं. ही विपरीत भावना निदिध्यासनानें नष्ट होते, ह्मणून नित्य व चिरकाल निदिध्यासन करावें.

पण हें निदिध्यासन करावें कसें ? या प्रश्नाचें उत्तर श्रीशंकर शिवगीतेंत देतात.

**निर्मोहो निरहंकारः समः संगविवर्जितः।**
**सदा शांत्यादियुक्तः सन्नात्मन्यात्मानमीक्षते ।**
**यत्सदा ध्यानयोगेन तन्निदिध्यासनं स्मृतं ॥**

भावार्थः—मोह व अहंकार रहित होऊन, समस्थितींत राहून, सर्वसंग परित्याग करून, नेहेमीं शमदमादि साधनयुक्त होऊन, जें आपले ठायीं आत्म्यास ध्यानयोगानें पहाणें, त्याला निदिध्यासन ह्मणतात.

या निदिध्यासनांत अनेक विक्षेप येतात. मन हें अति चंचल असल्यामुळें तें विषयांकडेच धांव घेतें, किंवा कोणच्या तरी व्यवहारासंबंधीं काळजींत गुंतून रहातें, अथवा तें निद्रेला वश होतें. असें झालें ह्मणजे अर्थात् ध्यानांत विघ्न होतें, व तत्वाची विस्मृति होते. ह्मणून मन स्वाधीन ठेऊन, त्याला कोठेंही जाऊं न देतां, सतत ब्रह्मचिंतनांत गुंतून ठेवलें ह्मणजे साक्षात्कार होतो.

आचार्य ह्मणतातः—

**निद्राया लोकवार्तायाः शब्दादेरपि विस्मृतेः ।**
**क्वचिन्नावसरं दत्वा चिंतयात्मानमात्मनि ॥**

भावार्थः—निद्रेला, लौकिक गोष्टीला, शब्दादि विषयांला, किंवा विस्मृतीलाहि अगदीं अवकाश न देतां, आपल्याठायीं आत्म्याचें चिंतन कर.

आतां या तीन, व इतर साधनांचा अभ्यास केला ह्मणजे साक्षात्कार होतोच. पण तो सर्वांस सारख्या अभ्यासानें होत नाहीं. कित्येकांस तो जलदी होतो, व कित्येकांस फार वेळ लागतो, कारण तो होण्यापूर्वीं मुमुक्षूची चित्तशुद्धि व कर्मक्षय हीं व्हावीं लागतात.

श्रीशंकर शिवगीतेंत ह्मणतातः—

**सर्वकर्मक्षयवशात्साक्षात्कारोऽपि चात्मनः ।**
**कस्यचिज्जायते शीघ्रश्चिरकालेन कस्यचित् ॥**

भावार्थः—सव कर्मांचा क्षय झाल्यामुळें कित्येकांस आत्मसाक्षाकार लवकर होतो, व कित्येकांस दीर्घकालानें होतो.

हीं श्रवणादिक साधनें ज्ञानप्राप्तीकरतां अवश्य पाहिजेत. पण यांचा अभ्यास कोठपर्यंत करावा ?

पंचदशींत तृप्तिदीपांत ह्मटलें आहेः—

**अहं ब्रह्मेति वाक्यार्थबोधो यावद्दृढीभवेत् ।**
**शमादिसहितस्तावदभ्यसेच्छ्रवणादिकं ॥**

भावार्थः—"मी ब्रह्म आहें" या वाक्याचा अर्थबोध दृढ होईपर्यंत शमदमादि साधनांसहित श्रवणादिकांचा अभ्यास करावा.

मीं ब्रह्म आहें असा दृढ निश्चय होऊन, ज्या भाग्यवान् पुरुषाचें मन परवस्तूचेठायीं लीन झालें, तो कृतकृत्य झाला असें समजावें. त्याची थोरवी काय सांगावी ? त्यानें सर्व पुण्यकर्मे आचरण केलीं, असें समजावें. त्याच्या जन्माचें सार्थक झालें. तो पुनः या दुःखमूलक

संसारांत बद्ध होणार नाहीं. तो विदेहमुक्तीचा अधिकारी होऊन, जीवन्मुक्त स्थितींत राहिलेलें आयुष्य घालवितो, आणि दुसऱ्यांचा उद्धार करण्याकरितांच यत्न करीत असतो.

**स्नातं तेन समस्ततीर्थसलिले सर्वाऽपि दत्ताऽवनी ।**
**यज्ञानां च सहस्रमिष्टमखिला देवाश्च संपूजिताः ।**
**संसाराच्च समुद्धृताः स्वपितरस्त्रैलोक्यपूज्योप्यसौ ।**
**यस्य ब्रह्मविचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥**

भावार्थः—ज्या मनुष्याचें परब्रह्माविषयीं विचार करण्यांत एक क्षणभरही मन स्थिर झालें, त्यानें सर्व तिर्थांत स्नान केलें, सर्व पृथ्वी दान केली, सहस्र यज्ञ केले, सर्व देवांची पूजा केली, त्यानें आपले पितरांचा संसारांतून उद्धार केला, असें समजावें. असा मनुष्य त्रैलोक्यांतही पूज्य होतो.

ब्रह्माबद्दल विचार करणाराची जर ही महति, तर साक्षात्कार झालेले, व सदासर्वकाळ ब्रह्माला अपरोक्ष रीतीनें पहाणारे साधूंची थोरवी काय सांगावी ? या उच्च पदवीस सर्व साधक चढून, त्यांचा दीर्घयत्न सफल होवो, अशी त्या जगन्नियंत्या परमेश्वराकडे नम्र प्रार्थना आहे.

